# रत्नमाला आणि प्रतापचंद्र



( कल्पित कादंबरी )

मालवण

येथें

**महादेव विनायक केळकर**

यानीं




रचिली.

**गोविंद कृष्णाजी पालव**

यानीं

हक्क विकत घेऊन

मालवण येथें

**विचारदर्शकछापखान्यांत**

छापेली.

(सन १८६७ च्या २५ व्या आक्टाप्रमाणें रजिष्टर केलें आहे)

सन १८८८

किंमत १॥ रुपया

# प्रस्तावना

आमच्या देशांत छापखाने झाल्या दिवसा पासून मराठी भाषेंत अनेक विषयावर नवीन अनेक ग्रंथ तयार झाले, त्या प्रमाणें कादंबऱ्यांचीहीं पुस्तकें पुष्कळ झालीं आहेत. पण त्यांत दोन तीन खेरीज करून बाकीचीं अगदीं कुच कामीं आहेत. असें मोठ मोठ्या विद्वानांचें म्हणणें आहे. तेव्हां एकदरींत चांगली कादंबरी लिहिण्याचें काम फार बिकट आहे. असें म्हणण्या हरकत नाहीं.

नापसंत ठरलेल्या कादंबरींपैकीं पांच चार पुस्तकें आलिकडे आमच्या पहाण्यांत आलीं आहेत. तीं लिहिणारांनीं पुढें लिहिलेल्या कांहीं थोडयाशा गोष्टींकडे लक्ष पुरविलें असतें तर तीं पुस्तकें बऱ्याच योग्यतेंत असतीं, यांत संशय नाहीं. कादंबरी असो, अगर नाटक असो. त्यांतील नायक व नाईका तरूण, सुंदर, बुद्धिमान्, विद्वान्, धैर्यवान्, सुशील, रसिक मर्मज्ञ इत्यादि सद्गुणानीं युक्त असलीं पाहिजेत. योग्यते प्रमाणें प्रत्येक पात्राचे स्वभाव कायम असले पाहिजेत, त्यांत धरसोड होतां नये. मंत्र. तंत्र, जादू भूत, पिशाच यांचा समावेश कादंबरींत करण्यांत अर्थ नाहीं. कल्पना चालेल तों पर्यंत कादंबरी कारांस भरारी मारतां येईल असें होणार नाहीं. चरित्र किंवा इतिहास यांत जशा खोट्या गोष्टी मिळवितां येणार नाहींत त्याप्रमाणेंच कादंबरींतहि खोटया म्हणजे असंभवनीय गोष्टी मिळवितां येणार नाहींत. चरित्र किंवा इतिहास याप्रमाणें जरी कादंबरींत घडलेल्या गोष्टींचें दिग्दर्शन केलेलें नसतें. तरी घडण्याचा संभव पाहिजे. कादंबरीच्या वाचना पासून मनुष्याला आपल्या आयुष्यांतील दिवस सुखानें कसे घालविले पाहिजेत, दुःखें कोणत्या प्रकारें टाळलीं पाहिजेत, सदाचरणानें कल्याण व दुराचरणानें अकल्याण होतें हें समजलें पाहिजे. या साठीं व्यवहारामध्यें ज्या ज्या गोष्टी नित्यशः डोळ्यांपुढें येतात. त्याचा बरे वाईट पणा कादंबरी कारांनीं दाखविला पाहिजे. असा जर प्रकार नसेल तर कादंबरीच्या

वाचना पासून लोकांस फायदा तो काय? जादु आणि पिशाचें हीं व्यवह. दृष्टोत्पत्तींत फारच कमी येतात. कितीएक तर त्याच्या अस्तित्वाबद्दल संशयच मानितात. तेव्हां तो प्रकार कादंबरी मध्यें काय कामाचा! अस्तु

फार दिवसां पासून आम्हांस एखादें कादंबरीचें पुस्तक लिहावें असें वाटत होतें. तो योग आजला घडून आला. ही लिहितांना सर्वांस पसंत पडेल अशी पद्धत स्विकारावी असें आम्हांस वाटलें. पण तें काम फारच दुर्घट आहे. विद्वाच्याना मतानें पसंत झालेल्या, ज्या दोन तीन कादंबऱ्या आहेत असें सांगितलें. त्या कादंबऱ्याही सर्व मान्य होत नाहींत. त्यांत पहिल्या प्रतीची कादंबरी जी आम्ही समजतों तिची जी कांहीं दुर्दशा झाली आहे. ती सांगतांच नये. तिची पहिली आवृत्ति छापून पांच सात वर्षे झालीं तरी देखील तिचा दुसरा भाग छापण्याचें कर्त्याच्या दैवीं आलें नाहीं. आणि पहिल्या भागाची दुसरी आवत्तिही झाली नाहींच. आणि कितिएक गचाळ कादंबऱ्यांच्या पांच पांच सात सात आवात्ति झाल्या. तेव्हां बऱ्या वाईटाची निवडानिवड करणाऱ्या लोकांची संख्या आमच्या लोकांत फारच कमी आहे असें वाटतें. यासाठीं वर जे आम्हीं दोष दाखविले ते सोडून ज्या रीतीनें प्रस्तुतकालीं कादंबरी लिहिण्याची अवश्यकता वाटली त्या रीतीनें ही लिहिली आहे.

माहादेव विनायक केळकर.

# रत्नमाला आणि प्रतापचंद्र.



## भाग १

पर्जन्यकाल संपल्यामुळें आकाशांतील अभ्रें नाहींशीं होऊन सर्व दिशा स्वच्छ झाल्या आहेत, विजांचें चमकणें बंद झालें आहे, चिखल नाहींसा होऊन शहरांतील रस्ते पांथस्थांस सोईचे झाले आहेत सरोवरांतील पांणीं कमी होऊन कमलांनीं आपलीं डोकीं वर काढिलीं आहेत, वाऱ्याच्या सोसाट्यानें वांकलेली झाडें सरळ झालीं आहेत, मेघांचा गडगडाट व बेडकांचे डरांव डरांव शब्द बंद झाले आहेत, भूमि जलमय होऊन जिकडे तिकडे पाणीच पाणी दिसत होतें तें आटून गेलें आहे, नद्यांचीं दोन्हीं तीरें पाणी कमी झाल्यामुळें अफाट दिसूं लागलीं आहेत, लहान मोठया ज्या रस्त्यावर गवत वाढून रस्ते दिसत नव्हते ते पांथस्थांच्या रहदारीनें तुडवून जाऊन साफ झाले आहेत, शेतें पिकून तयार झालेलीं असल्यामुळें कातरण्याचें काम सुरू झालें आहे, व सोंसाट्याचा वारा बंद होऊन बागांतील प्रफुल्लीत पुष्पांचा मधुर सुवास येत आहे.

अशा रमणीय ऋतूंत एके दिवशीं दोन प्रहर रात्र उलटून गेली होती चंद्र नगरांतील बहुतेक लोक घरोघर निद्रिस्त झाले होते, पुर्व रात्रीचा काळोख कमी होऊन तारांगनांचा झुंजरुक प्रकाश पडला होता, रस्त्यांतील दिवे मंद प्रकाशानें जळत होते, देवालयीं किर्तन, भजन वगैरे चाललें होतें, विद्याभ्यास करणारे निजण्याच्या बेतांत होते, कोठें तमाशा, कोठें नाटक चाललें होतें, गलबला बंद झाल्यामुळें जिकडून तिकडून घडयाळाचे ठोके एकूं येत होते, चौर्य कर्म करणारे रात्रींचर लाग साधण्यासाठीं फिरत होते. अशावेळीं एक तरुण पुरुष एका गल्लींतून बाहेर पडून मोठया रस्त्यानें निघाला. कांहीं अंतरावर त्यास एक लहान गल्ली लागली. तींत

तो शिरला. तो कांहीं विचारांत निमग्न आहे असें दिसत होतें. थोड्या वेळांत तो एका हवेलीजवळ आला, आणि खिशांतील किल्यांचा घोस काढून दरवाजा उघडून आंत गेला, आणि फिरून त्यानें दरवाजा लावून घेतला.

आंत जिकडे तिकडे तऱ्हेतऱ्हेचा विकाऊ माल पडला होता, तणें करून पाय टाकण्यासही जागा नव्हती. डाव्या बाजूस एक खिडकी अर्ध उघडी होती, तींतून थंड वारा येत होता. समोर भिंतीस एक घड्याळ लाविलें होतें, त्याचें टिकटिकणें ऐकूं येऊं लागलें. उजव्या बाजूस तळघरांत उतरण्या करितां एक जिना होता. त्या जिन्यानें तो तळघरांत उतरला. आंत मध्य भागीं एक हांडी पेटत होती. उजव्या हातास एक पुस्तकांनीं भरलेलें कपाट होतें. डाव्या हातास एक मच्छरदानीनें झांकलेला पलंग होता. त्याच्या पलिकडे एक दुसरा लहान दरवाजा होता. मधल्या जाग्यांत एक जाजम घातलेलें होतें, समोर भिंताशीं तक्ये, लोडें मांडलेलीं होतीं. त्यांतल्या एका तक्याशीं तो टेंकून बसला. त्याची स्थिती अगदीं भ्रमिष्टासारखी झाली होती. क्षणांत सुसकारा टाकी, क्षणांत निराश होई, क्षणांत त्याला कांहीं आशा दिसे, अशा व्यापारांत तो अगदीं निमग्न झाला होता. तो आपल्याशींच म्हणूं लागला. " कायरे देवा मला वेड लागलें हें! मी तिकडे नसतों गेलों तर बरें झालें असतें! बाबा मज बरोबर नसते तर मी तिच्या घरापर्यंत तरी तिला पहात गेलों असतों. या अफाट शहरांत ती कोठें रहात असेल तें समजतांना मारामार आहे. आणि समजलें म्हणून काय उपयोग! तिची माझी गांठ पडणें कठीण ! फटफजिती झाली तरी मी करून घेण्यास मागें सरणार नाहीं. एवढेंच नव्हे तर तिचें एकदां दर्शन कोणी करून देईल तर तेवढ्या करितां काय सांगेल तें ऐकेन काय पाहिजे तें करीन, तिचें एकदां तरी मला दर्शन होऊंदे चोरून चोरून तिच्याकडे मला कांहीं वेळ पहावयास मिळालें! तेवढ्यानें मला किती आनंद आला ! माझ्या डोळ्यां पुढें तिची मूर्ति उभी आहे. असा भास होतो. पण आलिंगन द्यावयास गेलोंतर पिशाचा प्रमाणें

चट्कन नाहींशी होतें. कांहीं बोलावयास गेलों. तर मुक्या प्रमाणें स्तब्ध राहतें; आणि एकदम नेत्रां पुढून नाहींशी होऊन मन अगदीं विरस होतें. अशा प्रकारच्या विचारांत तो अगदीं गढून गेला.

इतक्यांत सुमारें बारा वर्षांची एक मुलगी आणि तिच्या बरोबर कं दील हातांत घेतलेला एक चाकर अशीं दोन मनुष्यें बाहेरच्या दरवाजावर आलीं आणि पहातात तों, दारास आंतून कडी आहे, म्हणून त्यानीं पू ष्कळ हांका मारिल्या. परंतु आंतून उत्तर येईना. तेव्हां मागच्या दरवाजा वर जाऊन कुलूप काढून तीं आंत आलीं. आणि तळ घरांत कोणी आहे असें पाहून ती मुलगी चाकरास बाहेर उभा करून आपण आंत शिरली. आणि पहाते तों ज्याच्या शोधां करितां आपण आल्यें तो सुमंत राव आंत आहे. पण कांहीं विचारांत अगदीं गर्क झाला आहे. म्हणून कांहीं वेळ ती तशीच उभी राहिली. पण तिच्याकडे सुमंत रावाचें लक्ष गेलें ना हीं. तेव्हां आपणच त्यास हांका मारूं लागली.

"दादा, अरे दादा; कसल्या विचारांत निमग्न झाला आहेस. आज जेवायाचें देखील विसरलासना? बाबा केव्हांपासून जिकडे तिकडे रामास पाठवून तुझा शोध करीत आहेत "

हे शब्द ऐकतांच एकाएकीं चपापल्या सारखा होऊन सुमंत राव मागें पाहूं लागला; तों सगुणा आपणास हांक मारिते आहे! तेव्हां बावरल्या सारखा होऊन म्हणतो, "कांग सगुणें जेवणाची तयारी आज लौकरशी. मी येणारच होतों. इतक्यांत तूं आलीस बरें झालें. बाबा काय म्हणत होते?

सगु०— म्हणणार काय; आज तूं गेलास कोठें म्हणून काळजी करीत होते. असो पण तें सगळें. तूं इतका विचार कसचा करीत आहेस?

सुमं०— विचार कसचा आज राजाची स्वारी आली ती तुला नाहींका ठाऊक? तिकडे बाबाही पण गेले होते. आलों तो दमल्या सारखा झालों म्हणून तक्याशीं टेंकलों घटका भर.

सगु०— गडया, पण तुला मी नको नाहीं म्हणत. पण विचारिल्यें तें सांग कीं, काळजी कशाची?

सुमं०— काळजी बिळजी कांहीं नाहीं. दमून पडलों होतों म्हणून सांगितलेंना.

सगु०— कांहीं तरी सांगून उडवा उडव करूं नकोस. तुला काय व रची आठवण झाली, कीं कांहीं दुःखाची वार्ता समजली, कीं कांहीं बरेप णा जिवाला नाहीं, झालें काय? इथलेंच कांहीं कारण आहे असें म्हणा वें तर तें कांहीं दिसत नाहीं. तूं येथें राहिल्या पासून बाबा तुला जीव कीं प्राण करितात. घटका भर तूं नजरे आड झालास, म्हणजे लागलेच कावरे बावरे होतात. माझ्यावर देखील नाहीं त्याची इतकी प्रीति! तुमचें आतां धनी चाकराचें नातें कांहीं तरी उरलें आहे काय ?

सुमं०— छेः गडे तूं भलतेच संशय घेऊंनकोस; राजाच्या मुलाचे ना हीं इतके लाड होत; इतके माझे होतात. आणि एवढा धंदा माझ्या आं गावर त्यांनीं टाकीला तो उगीच नाहीं, मला कांहीं कमी नाहीं.

सगु०— मग कसली तर ही काळजी; सांग, सांगितल्या शिवाय तुला मी सोडणार नाहीं.

सुमं०— मला कांहींच काळजी नाहीं, तर तुला सांगावें तरी काय? खरोखर सांगतों माझ्या सारखा निष्काळजी या त्रिभुवनांत कोणी नसेल.

सगु०— वाः एकून तुझी धन्य आहे. मघां पासून तुझी मी विनवणी करित्यें आहें परंतु व्यर्थ. मी कितीवेळ याठिकाणी उभी आहें. पण तु झें चित्त अगदीं कशांत तें गुंतून गेलें होतें, म्हणून मी तुला विचारितें काय आहे तें सांग. मी बाबांना सांगेन कांहींही करीन. आणि तुला सं कटांतून मोकळा करीन. तुला तसा पाहिल्या पासून मला बाई कसेंसेंच होतें ! सांगबरें पाहूं एकदां !

सुमं०— तुझ्या पुढें बाई शर्थ झाली. कांहीं नाहीं मग सांगूं तरी का य! असें कांहीं तरी मला तूं संकट घालूं नकोस ?

सगु०—संकट ? खरें आहे, तुला संकट वाटलें. बरें, तसें का होइना ! पण सांग, तुला माझ्या गळ्याची शपथ आहे ! आणि बाबांचीही. मला सांपडलास. आतां झक्कत सांगशील कीं नाहीं.

सुमं०— अगे ताई ! तें तुला सांगण्या सारखें नाहीं. असतें तर तें तुला खरोखरच चोरलें नसतें. तें तूं मला विचारूं नयेस, आणि मी तें सांगूं नये असें आहे. समजलीस आतां ?

सगु०— सांगण्या सारखें नाहीं असें आहे (जरा विचार करून) तरीही सांग, मी तुझी लाडकी बहीण आहेना; कांहीं असलें तरी आतां सांगच ?

सुमं० बरें तर सांगतों, पण आधीं बाबास सांगून पाठवि कीं, मला क्षुधा नाहीं, मी फार दिवसांचा राहिलेला जमाखर्च आजआटोपीत आहें. तुम्हीं कांहीं काळजी करूं नका.

सगु० बरें. ( चाकरास ) उमाजी, जा तर एवढें काम तूंच कर. ( तो गेल्यावर सुमंत रावा कडे पाहून ) सांग आतां काय तें.

सूमं० आज राणीचा जन्म दिवस ह्मणून राजानें नदीवर मोठी आरास केली होती.

सगु० होय, आहे तें मला ठाऊक.

सुमं० पुढें, राजा व राणी जेव्हां मागें परतलीं तेव्हां त्यांच्या नौके मागें एक नौका होती, तींत दोन सुंदर स्त्रिया होत्या.

सगु० अरे लबाडा आतां कसा कबूल झालास ! !

सुमं० अगे ऐक तरी, ती नौका सोनेरी पडदे लावून सुशोभित केलेली होती. आमची नौकाही तिच्या बरोबरच येत होती. पण तिचे पडदे लाविलेले असल्यामुळें प्रथम त्या स्त्रिया माझ्या दृष्टीस पडल्या नाहींत. त्यांस मात्र जाळींतून सर्व पहातां येत असे. कांहीं वेळानें त्यांतील एकीनें पडदा उचलला, तेव्हां स्वाभाविक तिकडे माझी दृष्टी गेली, तेव्हां ती रम्य मूर्ति माझ्या नजरेस पडली. नाहींग, कशाचीच तिला उपमा देतां येत नाहीं. चंद्र, सूर्य, इतके तेजस्वी आहेत, पण शेंकडो चंद्र सूर्य गोळा करून कोणी दाखविले तरी तिच्या नखाची सर त्यांना येणार नाहीं. असें निःपक्षपातानें मला कबूल करावें लागेल. यांत संशय नाहीं. अधिक काय सांगूं ! माझ्या अंगीं तें वर्णन करण्याची शक्ति नाहीं.

तिलोत्तमा तुला ऐकून ठाऊक असेलच. जिचा, प्रत्येक स्त्रीचें तीळतिळ सौंदर्य घालून ब्रह्म देवानें देह उत्पन्न केला. तिचें वर्णन मीं ऐकिलें आहे. त्यावरून तिलोत्तमाही इची बरोबरी करण्यास समर्थ होणार नाहीं. अशी खात्री आहे. इला पाहिल्यावर त्या विधात्याच्या कसबाची मी तारीफ केली ! त्याला मात्र इचें खरें वर्णन करितां येईल. आणि पण मनावर घेईल तर अशी दुसरी एखादी मनोहर मूर्तिही उत्पन्न करील. पण नाहीं, कारागिरांचें देखील प्रत्येक वेळीं कसब सारखें उतरत नाहीं. असें मला ठाऊक आहे.

सगु० तुझें आतां पांडित्य पुरे कर. आतां ती सुंदर होती. एवढें मी समजल्यें. पुढें सांग पाहूं ?

सुमं० अगे, तूं नहीं समजलीस, माझें मात्र मन विरस केलेंस ! सगळें सांगूं देत नाहींस हें काय ! माझ्या डोळ्या पुढें ती आतां उभी होती, तेव्हां तिचें साधारण तरी वर्णन करून या जगांत धन्यता पावलों असतों. तीं संधी मात्र घालविलीस, बरें पुढें ऐक आतां. कोठ पर्यंत सांगितलें. ( आठवलेंसें करून ) हां त्या दोन स्त्रिया होत्या मधां पासून जिचें मी वर्णन करितों आहें, ती धाकटी. ती नुकतीच बाल्य दशेंतून तरुणावस्थेंत आली आहे. तिचें वय पंधरा सोळा वर्षांचें असावें. असा मीं अजमास केला आहे. थोरलीचें वय सुमारें पंचवीस वर्षे. तीही सुंदर आहे. त्या दोघींचा तोंडवळा अगदीं एकसारखा आहे. तेव्हां बहुत करून त्या बहिणी बहिणी असाव्या असें वाटतें.

सगु०—त्या कोणाच्या मुली, त्यांचीं नावें काय, हा तूं शोध केला आहेस काय ?

सुमं०—नाहीं, कुठें इतकें माझें चांगलें दैव आहे तिचा शोध लागावयास ! अगे, तिला पुरतें डोळेभर पहाण्यास सुद्धां मिळालें नाहीं. बाबा जवळ होते, तरी चोरून चोरून तिकडे पाहिल्या शिवाय राहिलों नाहीं. आणि तीही आपल्या परिजनांस चोरून मजकडे पहात होती, म्हणूनच तिचा मुख चंद्र मला सगळा पहावयास मिळे, पण तृप्ती होईना. तिला

पहाण्याची इच्छा उत्कट होई. इतक्यांत त्या मोठया स्त्रीनें पडदा लाविला तेव्हां आभ्रानें जसा एकाएकीं चंद्र आच्छादित व्हावा, तशी ती रमणी पडद्यानें आच्छादिली गेली. त्यावेळीं माझ्या पूर्ण सुखास आड आल्यामुळें मला त्या थेरडीचा इतका राग आला कीं, जाऊन तीचे तुकडे तुकडे करावे. इतक्यांत उतरावयाची घाई झाल्यामुळें चोहोंकडून नौका एकत्र होऊन फार गर्दी झाली, तोफा सुटूं लागल्या, हत्ती घोडे मेणे पालख्या इत्यादिकांची तीरांवर एकदम गर्दी झाली; आनंदाचे घोष होऊं लागले. भालदार, चोपदार, ललकारूं लागले. मुजरा करण्या करितां प्रधानादिसरदार, मुत्सदी, मानकरी, बडे लोक, वर दुतर्फा रांगेनें उभे राहिले. राजावर पुष्पांचा वर्षाव होऊं लागला. यामुळें तिची माझी चुकामुक पडली पुढें चोहोंकडे कावध्या बावऱ्या सारखी पाहतांना ती मला एकदां आढळली. तथापि तिचें दर्शन पुढें मला झालें नाहीं. तेव्हां पासून मी अगदीं वेडा झालों आहें.

सगु०—बरें तिचें तरी तुझ्याकडे चित्त आहे. अशी तुझी खातरी आहे काय!

सुमं०—होय, आहे खचित असें मला वाटतें!—पण असेंही आहे, जेच्याकडे आपलं चित्त असेल तिनें आपणाकडे जरी सहज पाहिलें, तरी ोति पूर्वक पहात आहे! असें वाटतें! तेव्हां मलाही तसें वाटलें नसेल कावरून; कसेंही असो; तिच्या प्राप्ती शिवाय आतां मी जगत नाहीं; ाझें काय होणार असेल तें एक जगदीश जाणे!! मला तर आतां माझी डगत दीसत नाहीं.

सगु०—उतावळा होऊं नकोस; जरा धीर धर, त्या कोणाच्या मुली र्के समजतें तरी बरें होतें असतें; तथापि तूं धैर्य सोडूं नकोस. मी ति ा शोध करीन—तूं नीज—मी जात्यें आतां.

इतकें सांगून सगुणा घरीं गेली; पण सुमंत रावास नीज पडेना. तो छान्यावर तळमळत राहिला.

भाग २ रा

"श्री० मणिदत्त यांस"

"श्री० नाना साहेब यांस कांहीं जवाहीर, बंदुका, तरवारी, इत्यादि सामान घ्यावयाचें आहे. करितां आपण येथपर्यंत येण्याची तसदी घ्यावी कळावें.

"भा० सरनोबत,
खासगी कडील कारभारी.,,

दुसरें दिवशीं सकाळीं मणीदत्त शेट, सुमंत रावाचा धनी, आपल्या दुकानांत लोडाशीं टेंकून बसला होता; इतक्यात वरील मजकूराची चिठ्ठी त्यांचे हातीं आली. ती त्यानें सुमंत रावाच्या हातीं दिली; आणि त्यांस तिकडे जाण्यास सांगितलें.

नंतर सुमंत राव माडीवर जाऊन पोषाख करून खालीं आला, तों घोडा सज्ज करून चाकर वाट पहातच होता; त्या घोडयावर बसून तो नाना साहेबाच्या वाडयाकडे निघाला.

सुमंत राव हा पराकाष्ठेचा देखणा होता, आणि त्याचें वयही जास्त नव्हतें; नुकतेंच कुठे विसावें वर्ष लागलें होतें. लहानपणा पासून त्याचे बहुतेक दिवस सुखानें गेले होते, यामुळें त्याचें शरीर सूदृढ होतें. सूर्य नुकताच वर आल्यामुळें त्याचे कोमल किरण मधून मधून त्याच्या तोंडा वर चमकत असत. तेणें करून तो त्यावेळीं विशेष तेजस्वी दिसत होता.

नाना साहेब हा चंद्रनगरच्या मणिपाल राजाचा सेनेवर मुख्य अधि कारी होता. पण कांहीं कारणावरून नाना साहेब हा राजाचा मनांतून द्वेष करीत असे, इतकेंच नव्हे. तर कोणत्या प्रकारें त्याचा घात करितां येईल, ही त्यास एक काळजीच लागून गेली होती. अशा प्रकारें तो स चिंत आपल्या दिवाणखान्यांत बसला असतां एक शिपाई धांवत येऊन ह्मणाला, महाराज, आपल्या राजे साहेबांचे सावत्र बंधु जयपाळ यांची स्वारी येत आहे. इतकें ऐकतांच तो आनंदीत झाला; आणि पुढें होऊन जयपालास हातीं धरून आंत घेऊन आला. आणि दोघेही लोडाशीं टेंकू

न बगल्यावर चाकरास खालीं जावयास सांगून जयपालानें बोलण्यास आरंभ केला.

जय०— मित्रा, कशी काय तजवीज केलीस ! माझ्या तर रात्रं दिवस तो जसा रावणाच्या राम किंवा कंसाच्या कृष्ण तसा डोळ्यां पुढें दिसतो ! काय करावें आणि काय न करावें हें सुचत नाहीं. जेव्हां कांहीं मी त्याचे तुकडे तुकडे झालेले आपल्या डोळ्यांनीं पाहीन; तेव्हांच माझें समाधान होईल ! मला ह्मणजे त्यानें अगदीं तुच्छ मानावें अँः ! मी कोणीच नव्हे ! माझा हक्क कांहींच नाहीं ! हा मात्र काय तो टिंबोजी बुवा! बरें, ह्मणावें पहा कशी घेतों ती तुझी खबर ! काळोख्य रात्रीस एकटाच येईन दुसरें कांहीं न साधेल तर—आणि हीच तरवार ठेवीन तुझ्या मानेवर मग तुला आठवेल आपला अन्याय; आणि जयपाल आपल्या बरोबरीचा आहे असेंही वाटेल. अन्याय स्विकारिल्यानें आजपर्यंत कधींच कोणाचें बरें, झालें नाहीं. हें तुझ्या स्वप्नींही नाहींना ! बरें, बच्चाजी; तूं माझा आतां उघड शत्रु बनलास ! आतां मला तुझी दया यावयाची नाहीं? आणि येतांही नये? अन्यायास शिक्षा झालीच पाहिजे त्या ठिकाणी दया काय कामाची ! !

नाना०— रावजी, काय हें? जरा धीर धरा. ईश्वर कृपेनें सर्व कांहीं आपले बेत सिद्धीस जातील! हें अभ्र आलेलें आहे, तें फार वेळ राहणार नाहीं? आज उतावळी करून आपलें कांहीं साधावयाचें नाहीं. मणिदत्ताकडे आज सकाळीं मनुष्य पाठविला आहे: शस्त्रादिकांची तयारी झाल्यावर आणखी थोडे बहूत आपल्या लष्करांत शिपाई ठेविले पाहिजेत. अशी कांहीं तयारी झाल्या शिवाय उगीच घाई केल्यास जीव मात्र धोक्यांत पडतील !

जय०— हां, ती हकीगत सांगण्याची राहिली. परवांच्या रात्री मी हिंमत रावाकडे गेलों होतों; तो ह्मणाला, "सर्व फौज फितूर केली आहे. आज उघड रीतिनें जरी बंड उभारिलें तरी राजाच्या पक्षास दहा शिपाई देखील मिळावयाचे नाहींत, "ह्मणून मीं ह्मणतों कीं, आतां कांहीं तयारी

आपणास नको आहे. तो एक रिपु नाहींसा झाला कीं सर्व राज्य आपलें आहे.

नाना०—( हसून ) आतां आपण लौकरच राजे बनणार ऐकून आतां तुमच्याशीं जपून वागलें पाहिजे. पण आजपर्यंत कधीं कांहीं मजकडून चूक झाली असेल. तो विसरा पण हा आधी नाहींतर कांडात काढाल एखादें.

जय०—( हंसत ) कां, थटेला केलात आरंभ तुह्मीं. बरें ते असो; पण इतक्यांत शीपाई आपल्याकडे येत आहे असें पाहून तो एकदम गप्प राहिला. तो शिपाई नाना साहेबांकडे पाहून ह्मणाला महाराज, मणिदत्त यांचा कोणी एक मनुष्य खालीं आला आहे. तो आंत येण्याची परवानगी मागत आहे. नाना साहेब ह्मणाले, जा त्यास आंत घेऊन ये. पुढें तो शिपाई सुमंत रावास घेऊन वर आला; त्यास पहातांच उठून नाना साहेबांनीं आपल्या लोडाशीं त्याला बसविलें. आणि त्यापुढें एक यादी टाकिली. सुमंत रावानें यादी वाचून पाहिल्यावर नाना साहेब ह्मणाले, या प्रमाणें आह्मांस वस्तू पाहिजेत; पण त्यांतील तरवारी व बंदुका अगदीं नव्या असाव्या. आठ पंधरा दिवसांत मिळाल्या तरी हरकत नाहीं. माल उत्तम असावा. आणि ही गोष्ट मात्र गुप्त असावी ! हुकुमा प्रमाणें माल तयार करून देतों असें सांगून सुमंत रावानें त्याचा निरोप घेतला; आणि खालीं उतरून घोड्यावर स्वार होऊन घरीं आला.

त्या दिवशीं सुमंत राव कांहीं निमित्य सांगून दुकानांत न येतां वरवारींतच तळ घरांत पडून होता. त्याला एकेक पळ युगा सारखें मोठे वाटूं लागले. असा तो त्याचा सगळा तिवस मोठ्या दुःखात गेला. त्याची दुःख विभागी एक कायती सगुणा, ती केव्हां येऊन त्यास भेटत असे. तेणें करून त्याच्या जिवास जरा समाधान वाटे. दरवाजा उघडून सगुणा सुमारें चार घटका रात्रीस आंत आली, त्यावेळीं तिचा चेहरा आनंदीत दिसत होता. तिच्या हातांत एक पत्र होतें. तें तिनें सुमंत रावाच्या हातीं दिलें. तें त्यानें वाचून पाहिल्यावर त्याची मुद्रा कांहीं आनंदीत दिसूं लागली; तथापि त्याच्या लक्षांत बरोबर मजकूर आला नाहीं; ह्मणून त्यानें फिरून वाचण्यास आरंभ केला:—

प्राण पती यास.

आपणास एकदम प्राण पती ह्मणणारी कोण ? असा संशय येऊन आपण घोटाळ्यांत पडाल ह्मणून संशय निवारणार्थ आधीं दोन शब्द लिहित्यें. काल सकाळीं राजाची स्वारी नदींतून परत येत असतां, आपल्या दर्शनानें जिचें तन मन सर्व हिरावून नेलेंत ती अभागी आपल्या चरणाची दासी ही रत्न माला होय ! आपण माझ्या डोळ्यां पुढून नाहींसे झाल्या पासून माझी स्थिती कशी झाली ती सांगतां येत नाहीं ! आपल्या दर्शनानें जें आपल्या ठिकाणीं दृढतर प्रेम बसलें आहे; तें वियोगानें खाणें पिणें कांहीं रुचूं देत नाहीं ! निद्रा येत नाहीं, अशी जिवाला एक सारखी तळमळ लागून गेली आहे आणि त्यांत आपलें दर्शन पुन्हां होण्याची आशा नव्हती पण ईश्वर कृपेनें होईल असें वाटतें. या कामांत सगुणी बाईचे अनंत उपकार माझ्या शिरावर आहेत. ते कशानेंही कधींच फिटणार नाहींत. आतां तिची व माझी गांठ कशी पडली. हें ती आपणास सांगेलच. जिवालगा! मला. आपली ह्मणणार नसल्यास मला एकवार दर्शन तरी द्यावें! इतकें आपल्या पायापाशीं माझें मागणें आहे! तें न दिल्यास या भूमंडळावर माझें रहाणें होत नाहीं! माझ्या ठिकाणीं आपलें प्रेम आहे. असें या सगुणीच्या तोंडून मला समजलें आहे; पण तिच्या सांगण्यावर माझा विश्वास बसत नाहीं. मला जशी आपलें दर्शन घेण्या विषयीं उत्कंठा लागून गेली आहे. तसी मला पहाण्या विषयीं आपणास जर असेल, तर माझ्या सारखी भाग्यवान् यापृथ्वींत दुसरी कोणी नाहीं! असें मी मानीन. मी मनोभावें करून आपणास वरिलें आहे; आपण माझा आदर कराल अशी माझी अद्यापि खात्री नाहीं! पण एकवेळ होईल तितकें त्वरित दर्शन द्यावें. इतकीच या दासीची विनंती आहे.

आपल्या चरणाची दासी.
रत्नमाला

हें पत्र दोन वेळ वाचूनही त्याच्या मनाची तृप्तता होईना? ह्मणून तो पुन्हा वाचूं लागला. तेव्हा सगुणी ह्मणाली, "दादा? पण त्याचें उत्तर

माझ्याजवळ लिहून दे! आणि मग बैस वाचीत त्यावेळ "सुमंत राव ह्म णाला "अगे,जरा धीर धर तरी! पुन्हां मी एक वेळ पत्रा बद्दल विचार करून पहातों आणि मग तुला उत्तर देतों " असें सांगून तो फिरून प त्र वाचून आपल्याशीं विचार करूं लागला तो ह्मणाला, "एकदम प्राण पती ह्मणणारी कोण हा मला संशय लागेल! हो! लागेल खाचित. तूं प्राण पती ह्मटलेंस हे कोणाला? मलाचना; पण मी कोण, हें तुला कोठें आहे ठाऊक? माझें पत्रावर नांव नाहीं गांव नाहीं मग मलाच असें मी कशावरू न ह्मणूं! माझ्या हातीं पत्र आलें एवढ्या वरूनच कीं नाहीं? तें चुकून आलें नसेल कशावरून? — नदींतून राजाची स्वारी परत येतांना दर्शन झालें, तोच मी खाचित; पण तूं आधीं कोण हें मला कोठें आहे ठाऊक! मला वेडा करून सोडणारी तीचना तूं ह पत्र लिहिणारी! होय तीच तूं— पण मी तोचना सखे, तुजकडे चोरून चोरून पहात होतों, आणि तूं ही मज कडे मधून मधून पहात अससं! तोच मी. माझें नांव सुमंत राव— समज लीस!— माझ्यादर्शनानें भी तुझें तनमन हिरावून घेतलें हें खरेंना! हें जर खरें असेल तर मग— पण "अभागी,, कां तूं आपणाला ह्मणून घेतलेंस भी यावेळीं मोठा भाग्यवान् बनलों आहें? मग तूं अभागी कशी होशील. आजपासून जर माझ्या सुख दुःखाची विभाग घेणारी झालीस तर? पण "माझ्या चरणाची दासी "ह्मणतेस हें काय? त्या ठिकाणीं मला आ पला एक दास ह्मणतीस तरी शोभलें असतें? अगे मी तर काय पण तु झ्या दास्यत्वानें शोभणार नाहीं असा कोणीही या जगांत नाहीं.— तुझें नांव "रत्नमाला,, आहाहा काय हें सुंदर नांव यांत तुझ्या आईबापाची चतुराई दिसून येते. तूं एक रत्न आहेस असें जर तीं ह्मणतीं, तर त्याची मी चूक मानिली नसती जेवढीं ह्मणून या पृथ्वीवर रत्नें आहेत. तेवढीं सगळीं मिळून तुझी बरोबरी करणारीं नाहींत. तूं "रत्नाची माला,, आहेस यांत संशय नाहीं. शानदार गे तुझें नांव पण तुझ्या नांवा सारखें माझें नांव शोभतें काय पाहूं. माझें नांव "सुमंत राव छी: असलें कसलें हें

नांव?— हें उगीच मी आपणाला लावून घेतलें ! हें देतों आतां टाकून ! आणि माझें खरें नांव काढितों. आतां बाहेर ! तें कसें छानदार तुझ्या जाड्याला शोभेल !—तुझी स्थिती कशी झाली हें तुलाही सांगतां येत नाहीं. अं:— पण मीहो शब्द वेडा बनलों आहे ! मीं या अंधार कोठडींत असतों ह्मणून बरा ! नाहीं तर जो तो मला वेडा नसताका ह्मण ता!— माझी स्थिती तुझ्या पेक्षां शंभरपट वाईट ! दृढतर प्रेम बसलें आहे. हें जर खचित् असेल, तर माझें तुझ्या ठिकाणीं कितितरी पटीनें जास्त आहे. हें शपथ वाहून सांगेन पाहिजे तर— पण नको शपथ ! शंभर शपथां पेक्षां हें माझें बोलणें जास्त मोलाचें आहे, —खाणें पिणें कांहीं रुचूं देत नाहीं, निद्रा येत नाहीं, आणि जिवाला एक सारखी तळ मळ लागून गेली आहे, हें खचित ( पण असें असेल तर मी तुला अनुसू ये पेक्षांही मोठी साध्वी ह्मणेन— रत्नमाला, रत्नमाला या तुझ्या नांवाचा जप केल्यास महान् महान् पातकांचें निरसन होईल; यांत कांहीं शंका नाहीं ! अहोल्या, द्रौपदी, सीता यांत तुझें नांव आरंभास शोभेल. खचित तूं महान साध्वी आहेस. मी खाणें पिणें त्याज्य केलें आहे हें समजून वाटतें तूंही तें टाकलेंस. दर्शन होण्याची आशा नव्हती पण ईश कृपेनें आतां होईल असें वाटतें. मग तुझें दर्शन आतां मलाही होईल—पण केव्हां बरें ! उशीर नको ! घटका किंवा पळ गेलें तरी मला शंभर युगां पेक्षां जास्त वाटेल.— सगुणा बाईचे अनंत उपकार आणि ते कधींही फिटणार नाहींत, हा तुझ्या शिरावर भार झाला प्रिये, तुझ्यां कोमल शरि रा वर नाहीं मी इतकें ओझें ठेवावयाचा, मी सगुणीस सांगेन आणि तें सर्व माझ्या शिरावर वेईन:—गांठ कशी पडली हें ती सांगेल,—हूं वि चारीन तर तें आतां—जिवलगा,—वः या एका शब्दानें जो मला आनंद झाला, तो किती ह्मणून सांगूं याचें माप कोणीही करूं शकणार नाहीं. धन्य हा सुमंत राव प्रिये, मला जिवलग ह्मटलेंस एवढ्यानेंच धन्य झालों मला आपली ह्मणणार नसल्यास छे हें काय बरें एक वेळ नव्हे, शंभर वेळ तुला मी आपली ह्मणतों माझी नव्हे असें जर माझ्या मुखानें येईल तर हें मुख

नव्हेंच माझें असें ह्मणून ही माझी जीभ कापून टाकीन आणखी काय सांगूं तुला: एकवार दर्शन दे पुन्हा आणखी एकवार ह्मणतेना? पायांपाशीं मागणें मी तुझा दास आहें असें सांगितलेंना? मग आतां मजजवळ मागणें कसचें मागतेस; "भु मंडळावर रहाणें होंत नाहीं जळो हें भुमंडळ. यांतून कधीं तरी तूं मला किंवा मी तुला टाकून जावें लागेल. मग आपण या ब्रह्मानंदाच्या सुखास एकदम मुकूं हरहर आपणावर असा प्रसंग येऊन ठेपला ह्मणजे मग कसें होईल सुंदरी त्या काळाचा इलाज चालणार नाहीं अशा एखाद्या स्थळीं आजपासून आपण जाऊन राहूं— "माझें तुजवर प्रेम आहे असें सगुणीनें सांगितलें"— आहागे सगुणे तुझे मी उपकार कसे फेडूं; ह्मा माझ्या सर्व सुखास कारण तूं आहेस. नाहींतर या सुमंत रावाची आज काय अवस्था झाली असती ती मनात सुद्धां आणवत नाहीं. नको तो भयंकर प्रसंग माझ्या वैऱ्यास देखील न यावा — "तुझा विश्वास बसत नाहीं नाहींगे सुंदरी? माझी सगुणा कधींही खोटें बोलत नाहीं तूं तिच्यावर पूर्ण विश्वास ठेवण्यास ती योग्य आहें— माझें दर्शन घेण्याची तुला उत्कंठा लागली आहे, तशी मलाही असेल तर तूं भाग्यवान— अगे, आहे—अजून तरी मजवर विश्वासमान आतां मात्र तिळभरही मनांत संशय ठेऊं नकोस? तूं मनो भावें करून मला वरिलेंस — खाचित ना खाचित; खाचित ह्मण पाहूं; माझ्या गळ्याची शपथ गे खाचित तूं मला मनो भावें करून वरिलेंस.— अगे सांग काय तें?— ह्मण एकदां वरिलें असें? उत्तरही देतनाहींस आतां कां मौन्य धरिलेंस एकदां ह्मण खचित असें अहाहा;? कितीगे तुझी विनवणी करीत आहे माझी तुला दया येत नाहीं. अगे माझ्यानें धीर धरवत नाहीं ह्मण, ह्मण, वरिलें असें नाहींना ह्मणत नाहींतर एकूण— पण इतकें मात्र लक्षांत धर कीं न ह्मणशील तर मला आपल्या जिवितावर पाणी सोडावें लागेल अगे, तुझ्या मी पायां पडतों पदर पसारितों मजकडून असें करून घेण्यांत तूं भूषण मानितेस ना? मी तुझ्या दास पणालाही योग्य नाहीं काय? नाहीं तर, आशा सोडावी आतां तूं नाहीं ह्मण ह्मणजे सुटली आशा असें ह्मणून ती रत्नमालेची हनु

बटी धरावयास गेला तों त्याठिकाणीं कांहीं नाहीं. असें पाहून अगदीं खजील झाला- आणि त्याच्या डोळ्यां वाटे अश्रु धारा वाहूं लागल्या असें पाहून दुःखीत होत्सातीं सगुणी ह्मणाली, आतां काय करावें दादा विना कारण कां डोळ्यांतून अश्रु गाळित आहेस तूं! जिच्या अप्राप्ती मुळें इतका शोक करित आहेस तिची तुझी गांठ लौकरच पडण्याचा समय येऊन ठेपला आहे! मग असें कांबरें! आतां पत्र लौकर लिहून दे, ह्मणजे तिची तुझी गांठ लौकर पडेल असें मी करीन.

सुमं०—सगुणें, तुं सांगतेस हें खरें तरी!

सगु०खरें, माझ्यावरही तुझा विश्वास नाहीं? आज रात्रीं तुझी तिची गांठ पडेल पण पत्र मात्र लिहून दे?

सुमं०— अगे, पण पत्र काय लिहावें हें अगदीं सुचत नाहीं. अशी अवस्था झाली आहे? बरें पण माझी प्रिया तुला कोठें भेटली. किंवा तूंच तिचा शोध काढलास, कीं तीच तुझ्याकडे आली. हें घडलें तरी कसें? हें सांग केव्हां ऐकेनसें झालें आहे जिनें मला वेड लाविलें आहे, जिच्या अदर्शनामुळें मला चैन पडत नाहीं, जिच्या भेटीची मला आशा नव्हती ती तुला कोठें भेटली हें मला लौकर सांग? अगे माझ्या पेक्षां तूं दैववान खरी. तूं तिला पाटभर पाहिलेंस. तिच्याशीं कांहीं बोललीसही असशील ती माझ्या विषयीं काय ह्मणाली!

सगु०— दादा, तूं आज सकाळचा कोणीकडे फिरावयास गेला होतास

सुमं०— होय, आज मी नानासाहेबाच्या वाड्यांत गेलों होतों.

सगु०— जेव्हां तूं तिच्या दारावरून आलास तेव्हां तिनें तुला पाहिलें आणि तुझा शोध लावण्या करितां तिनें आपली दासी पाठविली. ती दासी तुझ्या मागून आमच्या वाड्यापर्यंत आली. तूं येथें असतोस इतकाच शोध लावून ती माघारी गेली. पुढें पुन्हा तिच रत्नमालेच्या हळदी कुंकवाचा निरोप घेऊन मजकडे आली. तेव्हां मी तिकडे गेल्यें.

सुमं०— बरें, तिनें माझा तिरस्कार तर केला नाहींना; मी कोण, असतों कोठें, माझें नांव काय, माझ्या घरीं माणसें कोण कोण आहेत; हें तिणें तुला

विचारिलें असेल मग तूं सांगितलें असशील कीं, तो माझ्या घरीं चाकर आहे ह्मणून. मग तरी तिनें खाचित नाक मुरडलें असेल अहाहा मी जर आज राजपुत्र असतों तर किती बरें बरें झालें असतें मग ती मला कंटाळली नसती दैवानें मला दुसऱ्याचें चाकर करून सोडिलें ओं हें जेव्हां तिला कळेल तेव्हां ती काय ह्मणेल कीं, ज्याच्यावर आपलें मन बसलें तो आपणास योग्य नाहीं. मी नीच कुलोत्पन्न नाहीं, अशा बद्दल खरें खरें जरी सांगितलें तरी तिला खरें वाटणार नाहीं.

सगु०— दादा, असे भलभलते संशय कां घेतोस तूं! तिनें तुझा तिरस्कार केला नाहीं? किंवा तिनें तुला हलका मानिला नाहीं. तूं आमच्या घरीं चाकर आहेस असें मी कां सांगेन. अशाबद्दल तिनें वाटाघाट केली नाहीं! ती इतकें मात्र ह्मणाली कीं; त्यांच्या कुलशिलाबद्दल चौकशी करायाला नकोच. खाचित ते कुलीन आणि सुशिल आहेत असें मी अनुमान केलें आहे तेव्हां आतां वेळ न लावितां पत्र मात्र लौकर लिहून दे कीं मग झालेंच तुझें काम!

सुमं०— बरें तर, लिहितों हां पत्र आतां! असें सांगून त्यानें पत्र लिहिण्यास आरंभ केला:—

प्राणसखी रत्नमाला

इम.,

"आशीर्वाद विशेष. तूं मला प्राणनाथ ह्मटलेंस तेणें करून जो मला आनंद झाला आहे तो लिहितां येत नाहीं. आज मी गगनांत मावणार नाहीं इतका मोठा झालों आहें ह्मणजे माझ्यासारखा दैवशाली या पृथ्वींत दुसरा कोणी नाहीं असें मानीत आहें. प्राण वल्लभे तुझें पत्र हातीं येण्यापूर्वी मी दुःखार्णवांत बुडत होतों पण ह्या तुझ्या पत्रानें अगस्ती प्रमाणें दुखार्णव शोषून टाकिल्यामुळें आतां आनंद समुद्रांत पोहत आहें. तुझ्या हातच्या अक्षराचें आलेलें पत्र शंभर वेळां आपल्या डोक्यावर ठेविलें आणि त्याचें प्रीतीनें चुंबनही केलें. यापत्रावरून तूं अमह्य दुःखांत आहेस हेंही जाणिलें पण तुझें दर्शन झाल्या दिवसापासून आजपर्यंत तुझा दास

मी बनलों आहें तुझ्या प्रित्यर्थ प्राण जरी खच करावा लागला तरी मला त्यांत आनंद आहे मग अजून दुःखांत कां तूं राहिली आहेस हें पत्र तुझ्या हातीं पोंचण्या बरोबर तूं या ठिकाणी येऊन मला भेटावेंस. मीहि तुजपर्यंत आलों असतों. पण तसें करण्यापेक्षां तूं इकडे येणें हें बरें. यापेक्षां अधिक तुला काय लिहावें हें मला आतां अगदीं सुचत नाहीं. ह्मणून पत्र पुरें करितों.

तुझा आज्ञा धारक
सुमंत राव

याप्रमाणें पत्र लिहून लखोटा करून सुमंत रावानें सगुणीच्या हातांत दिला. तो घेऊन ती चालती झाली.

सगुणी गेल्यावर सुमंत राव आज आपणास आपली प्राण वल्लभ भेटेल, अशा आनंदानें तिची वाट पहात बसला आहे दाराकडे कुठें कांहीं वाजलें कीं तिकडे लक्ष द्यावें. पुन्हा त्यानें तिच्या येण्यास कांहीं प्रतिबंध नाहींना होणार असा संशय घ्यावा. पुन्हां पुढें आपल्या येणाऱ्या सुखांत आपले कसकसे दिवस जातील, असा विचार करीत बसावें. त्यावेळीं त्याकडे पहाणारास मोठें आश्चर्य वाटण्याजोगें होतें ! त्याच्या मनाचे विकार क्षणोक्षणीं पालटत होते. अशा वेळीं घुंगूर वाजलेले त्याच्या कानीं पडले. मग त्याचा आनंद काय विचारावयाचा.त्याचे नेत्र दरवाजाकडे लागले. आणि ती चंद्रानना ( रत्नमाला ) त्याच्या दृष्टीस पडली.

त्या परास्परांची दृष्टी एकमेकांकडे लागून तीं तटस्थ झालीं. त्यांच्या डोळ्यांतून आनंदाश्रु निघाले. पण तोंडांतून शब्द निघेना, आणि काय बोलावें हेंही सुचेना; अशी त्यांची अवस्था झाली. त्यावेळीं तीं चित्राप्रमाणें दिसूं लागली !

इतक्यांत एकाएकी मागचा दरवाजा उघडून कोणी स्त्री आंत आली. ती क्रोधानें संतप्त झाली होती. तिला पहातांच रत्नमालेच्या तोंडचें पाणी पळालें. हात पाय लटलटां कांपूं लागले, आंगांतून घामाच्या धारा वाहूं लागल्या; अशी रत्न मालेची अवस्था होऊन ती मागाहून आलेल्या

स्त्रीसह निमूटपणें आपल्या घराकडे चालती झाली.

सुमंत रावास हें वर्तमान काय आहे हें समजेना. तो मोठ्या विचारांत पडला, त्याच्या मनांत अनेक तरंग उद्भवूं लागले; इतक्यांत मागच्या दरवाज्यानें एक खड्ग धारी पुरुष आंत आला तो वयानें सुमारें चाळीस वर्षांचा असून तेजस्वी दिसे; त्यावरून तो मोठया कुळांतला असावा; असें दिसत होतें. असा तो एकदम सुमंत राव बसला होता त्याठिकाणीं आला.

त्यास पहातांच सुमंत राव थोडा चपापल्या सारखा होऊन, भिंतीवर तरवार टांगलेली होती ती घेण्यास सरसावला.

भाग ३ रा.

सुमंत राव तरवार घेण्यास सरसावलेला पाहून तो खड्गधारी पुरुष हलक्या स्वरानें ह्मणाला, मित्रा, मज पासून तूं भय मानूं नकोस, उलटें तुजकडेसच मी अभय मागण्यास आलों आहें. ह्यासाठीं ती तलवार माझ्या रक्षणार्थ मात्र आपल्या हातीं घे माझ्या मागून शत्रू येत आहेत.

इतकें तो बोलत आहे तोंच दरवाजांत त्यास, कोणी आल्याची चाऊल समजली, तेव्हां तो घाबऱ्या घाबऱ्या ह्मणाला, मी जातों वरच्या मजल्यांत, आतां माझे रक्षण आपल्या शिवाय दुसरा कोणी करणारा नाहीं. असें ह्मणत तो तसाच वरच्या मजल्यात गेला. इकडे दरवाजांतून दोन असामी आंत शिरून दिव्याच्या प्रकाशानें एकदम सुमंत रावापर्यंत येऊन पोहोंचले.

या दोघांचीही मुद्रा भयंकर दिसत होती. हातांत तरवारी चमकत होत्या, व धापा टाकीत होते, तशांतच मागें पुढें पहात सुमंत रावास ह्मणाले, महाराज नुकताच कोणी आमच्याप्रमाणें हातांत तरवार घेतलेला आंत आला आहे काय ? सुमंतराव ह्मणाला नाहीं महाराज, मवांपासून मी येथेंच आहें; पण आंत कोणी आलेला पाहिला नाहीं. ते ह्मणाले, आह्मी आपले उपकार विसरणार नाहीं, इतकेंच नव्हे तर आपणास मोठें बक्षिस देऊं, पण तों पर्यंत( खिशांतील मोहरा काढून ) हें घ्या बक्षीस.

सुमंत राव ह्मणाला, "महाराज, आपल्या कृपेनें असा कांहीं मी दरिद्री नाहीं कीं त्या मोहरा मिळाल्यानें मला कांहीं आनंद होईल! आपल्या सारख्यांची कृपा संपादनार्थ मात्र मी आपल्याशीं कांहीं चोरिलें नगतें ख रोखर सांगतों, इकडे कोणी परकी मनुष्य आला नाहीं. ,, इतक्या सांग ण्यानें ते संशय मुक्त होऊन आल्या वाटेनें मागें परतले. त्यांस पोंचवीत सुमंत राव दरवाजा पर्यंत जाऊन दरवाजा बंद करून पुन्हां आंत आला आणि आंतील लपणा-यास हांक मारून ह्मणला, "महाराज, या आतां इकडेस. निर्भयपणानें या. ,, इतके शब्द त्याच्या कानीं पडतांच तो हळू च दार उघडून बाहेर आला आणि सुमंतरावास आलिंगन देऊन ह्मणाला मित्रा, आज मजवर तुझे अनंत उपकार झाले आहेत ! जर आज आप ली गांठ न पडती तर माझे प्राण वांचण्याचा संभवही नव्हता !

सुमं०— महाराज, आपल्या सारख्यांचा घात करूं पहाणारे हे को ण बरें असावे. हें जाणण्याची इच्छा आहे. हे माझ्या तोंड ओळखीचे आहेत; पण यावेळीं नांवें लक्षांत येत नाहींत.

खड्ग०— पण मी कोण हें आपणास आहे का ठाऊक ?

सुमं० — होय महाराज. आपल्या तेजानें सर्व जग प्रकाशित करणा ऱ्या सूर्य नारायणास जाणत नाहीं, असा कोणी असेल काय ?

खड्ग०— छेः ! छेः ! ! नको या हत भाग्याला एवढी उपमा ज्यांस अशा प्रकारचीं संकटें भोगावीं लागतात, त्यांच्या थोर पणाला नमस्कार असो !

सुमंत०— नाहीं महाराज अशा संकटांनीं थोरपणास कधींही उणेप णा यावयाचा नाहीं ! त्या जगत्प्रकाशकांस राहू, केतू, त्रासदायक आहेत. ह्मणून त्यांस उणेपण आलें आहे काय ? कधीं काळीं कांहींवेळ त्यांना ही दुःख भोगावें लागतें, एवढें खरें.

खड्ग०— जर आपण मला जाणतां हे खरें; तर सांगा बरें, मी कोण आणि माझें नांव काय !

सुमं०— या राज्यांतील संपूर्ण प्रजाजन, ज्या वृक्षाच्या आश्रय

खालीं छाया सुख अनुभवीत आहेत. ज्यानें माणिपाल नांव धारण केलें आहे ते आपण.

माणि०— ठीक आहे आपण जाणत आहां आतां हे शत्रु कोण सांगतों ज्यानें माथाचा पोषाख केलेला पण जो पहातांच राजकुलांतील पुरुष असा कोणासही भास व्हावा. व ज्यानें आपणाशीं पहिल्यानें बोलण्यास आरंभ केला; तो माझा सावत्र बंधु, त्याचें नांव जयपाल; व दुसरा आमचे पदरचा एक सरदार आहे; त्याला नाना साहेब असें ह्मणतात आतां असें वैमनस्य कां उत्पन्न झालें हें सांगण्याची ही वेळ नाहीं. आतां पुढें आत्मसंरक्षणाची युक्ति काय करावी. इकडे माझें लक्ष लागून गेलें आहे

सुमं०— ( कांहीं आठवल्या सारखें करितो. )

माणि०— कां विचारांतसे पडलां आपण,

सुमं०— कांहीं नाहीं. पण या कामीं जर माझा कांहीं उपयोग होण्या जोगा असेल तर महाराजांनीं बिन हरकत करून घ्यावा. असें पादासाचें ह्मणणें आहे.

माणि०— वः ! हे थोर मनाच्या माझ्या मित्रा तूं मजबद्दल काळजी वाहतोस एवढ्यानेंच मी तुझे आभार मानितों. अशा कामीं एखादे वेळें प्राणावरही येऊन बेतण्यासारखें आहे, ह्मणून त्या भरीस तूं पडावेंस, असें मी इच्छित नाहीं.

सुमं०— महाराज, आपल्या सारख्याच्या प्रित्यर्थ प्राणही खर्च करण्यास मी कबुल आहें ! आपण सुखी असल्यानें सहस्त्रावधी जीवांचें रक्षण होण्याजोगें आहे, ह्मणून तुमच्या साठीं माझ्या सारखे शेंकडो बळी गेले तरी चिंता नाहीं ! या पेक्षां आणखी कांहीं दिवस जिवंत राहिलों तरी. आपल्या जीवाचें सार्थक्य करून घेण्यास अशी दुसरी संधी येईल असें वाटत नाहीं. ह्मणून महाराजांनीं इच्छेस येईल त्याप्रमाणें ह्या दासा करवीं सेवा घ्यावी; असें आपल्यापाशीं मागणें आहे.

माणि०—अहाहा; वीर पुरुषा, तुझें औदार्य पाहून मी आनंदभरित झालों आहे आणि मी कदाचित् पुन्हा पूर्व स्थितींत आलों, तर तुझे उप

कार फेडिल्या शिवाय रहाणार नाहीं! आंतां एवढेंच तुला सांगतों कीं, आतां तुला ललित पट्टणाहून जाऊन आलें पाहिजे, तरच माझे प्राण वांचण्या जोगे आहेत.

सुमं०—महाराज, तिकडे जाऊन कोणती कामगिरी बजाविली पाहिजे. इतकें कळलें, ह्मणजे हा मी निघालों!

मणि०—सांगतों—पण याठिकाणीं कोणी परकी मनुष्य नाहींना ?

सुमं०— नाहीं,हें कांहीं रहाण्याचें घर नाहीं आहे.ही मालठेवण्याची वखार आहे. आमचें घर येथून बऱ्याच अंतरावर आहे. मी मात्र कधीं तरी याठिकाणीं बसत असतों.

मणि०— बरें, तुमचें नांव काय?

सुमं०— माझें नांव सुमंत राव.

मणि०— बरें मित्रा, आतां मी एक चिट्टी लिहून देतों, ती घेऊन ललित पट्टणांतील जयत्सेन राजास नेऊनदे. आणि तिचें उत्तर घेऊनये

असें सांगून राजानें जवळचें कलमदान घेऊन चिट्टी लिहिण्यास आरंभ केला.

श्री० जयत्सेन राज

यांस

विनंती विशेष, आपलें पत्र पोंचलें. त्यांतील मजकुराप्रमाणें व्यवस्था करण्यांत हित झालें असतें! परंतु आज अगदीं माझ्या जिवावर येऊन बेतलें आहे. आज ह्मणजे शुक्रवार वद्य १४ दिवशीं सूर्यास्ता नंतर बारा घटका रात्रीच्या सुमारास मी आपल्या वाड्यांत गच्चीवर सहलकरीत असतां अकस्मांत जयपाळ ह्याचें दालनाच्या दरवाज्यांत द्वार रक्षकांशीं तोंडास तोंड चाललेलें माझ्या कांनीं आलें. आणि त्यांतच कोठें आहे सांगा लौकर. नाहींतर आतां तुमचीं डोकीं उडवूं. असे त्याच्या तोंडचें स्पष्ट शब्द माझ्याकानीं आले. पुढें हें आपल्यावर आकास्मिक आलेलें संकट कोणत्या रीतीनें निभावतें या विचारांत मी पडलों—काय होईल तेंहोवो यांच्याशीं करावे दोन हात असा मी आपल्या मनाचा वडा करून हातां

त तरवार घेतली परंतु त्यांच्या मागें गाद्यार्थ किती लोक असतील याचा मला अजमास नव्हता तथापि कपटानें शत्रु जिंकावा असें मनांत आणून ती वर येण्याच्या दरवाजांत दारा मागें आड उभा राहिलों इतक्यांत काळा सारखे जयपाळ व नाना व त्याचा खासगी कारभारी हे वर आलेल्या वेळीं माझ्या मनाचीकशी काय स्थिती झाली होती हें आतां माझ्यानें लिहिवत नाहीं ! त्याबद्दल तुह्मीच विचार करा! समरांगणांतील काळ अशी ज्याची कीर्ति अहे, तो अगदीं यावेळीं हतवीर्य झाला खरोखर सांगतों मित्रा, समरागणांत जें व्हावयाचें त्याच्या उलट येथें प्रकार घडून आला ! ह्मणजे समरांत स्फुरण येतें. आणि या ठिकाणीं गलित व्हावयास होतें यावरून तूं मला भ्याड, निर्बल, शत्रुस पाठ दाखविणारा,, असें ह्मणून नाक मुरडशील; हें मी पक्कें जाणतों असो आतां अवकाश नाहीं पुढें तुझी माझी गांठ पडल्यावर त्याबद्दल तुझी खात्री करून देईन. असो; पुढें त्या तिघांतून नानाचा कारभारी द्वार रक्षक झाला, आणि ते दोघे मला शोधण्याकरितां पुढें निघाले, इतक्यांत मी त्या द्वारपालाचे एका घावात दोन तुकडे केले आणि दालनांत उतरलों परंतु द्वार पालाचा घात झाल्याबद्दल त्यांस समजुन ते दोघेहीमाझ्या मागें लागले तेव्हां तर माझी अगदीं पांचावर धारण बसली होती. ज्या ज्या ठिकाणीं शिपाई वगैरे लोक आढळावयाचे त्या त्या ठिकाणीं कोणी नसल्यामुळें तीं स्थळें मला भयाण दिसूं लागलीं; मला वाटतें आपला प्रधान हिंमत राव यानें त्या सर्वांस कांहीं निमित्यानें दुसऱ्या ठिकाणीं पाठविलें असावें. असो दालनांतून खालच्या मजल्यांत मी एकदांचा जीव घेऊन आलों. तरी ते दुष्ट माझ्या पाठीवर होतेच. प्राण तारणार्थ ज्या ज्या आड वाटा पाहिल्या, त्या सर्व नानाच्या माहितीच्या असल्यामुळें, त्यांस मला चुकवितां आलें नाहीं! पुढें जेव्हां भर रस्त्यांत येऊन पोंचलों त्यावेळीं आड गल्लींतील अंधारानें माझे प्राण वांचविले! किंबहुना ती काळोखी रात्रच माझ्या उपयोगी पडली असें ह्मणण्यास हरकत नाहीं! असो. त्यावेळीं मी एका आड गल्लींत शिरल्यावर माझ्या शत्रूस त्या काळोखांतून येण्यास धीर होईना तेव्हां मात्र ज

रा माझ्या जिवांत जीव आला; त्या गल्लींत राजवाड्याजवळच एका दारा तून दिव्याचा थोडासा प्रकाश बाहेर दृष्टीस पडला त्या अजमासानें मी त्या दारापाशींगेलों तोंतें दार अर्धवट उघडेंच होतें. तेव्हां मी समोर आंत प्रवेश केला तेथें मला एक भला मनुष्य मिळाला आणि त्याच्या साह्यानें च आज माझे प्राण वांचले असें ह्मणण्यास हरकत नाहीं; तो भला मनुष्य हाच कीं जो तुमच्या पर्यंत पत्र घेऊन आला आहे. असो पुढें थोडा वेळ झाला नाहीं तों ते दुष्ट माझ्या मागून आल्याची मला चाऊल समजली ह्म णून ह्या मित्राच्या साह्यानें मी तेथें जवळच लपून बसलों इतक्यांत ते दु ष्ट पुढें ह्या माझ्या मित्रा जवळ माझी चौकशी करूं लागले. पण यानें त्यांस कांहिंच पत्ता लागूं दिला नाहीं. तेव्हां ते निराश होऊन मागें परत ले. असो या मोठया संकटांतून माझे प्राण वांचले आहेत. पण पूढें काय प रिणाम होईल हें कांहीं सांगवत नाहीं. मित्रा, आतां या प्रसंगीं तुजवांचून माझें रक्षण होण्याजोगें नाहीं. हें लिहिणे नको. तर याबद्दल त्वां काळजी बहावी इतकें सांगून पत्र पुरें करितों.

आ. मी. मणि पाळ.

या प्रमाणे पत्र लिहून राजानें लखोटा करून सुमंत रावाच्या हातीं दिला. आणि सांगितलें; मित्रा जा. आतां इतकें मात्र कर कों, होईल तितक्या त्वरेनें या पत्राचें उतर घेऊन य. सुमंत राव ह्मणाला महाराज, पण आपली व माझी गांठ कोठें पडेल राजा ह्मणाला मी कोठें असेन हें आतांच माझ्यानें सांगवत नाहीं.तथापि कोठें तरी मी तुझी भेट घेईन. पुढें सुमंत रावानें पोषाख करून आपलें आवडतें पिस्तुल भरून बरोबर घेतलें. कमरेस तलवार लटकाविली. आणि निघण्यास तयार झाला. मग ते दोघे बोलत बोलत दरवाजांतून बाहेर पडल्यावर सुमंत रा वानें दरवाजा बंद करून कुलूप लाविलें आणि एकमेकांस भेटून ते दोहों कडे दोघे झाले.

मध्य रात्र लोटून गेली. आहे. शहरांतील दिवे मंद होऊन त्यांचा झु ळुक झुळूक प्रकाश पडला आहे. कोठें एखादा पहारेकरी जागा राहून बाकी

धोरत पडले आहेत. साऱ्या दिवसाच्या श्रमानें लोक श्रमुन जाऊन अगदीं निद्रावश झाले आहेत, रात्रीचा कीर्र आवाज कानीं पडत आहे अशा वेळीं आमचा सुमंत राव परगावीं जाण्यास निघाला.

नुकतेंच बंड झालेली बातमी गांवांत ज्या कोणास लागली होती त्या लोकांसही एक नवीन काळजीलागुन तिजबद्दल कोंठे कोठें चर्चा चाललेली होती बापडया शिपाई लोकांस तर हें मोठें संकट होतें राजाच्या किंवा बंडखोरांच्या कोणत्याही पक्षास हें खटलें निकालास लागे पर्यंत त्यासमिळतां येत नव्हतें खरेंच. असें झालें ह्मणजे चालत असलेल्या बंदोबस्तांत बिघाड होऊन राज्यांत अव्यवस्था होऊं लागते लबाड लुचे वगैरे लोकांस आपली कामें अव्याहत चालविण्यास सांपडतात आणि अशा प्रसंगीं सत्पुरुष मोठया संकटांत पडतात असो अद्याप बंड झालेली बातमी जिकडे तिकडे पसरलेली नसल्यामुळें वर सांगितलेलीं संकटें उद्भवण्यास जराअवकाश आहे.

सुमंत राव आडगल्लींतून जात होता, पण शेवटीं त्यास मोठया रस्त्यानें वेशींतून जावें लागलें. शिवाय गांवा बाहेर पडण्यास दुसरी वाटच नव्हती सभोंवार मजबूत तटबंदी केलेली असून जागजागीं अनेक दरवाजे राखिले होते, आणि त्या प्रत्येक दरवाजावर शिपाई लोकांचा पहारा असे अशा एका दरवाजांत सुमंत राव जाऊन पोंचला? तेंव्हां आपल्या रीती प्रमाणें उगीच त्यास एका शिपायानें भीत भीत विचारिलें; "कोणही महाराज; आपण कोठें जाणार असल्या लोकांचें उगीच विचारणें असलें तरी तें लोकांस त्रासदायक असावयाचें वरच्या प्रमाणें सौम्य शब्द त्यांच्या तोंडांतून निघावयाचेंच नाहींत; पण सुमंत रावाजवळ तरवार, पिस्तूल वगैरे साधनें होतीं तेंव्हां न जाणों कदाचित् हा त्या बंडांतिलच कोणी असला तर " कडयाचें तेल वांग्यावर " निघावयाचें अशी त्यास भिति होती. असो, सुमंत राव ह्मणाला कीं, " आपणास कुठें सरकारी कामाकरितां जावयाचें आहे, तेंव्हां हा दरवाजा उघडून द्या. कुठचें सरकार आणि काम कोणाचें व तुह्मीं कोण, इत्यादि त्यांनीं विशेष चौकशी न करितां निमुट पणें दार उघडून दिलें अशा रीतीनें मेथून सुमंत रावाची सुटका झाली

सुमंत रावास जाऊन सुमारें अर्ध घटका झाली नाहीं इतक्यांतत्याच्या मागून काळा बेरड; पण ऊंच आणि धष्ट पुष्ट असा एक असामी खांद्याव र बंदुक टाकिलेली अशा दरवाजांत येऊन पोंहोचला त्यासही शिपायानें हांक मारून विचारिलें तो ह्मणाला मी हिंमत रावाच्या कामा कारतां जा त आहें हें ऐकून त्यांतील एक शिपाई ह्मणतो बाबानो खुशाल चला आज तुमचेंच राज्य आहे तो बंदुक वाला जाऊन दहा पांच पळेंलोटलीं नसतील इतक्यांत त्याच्मा मागून एक भव्य व तेजस्वी पुरुष आला हा आमच्या वाचकाच्या ओळखीचा आहे हा मणिपाल राजा होय त्याच्या कमरेस त रवार होती त्यासही शिपायांनीं कायद्याप्रमाणे विचारिलें तो ह्मणाला मी। राजाच्या कामाकरितां जात आहें इतकें सांगून तो पुन्हा ह्मणाला मला या वाटेनें नुकताच कोणी एखादा तरुण पुरुष जातांनां तुह्मास आढळला काय? शिपाई ह्मणाले होय. महाराज एक नव्हे दोन असामी एका मांगून एक असे नुकतेच या रस्त्यानें पुढें गेले आहेत इतकें ऐकतांच तो जरा विचा रांत पडल्या सारखा झाला आणि तसाच पुढें निवाला आणि थोडक्या च वेळानें ते दोघे एका पुढें एक असे थोडया अंतरावर ह्यास दिसूं लाग ले पण मागचा बंदुक भरीत आहे असें त्यानें पाहिलें तेव्हां आपणांस आ धीं आलेला संशय खरा आहे असें त्यांस वाटूं लागलें बंदुक भरून झा ल्यावर त्यानें पुढच्यावर नेम धरिला इतकें त्याचे दृष्टीस पडलें तेव्हां त्या नें धांवत जाऊन त्याच्या बंदुकीस एकदम हिसका देऊन खालीं पाडिली, तेव्हां निशाण धरणारा चपापल्या सारखा होऊन मागें पाहुं लागला इतक्यांत त्यास राजा ह्मणाला अरे, पाजी माणसा कोण आहेस तूं सांग सांग लवकर!! नाहींतर पहा ( तरवार दाखवितों )तुझे आतां तुकडे तुकडे करितों ;'

या शद्बानें तो भयाभित होऊन आणि राजास ( ओळखून ) ह्मणाला " नाहीं महाराज, मी तो रघोजी आपला गरीब विश्वासू चाकर. पण महा राज, हें दुष्ट कृत्य खरोखरच मी आपल्या बुद्धीनें करीत नव्हतों, ह्मणून त्याबद्दल दंड करणें सरकारास भूषण प्रद होणार नाहीं. ,,

राजा.— तर सांग हें कोण तुजकडून करवीत आहे; मात्र खरें खरें सांग अँ: ! „

रघो०— महाराज, चंद्र प्रभा बाई साहेबांनीं मज जवळ बंदूक देऊन असें करावयास सांगितलें. „

राजा०— कोण हिंमत रावाची बायको काय?

रघो०— " होय महाराज. „

राजा०— बरें, चल तर तूं आतां! मजबरोबरहो पुढें. बंदुक पडूंदे तेथेंच. तुझ्या कडून हा सर्व इतिहास ऐकून घेतला पाहिजे; असें सांगून राजानें पुढें चाल धरिली. थोड्याच अंतरावर रस्त्याच्या उजव्या बाजूस त्यांस एक विस्तीर्ण वट वृक्ष दिसूं लागला. तो पहातांच हें आपणास आश्रय स्थान बरें आहे, असें वाटून ते दोघे त्या झाडाच्या आश्रयास जाऊन पोंचले. तेव्हां राजा एका दगडावर बसला आणि रघोजीस ह्मणाला " ये इकडे, काय तुझें नांव, ते रघोजी नव्हे काय? „

रघो०— होय महाराज.

राजा ०— बरें, तर आज पासून तूं आतां माझा मित्र बनलास कां आहेस कबुल याला!

रघो ०— होय महाराज! सरकारच्या पायांची कृपा झाली तर आणखी काय पाहिजे।

राजा ० — बरें, तें असो ? मघां तूं काय ह्मटलेंस चंद्र प्रभेनें माझ्या मित्राचा अशा रितिनें घात कर, असें तुला सांगितलें;

रघो ०— महाराज . आपली समजूत निराळी झाली आहे असें वाटतें पुढचा गृहस्थ नव्हे आपलामित्रतो येथील एका व्यापाऱ्याच्या घरीं राहिलेला चाकर आहे.

राजा०— हाँ,इतकी तुला पक्की माहिती आहे काय? आणि त्याचें नांव तुला ठाऊक आहे.

रघो०— होय महाराज, त्याचें नांव सुमंत राव.

राजा०—बरें तें असो. चंद्र प्रभेनें तुला काय सांगितलें?सांग बरें!

रवो०— चंद्र प्रभा बाई साहेब ह्मणाल्या. "रवोजी, तुला कांहीं काम सांगावयाचें आहे. करशील तर मी मोठें इनाम देईन. ,, मी ह्मटलें, " मी आपला गरीब आणि विश्वासू चाकर आहें. मग इनाम कशाला सांगा ह्मणजे झालें. ,,

राजा०— ह्यावरून तूं त्याच्या वरीं चाकर असतोस वाटतें

रवो०— होय महाराज, मी लहानाचा थोर त्यांचें अन्न खाऊन झालों आहे.

राजा० — बरें, तर मग " तुला कांहीं काम सांगावयाचें आहे. करशील तर " वगैरे इतक्या पर्यायानें सांगण्याचें कारण काय?

रवो०— तें कामच तसलें होतें कीं जें करण्यास मी कधींही कबूल होत नसतों.

राजा०— सुमंत रावाला मारण्याचें हेंच का तें काम?

रवो०— होय तेंच काम.

राजा०— मग तूं कां बरें कबूल होत नसतास. सुमंत राव तुझा मित्र आहे वाटतें.

रवो०— नाहीं सरकार. तसा मित्र नाहीं. पण तोचसा काय; जगतांतील सर्व लोक माझे मित्र आहेत. मी मनुष्यांचा तर काय-परंतु इतर प्राण्याचाही कधीं जीव घेतलेला नाहीं. मी जातीचा कोण आहें? हें आपण जाणाल तरी. मी साऱ्या जन्मांत कधीं हिंसा केलेली नाहीं.

राजा०— मग सुमंत रावासारख्या सत्पुरुषाचा प्राण घेण्यास तुझें मन कसें धजलें.

रवो ० — तेंच सांगत होतों सरकार. मी असें नीच कर्म करण्यास तयार होणारा नव्हे, ह्मणून बाई साहेबानी मजकडून वचन घेतलें. आणि मग सुमंत रावाचा वध तुझ्या हातून झालाच पाहिजे असें आग्रहानें सांगूं लागल्या

राजा ० — बरें सुमंत राव त्याचवेळीं अमुक ठिकाणीं आहेत हें चंद्र प्रभेस कसें समजलें! आणि सुमंत रावानी तिचा अपराध तरी कायकेला

रवो ० — महाराज. ही कथा फार लांब आहे. बाई साहेबांची रत्न माला या नांवाची एक धाकटी बहीण आहे.

राजा ०— होय, आहे मला तें ठाऊक! ती मोठी सद्गुणी आणि सुंदर हि आहे.

रवो ०— ती नाना साहेबांस द्यावी असा बाई साहेबांचा संकेत आहे आणि रत्नमाला व सुमंत राव यांची एकमेकांवर प्रीती बसली आहे' रात्रीं रत्न माला सुमंत रावाच्या भेटी करितां गेली होती.

राजा ०— बरें, मग पुढें

रवो ०—रत्नमाला. — कोठें जात असते, काय करित असते' इकडे बारकाईनें नजर ठेवावी. या कामावर बाई साहेबांनीं एक दासी नेमिलि होती, एका मैत्रिणिबरोबर सुमंत रावाच्या घरीं ति जावयास निघतांच त्या दासीनें ही बातमी बाई साहेबांस कळविली, बाई साहेब लागल्याच चलबिचल होऊन मला व त्या दासीला बरोबर घेऊन त्यांच्या मागोमाग निघाल्या. पुढें, त्या दोघी वखारीचा दरवाजा उघडून आंत गेल्या. इतक्यांत मागोमाग आह्मी त्या ठिकाणीं पोंचलों. तेव्हां आह्मांस दरवाजावर ठेऊन बाईसाहेब आंत गेल्या. पुढें रत्नमाला व सुमंत राव यांस एक ठिकाणीं पाहून त्यांच्या आंगाचा तिळ पापड झाला क्रोधानें नेत्र आरक्त झाले. सर्वांग कंपित झालें. तिच्या कडे पाहून रत्नमाला अगदीं भयग्रस्त झाली. तिचे हात पाय कांपुं लागले सर्वांगास घाम सुटला. आणि बाई साहेबांच्या मागून रत्न माला घरीं यावयास निघाली. नंतर आह्मी वरीं पोंचल्यावर बाई साहेबांनीं रत्नमालेला एका कोठडींत कोंडून ठेऊन बाहेरून कुलुप लावून घेतलें. इतकें झालें तरी पण, बाई साहेबांची चित्त वृत्ती स्वस्थ झाली नाहीं. याचें कारण असें कीं, काल जें बंड झालें ह्याज बद्दल बाई साहेबांस काळजी होती. त्या चौकशीवर त्यांनीं लोक ठेविले होते. आपण रात्रीं सुमंत रावास ललित पट्टणांस पाठविण्या विषयीं ज्यावेळीं बोलत होतां? त्या वेळीं वखारीचा दरवाजा उघडा राहिल्या मुळें. बाई साहेबांनीं जे मनुष्य बातमीवर ठेविले त्या पैकीं दोघे संशय येऊन आंत शि

रले होते. त्यांनीं बाई साहेबांस अमुक कामा करितां सुमंत राव आतांच ललित पट्टणास जात आहे अशी बातमी दिली. तेव्हां जयत्सेन राजाकडून इतक्यांत तरी महाराजास कुमक मिळूं नये. व ज्याचा नाद रत्न मालेनें धरला आहे. त्याचा या रितीनें शेवट झाल्यास आपला बेत सहज सिद्धीस जाईल. असा बाई साहेबांनीं विचार केला.

राजा ०— हें सर्व जुळतें खरें. बरें. असो. तें .आतां तुझी मर्जी कशी काय आहे तूं आपल्या धन्याकडे निघून जात असल्यास माझ्या कडून तुला मोकळीक आहे ;

रघो ०— जर महाराज माझा अंगिकार करणार नाहींत तर या नीचाची सेवा करण्या पेक्षां दुसरा कोणताही उद्योग करून होईल तसा निर्वाह करीन!

राजा ०— होय ते सर्व खरें पण मी तर सध्यां अशा स्थितींत येऊन पोंचलों आहें तेव्हां,

रघो ०— कांहीं चिंता नाहीं महाराज ज्याठिकाणीं असतील. त्या ठिकाणीं मी कोणत्याही स्थितींत आनंदानें राहीन.

राजा० — बरें तर. आतां आपणाला ह्या ठिकाणीं रहाणें इष्ट नाहीं जयत्सेन राजाकडच्या कामाचा निकाल होई पर्यंत इकडे जवळच एक अरण्य आहे? तिकडे जाऊन दिवस काढिले पाहिजेत. इतकें संभाषण झाल्यावर राजा व रघोजी हे दोघेही अरण्यांत गेले.

## भाग ४ था.

जयत्सेन राजाकडे माणि पालाच्या संबंधें वकील होऊन सुमंत राव निघून गेला हें मागील भागांत सांगितलेंच आहे. पण त्यानें जातेवेळीं घरच्या माणसांस आपली बातमी कळावी अशी कांहींच तजवीज करून ठेविली नव्हती. आज आपला भाऊ मोठ्या आनंदांत असेल अशी कल्पना करून त्यास भेटण्याच्या ईच्छेनें घाई घाईनें सगुणा वखारीकडे येऊन पोंचली. पण पहाते तों सुमंत राव आंत नाहीं. तेव्हां ती अगदीं घाबरून गेली. रात्रीं बंड झालें ही गुण गुण गावांत जिकडे तिकडे पसरली.

होती. यामुळें तिच्या पोटांत फारच भय उत्पन्न झालें. ती आपल्या भावाच्या पोषाखाकडे आणि तलवारीकडे पाहूं लागली, तों तलवार हि नाहीं! व पोषाखही नाहीं. तेव्हां अर्थात कांहीं कामा करितां कुठें तरी निघून गेला असावा; अशी कल्पना करून ती वखार बंद करून निघाली आणि त्याचीं जीं जीं स्थळें ओळखीचीं होतीं; त्या त्या ठिकाणीं जाऊन तिनें शोध केला पण कुठेंच थांग लागेना! तेव्हां रत्न मालेच्या घरीं तरी शोध करून पहावा. असें ह्मणून तिच्या घराकडे निघाली. पण रत्नमालाही घराकडे नाहीं. रत्नमाला कोणीकडे आहे ह्मणून तिनें घरां तील सर्व माणसांस विचारिलें, परंतु कोणी काहींच उत्तर देईना! तेंव्हां हा प्रकार आहे तरी काय? असा विचार करीत ती पुन्हा घरीं निघून गेली, मणिदत्त व त्याची स्त्री रूपवती यांनी सुमंत रावाच्या शोधास चाकर लोक पाठवून पुष्कळ शोध केला! पण कोठें ठिकाण लागेना. तेव्हां आतां सगुणी काय येऊन सांगेल. तें ऐकण्याविषयीं तीं दरवाजांतच वाट पहात राहिलीं होतीं. कांहीं वेळानें सगुणा येऊन पोंचली, तिच्या चेहऱ्यावरूनच सुमंत रावाचा शोध नाहीं असें त्यास वाटूं लागलें. सगुणी तर खालीं मान घालून टपटप नेत्रांतून अश्रु गाळूं लागली. तेव्हां सर्वांनीं एकदम आकांत मांडिला ज्या पेक्षां रात्रीं बंड झालें आहे. त्यापेक्षां रात्रीं कांहीं तरी दगा झाला असावा; असें त्यांस वाटलें. इतक्यांत मणिदत्त सावकाराचा वाडा कुठला असें विचारीत कोणी एक गरीब माणूस आंत आला त्याची मुद्रा आनंदीत दिसत होती त्यांस पहांच सर्वांचें लक्ष तिकडे लागलें. तो मणिदत्तास ह्मणाला "महाराज घरचे यजमान जर आपणच असाल, तर तुह्माला कांहीं गुह्य गोष्ट सांगावयाची आहे"; हे शब्द कानीं पडतांच मणिदत्त त्यास आंतल्या एका खोली मध्यें घेऊन गेला. ही गोष्ट बहुधा सुमंत रावाचीच असावी आणि आलेला मनुष्य ज्या पेक्षां उल्हास युक्त आहे, त्यापेक्षां ही बातमी आनंदाची असली पाहिजे, असें समजून घरांतील सर्व मनुष्यांनीं खोलीकडे धांव मारीली, आणि तीं खोलीच्या दाराशीं ऐकत उभीं राहिलीं

तो आलेला मनुष्य मणि दत्तास ह्मणाला. महाराज, तुमचेच नांव मणि दत्त ना ? त्यानें होय ह्मटल्यावर आलेल्या मनुष्यानें एक लखोटा काढून त्यास दिला. तो मणि दत्ताचेच नांवचा होता तो पाहतांच आनंद पावून त्यानें तो फोडून आंतील मजकूर वाचूं लागला. तो येणें प्रमाणें.—" वडिलाचे सेवेशीं विज्ञापना ऐशिजे, मी राजाधिराज मणि पाल महाराज यांचे कामाकरितां ललित पटणामध्यें जयत्सेन महाराजांकडे जात आहें. आपण माझ्याबद्दल कांहीं काळजी करूं नये. आणि ही **गोष्ट** गुप्त राखावी. कळावें हे विज्ञापना.,,

आपला सुमंत राव.

हें पत्र वाचतांच घरांतील सर्व मनुष्यें आनंदीत झालीं. ही बात मी बाहेर न फोडण्याविषयीं मणि दत्तानें सर्वांस ताकीद केली. आणि मग पत्र आणणाऱ्या मनुष्यास विचारूं लागला. बरें, तुला सुमंत रावानें या कामा खातर काय देणगी द्यावयाची ती दिली काय? इतकें मणिदत्तानें विचारितांच सुमंतरावानें दिलेली मोहोर त्यानें काढून दाखविली. आणि ह्मणाला" सुमंतरावा इतका उदार आणि थोर मनुष्य मीं कुठेंच पाहिला नाहीं. त्यांनीं लहानशा कामा करितां केवढें मोठें मला बक्षिस दिलें हें. त्याचे मजवर मोठे उपकार आहेत. त्यांचे ईश्वर सदैव कल्याण करो. पुढें सुमंतराव तुला कोणीकडे भेटला, तूं कोठें रहात असतोस; उद्योग काय करीत असतोस, तुझ्या वरचीं मनुष्यें किती आहेत; तुझें नांव काय; इत्यादि हाकिकत विचारिल्यावर त्यास मणि दत्तानें आणखी एक मोहोर बक्षिस दिली. ती घेऊन ईश्वरापाशीं दुवा मागत तो आलेला मनुष्य निघून गेला.

आतांचंद्र नगरामध्यें दुसऱ्या ठिकाणीं हाकिकत काय चालली आहे हें वाचकांस कळविणें जरूर आहे. एका एकीं मणिपाळ राजावर मारेकऱ्यांनीं जो प्रसंग आणिला होता. त्यांतून ते सुटून कोणीकडे तरी निघून गेले असावे. अशी कल्पना निघून ती सर्वत्र सर्व लोकांचे मुखीं झाली- मणिपाल राजाची कारकीर्द ह्मणजे केवळ अयोध्या

धिपती रामचंद्राचीच होती; असें ह्मणण्यास हरकत नाहीं. यामुळें जिक डे तिकडे स्वस्थता होती. गादीवर असलेल्या राजाकडून जर रयतेस सुख होत असलें तर राज्यक्रांती व्हावी अशी कोणाचीच इच्छा असत नाहीं. त्यांतून जयपाळ हा जरी राजाचा भाऊ होता तरी गादीचा अधिकारी मणिपालच होता. त्यांतून जयपाळाच्या हातीं राज्यकारभार गेल्यावर रयतेस पीडा व्हावयाचीच, अशी लोकांची खात्री होती. कारण राज्य चालविण्यास राजामध्यें जे सद्गुण असले पाहिजेत. त्यांतून एकही जय पाळामध्यें नव्हता. उलट दुष्ट व जुलमी असा त्याचा स्वभाव असून अत्यंत कडक होता. सावत्र भाऊ हें मनामध्यें न आणितां मणिपालानें हरएक प्रकारें त्याचें चांगलें पालन केलें होतें. त्याच्या विद्याभ्यासा करितां मोठे मोठे पगार देऊन हुशार शिक्षक ठेविले होते. व तूं राजनीतींत प्रवीण झालास ह्मणजे अर्धे राज्य तुझे हवालीं करीन असें त्यास राजानें सांगितलें होतें. इतकें असून जयपाळानें आपल्या दुर्बुद्धी प्रमाणें कर्तव्य सोडिलें नाहीं. असो.

राज्य क्रांती झाली ह्मणजे सर्व रयत चिंताक्रांत व्हावयाचीच. त्यांतून पुढें गादीवर बसणाऱ्या राजा पासून सुख प्राप्ति होण्याचा जर संभव असला तर त्या आशेवर मध्ये होणाऱ्या विपत्तीची लोक पर्वा बाळगीत नाहींत. पण पुढें होणारा दुष्ट, जुलमी राजा असला ह्मणजे मग सर्वत्र अस्वस्थता पुढें उत्पन्न होणारी लोकांच्या नजरेसमोर दिसूं लागते. व प्रजा अगदीं हावलदिल होऊन चुकते. त्या प्रमाणेंच आमच्या चंद्र नगरांत सर्व लोकांची अवस्था झाली. सर्व लोकांचे व्यापारादि उद्योग बंद पडूं लागले. जो तो हा प्रसंग आपणावर ईश्वरानें आणिला. व पुढें आतां आपलें कसें होईल, हाच विचार करीत असल्या मुळें गांवांत सर्व तो मुखीं राज्य क्रांतीशिवाय दुसरें कांहींच निघत नव्हतें.

इकडे हिंमतरावाच्या वाड्या मध्यें जय पाळ, नाना साहेब, व हिंमतराव, व दुसरे कांहीं सरदार लोक जमून विचार करीत बसले होते. त्यांत मणिपाल राजा नाहींसा होऊन कितीएक अधिकारी

लोक जयपाळास वश असल्यामुळें आतां आपल्या हातून राज्य गमावयाची त्यांस भीति तर नव्हती. पण माणिपाल हातचा सूटला, व सुमंतराव मदत मिळविण्यकरितां ललित पट्टणाकडे निघून गेला आहे, असें चंद्र प्रभेकडून समजलें. ह्यावरून त्यास एका अर्थी थोडीशी भीति दिसूं लागली. इतक्यांत सुमंत रावाच्या मागोमाग रघोजीस पाठविला होता. पण तो पुन्हां आला नाहीं. व त्याची बंदुक मात्र वेशी बाहेर सांपडली; ही बातमी चंद्र प्रभे कडून समजली. तेव्हां तर त्यांना पुढें फारच संकट वाटूं लागलें. रघोजीची वाट काय झाली मणिपाल कोणी कडे गेला हाच सर्व लोक विचार करूं लागले. कोणी ह्मणे गांवांतच असेल, कोणी ह्मणे जयत्सेन राजाकडे निघून गेला असेल, याप्रमाणें कोणीकांहीं कोणीकांहीं तर्क काढूं लागले. त्यावेळीं नानासाहेबांनीं असें सुचविलें कीं, लष्करी लोक पाठवून चंद्र नगरांतील प्रत्येक घराची झडती घ्यावी, व जो मणिपालास पकडून देईल त्यास एक लक्ष रुपयांचें बक्षीस ठेवावें. हा विचार सर्वांस पसंत पडला व त्याप्रमाणें जरूर त्यांनीं व्यवस्था केली. पुढें जयपालानें गादीवर कधीं बसावें हा विचार निघाला. तेव्हां एका सरदारानें सांगितलें कीं, पुढें दिसत असलेले भयंकर परिणाम जोंपर्यंत उद्भवले नाहींत. व त्यांची व्यवस्था लागली नाहीं. तोंच जयपाल राज यांनीं गादीवर बसण्याचा समारंभ करूं नये. पण ही युक्ति हिंमत रावास मुळींच आवडली नाहीं. तो ह्मणाला, " जोंपर्यंत महाराज गादीवर बसणार नाहींत तोंपर्यंत रयतेवर आपणास पूर्ण अंमल चालवितां येणार नाहीं. हें बोलणें सर्वांस पसंत पडून मुमुहूर्त पाहून लवकरच जयपाळानें गादीवरबसावें जसा सर्वांनीं ठराव केला. आणि सभा उठली.

वर लिहिल्या प्रमाणें निश्चय झाला पणं जयपाळ गादीवर बसेपर्यंत आठ दिवस मध्यें गेले. तों पर्यंत सकाळ संध्याकाळ सभा भरून विचार होतच होता. ह्या अवकाशांत एके दिवशीं चंद्रप्रभा संध्याकाळच्या प्रहर दिवसास आपल्या महालांत पलंगावर लोळत पडली

होती. ती कांहीं विचार करीत होती, मध्यें सुस्कारा टाकीत होती, त्यावरून कांहीं तरी ती काळजींत असावी अशी दिसत होती. अशा संवेंस ती आपणाशींच बोलूं लागली. परमेश्वर पूर्ण सुखांत कोणाला ठेवतो असें नाहीं. आज मला कांहीं कमी नाहीं. कुबेरा प्रमाणें संपत्ति आहे; सर्व कांहीं आहे. पण ज्याच्याशीं गांठ पडली आहे; त्याचें दर्शनही नकोसें वाटतें. एरवीं ते मदना प्रमाणें सुंदर आहेत, चतूर आहेत, वीर आहेत, धैर्यवान अहेत, सर्व गुण संपन्न आहेत, आणि मजवरही त्यांचा सगळा जीव आहे, माझ्या अर्ध्या वचनांत आहेत, माझी कोणत्याही प्रकारची हौस पुरविण्या करितां एका पायावर उभे. इतकें असूनही त्यांच्यावर माझी अप्रीति कां बरें असावी? आणि मन दुसरी कडे कां बरें जावें; बरें, पण चमत्कार काय कीं, ज्यावर माझें मन बसलें; आहे तो जो निरंतर डोळ्यापुढें असावा असें वाटतें, तो माझ्यावर मुळींच प्रीति करीत नाहीं. मला राज्य पदाची प्राप्ती करून दे, ह्मणजे मी तुझ्या अर्ध्या वचनांत वागेन, असें सांगून शेवटीं आतां अर्ध्या वचनांतही नाहीं आणि पाव वचनांतही नाहीं. तीन तीन निरोप गेले तरीं येऊन फुकाचें भेटणें देखील होत नाहीं. पुरुषांची जात बइमानीं आणि निर्दय असें ह्मणतात तें कांहीं खोटें नाहीं आपण सगळा जीव तोंड तोडून जरी त्यांचें प्रीय करीत गेलों. तरी ते इकडे ढुंकून सुद्धां महात नाहींत. ( इतक्यांत जयपाळ येतो )

जय०— हे प्रियकरणी, मनोहारिणी, उदास होऊन कोणत्या प्रकारचा बरें विचार करीत आहेस.

चंद्र०— ( उठून बसते ) आहा, बोलणें मात्र किती गोड पण तीन तीनदां बोलावणें पाठविलें तरी देखील येऊन जाणें सुद्धां होऊं नये हें आश्चर्य नव्हे काय?

जय०— ( पलंगावर बसून ) हेंच काय इतके उदास होण्याचें कारण, सद्ध्या जिकडे तिकडे बंदोबस्त करून पुढें कोणत्याही प्रकारचें संकट उपस्थित न व्हावें व प्रजा सुख असावी. ह्याबद्दल जे उपाय क

रावयाचें तें करण्याची कुशल व बुद्धिमान लोक मिळून वाटा घाट करीत अ होते. तुझा निरोप गेला तेंव्हा त्या मंडळींत मी होतों. ह्मणुन येण्यास विलंब लागला.

चंद्र०— त्या बद्दल मला काळजी असून काय काय व्यवस्था क रावयाची ती मी आमच्या इकडे सांगून ठेविली आहे.

जय०— होय हिंमत रावही त्याच मंडळींत आहेत. माझ्या कल्या णाची उत्कंठा त्यांस फार आहे. खरोखर त्यांचे माझ्या शिरावर फार उपकार आहेत.

चंद्र०— पण ते इतके अगत्य कशा साठीं बाळगतात. हे आपण विसरतां वाटतें.

जय०— विसरलों नाहीं. आज एवढ्या गादीचा अधिकार आणि छत्र सिंहासन जें मला मिळणार तें सर्व तुझ्या प्रसादाचें फळ आहे. हें माझ्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत कधींही विसरणार नाहीं.

चंद्र०— असें जर आहे, तर महाराज मजवर प्रिति करीत नाहींत तीं कां ह्मणून बरें;

जय०— वा: सुंदरी माझी तुजवर प्रीति नाहीं अशी गोष्ट घडेल तर कशी? आणि हा तुला संशय कशावरून लागला.

चंद्र०— संशय! संशय तो मला कां न यावा. आपण मजवर प्रीति करीत नाहीं ही गोष्ट निःसंशय आहे. ज्या दिवसा पासून तुमचा मला नाद लागला त्या दिवसा पासून तुमचें प्रीय करून मर्जी संपादन करावि एतदर्थ मी किती खटपट केली. कोणत्याही गोष्टीची प्रातिकुळता ह्मणून ठेविली नाहीं हा प्रकार जेव्हां तुमची स्त्री मालती बाई इच्या लक्षांत येऊन चुकला व ती रागानें तांबडी लाल होऊन नागीणी सारखी फणत्कारूं लागली, त्यावेळीं तिची किति विनवणी केली, पाय धरले, आणि या गोष्टीचा डंका करून अब्रु घालवूं नकोस ह्मणून सांगितलें. तेव्हां तिनें पुन्हा हूं कीं चूं केलें नाहीं. तुमची चौघांत अप्रतिष्ठा न व्हावी; ह्मणून तिनें सर्व प्रकार निमुटपणें स

हून केला. खरोखर ती महान साध्वी आहे. आणि आतां माझ्याशींत री किती निर्मळ मनानें वागते ह्मणून सांगूं. पोटांतील राग ती सर्व विसरून गे ली. व तुह्मांला राज्य मिळवून देण्याची खटपट केली ह्मणून तिनें मा झे फारच उपकार मानिले. मला तरी ह्या महत्वाच्या प्रकर्णांत काय का य करावे लागलें, हें आपण जाणत नाहीं वाटतें. आज माझी एवढी मोठी योग्यता असून हलक्या हलक्या मनुष्याची पाय धरणी करावी ला लागली खोटें बोलावे लागलें. (मध्येंच दासीस हांक मारून) ठके, इक डे ये, सावध रहा, लांब वर लक्ष दे, आणि कोणी आले तर धांवत ये उन सांग.

ठकी०— ( पुढें येऊन ) बाई साहेब त्याजबद्दल काळजी नको. मी पुरी खबर दारी ठेऊन लक्ष पुरवीत आहें.

चंद्र०— काय बरें करावें लागले नाहीं; पण हें सर्व कशाकरितां बरें? तुमची प्रीति संपादन करण्या करितांच ना? पण इतकेंही करून या दासीकडे दुर्लक्ष करितां; हें असें कां बरें महाराज.

जय०— नाहीं, सुंदरी, हे तुझे उपकार मी अगदीं विसरलों नाहीं आज तीन निरोप पोंचेपर्यंत मला येण्यास वेळ सांपडला नाहीं. व एव ढ्यावरून मी तुजवर प्रीति करीत नाहीं, असें तूं मानितेस.

चंद्र०— नाहीं, एवढ्यावरूनच मानीत नाहीं. आजपर्यंत माझ्याशीं, जें आपण वर्तन ठेविलें आहे, त्यावरून मी ह्मणत्यें.

जय० असा कोणता बरें अपराध मजकडून घडला. एखादा सांग; ह्मणजे मी आपले सर्व अन्याय पदरांत घेईन. नाना साहेबा सारख्या बड्या बड्या सरदारांचीं मनें वश्य करून घेऊन मला तूं या योग्यते स चढविलेंस हें मी कधींही, विसरणार नाहीं.

चंद्र०— अपराध कसचा घडणार. पण मुळा पासूनच माझें दर्श न देखील तुह्मांस मनापासून आवडत नाहीं, हें तुह्मी आपल्या मनाकडे विचारून पहा. एखाद्याच्या हातून आपलें महत्वाचें काम होण्यासारखें असलें तर तेवढ्या पुरतें गोड गोड बोलण्याची सर्वांची चाल आहे.

त्यांत तुह्मीं कांहीं जास्त केलेंत असें नाहीं, पण प्रीतिचें चिन्ह तें निराळें च असतें.

जय०— मग मी काय केलें पाहिजे तें सांग. जर चुकलों असेन तर क्षमा मागेन.

चंद्र०— नको, क्षमा नको. पण.— इतक्यांत नाना साहेब येत असल्याची वर्दी ठकीनें दिली. तेव्हां जयपाळ पलंगावरून उठून एका बाजूस खुर्ची होती तिजवर जाऊन बसले. चंद्र प्रभाही पदर सांवरून पलंगा खालीं बसली. इतक्यांत नाना साहेब येऊन पोंहोंचले. त्यास पाहातांच चंद्र प्रभेनें बसावयास त्यास खुर्ची दाखविली. त्या खुर्चीवर जय पाळास मुजरा करून नाना साहेब बसले, तेव्हां जय पाळ ह्मणाला

जय०— नाना साहेबांची स्वारी आज कोणीकडे इकडे.

नाना०— आमची स्वारी काय येतेंच आहे कधीं कधीं. पण महाराजाची स्वारी कोणत्या निमित्तानें.

जय०— (चंद्र प्रभेकडे बोट करून) ह्यांच्या वडिलां पासून ह्यांचा आमचा घरोबा फार आहे. तेव्हां मी येतों इकडे कधीं कधीं. व कधीं कधीं चंद्र प्रभा बाई आमच्या इकडे येत असतात-

नाना०— महाराज, सर्व कांहीं जाणतात नाहींतर, ती वेळ गेली ह्मणजे मागाहून कोण ओळख राखतो.

जय०— नाना साहेब, तुह्मीं महाराजही अक्षरें कांहीं तोंडचीं कमी करीत नाहींत तरी मी अजून महाराज झालोंच नाहीं. पण झालों अशी कल्पना करा. तरी देखील तुह्मी महाराज महाराज असें ह्मणतां नये. कारण मी महाराज होणार हें सर्वांच्या कृपेचें फळ आहे.

नाना०— छेः! यांत कृपा कसची? ज्याचा भाग त्यांस दिला तर ती कृपा समजली पाहिजे असें नाहीं. महाराज गादीचे अधिकारीच आहेत.

जय०— पुन्हा महाराज, नानासाहेब हें कांहीं मला बरें वाटत नाहीं. तुह्मी मला पूर्वी प्रमाणें जयपाळ राव किंवा नुस्तें जयपाळ ह्मणा

नाना०— बरें तें असो. पण आतां महाराजाकडून मिठाई मिळाली पाहिजे.

जय०— ती कशाची?

नाना०— कशाची ह्मणजे; महाराज उद्यां गादीवर बसणार आहेत.

जय०— तर नाना साहेबांकडूनही आह्मास मिठाई मिळाली पाहिजे

नाना०— ती कशाची;

जय०— जगांत जी एक सुंदर नवयौवना अशा लावण्य वती स्त्री बरोबर तुह्मीं लग्न लावणार ह्मणून.

नाना०— ( तोंड हिरमुसलें करून )केलात बुवा थट्टेला आरंभ तुह्मीं,

जय०— थट्टा? थट्टा तर थट्टा. काय ह्मणाल तें खरें,! ते दिवशीं चंद्र प्रभा बाई ह्मणाल्या कीं, हा योग लौकरच जमून आणला पाहिजे

चंद्र०— ( हंसून )असें तर खरेंच, पण नाना साहेबांस थोडा दखील धीर नाहीं.

नाना०— धीर तो किती ह्मणून धरूं? एक दिवस कीं दोन दिवसकीं चार दिवस.

जय०— नाना साहेब असे उतावळे कां होतां? त्या कामी ह्मणजे फार यत्न केलें पाहिजेत असें नाहीं. ( चंद्र प्रभेकडे बोट करून )त्यानीं हूं ह्मटलें कीं झालेंच काम.

नाना०— तो योग कसचा घडून येतो. मला मात्र ती प्राणाहून प्रिय वाटते. पण ती माझा शत्रू प्रमाणें तिरस्कार करिते.

जय०— ( हंसून )नाना साहेब हें असें कां बरें?

नाना०— मी तिला आवडत नाहीं ह्मणून.

जय०— आवडत नाहीं कां बरें; तुमच्या मध्यें येवढें व्यंग आहे असें नाहीं. दिसण्यांत सुंदर, तेजस्वी, सेनापती सारख्या मोठ्या अधिकारावर?

नाना०— आतां ही सगळीच थट्टा मी नसतों बोलतों तर बरें झालें असतें.

जय०— ह्यांत थट्टा कशाची? ही जर थट्टा, तर मी उद्यां गादीवर बसणार, तो देखील थट्टाच समजली पाहिजे.

नाना०— तो योग जमून येण्याजोगा आहे, आणि ही गोष्ट घडून येणे फार कठीण आहे.

चंद्र०— कांहीं कठीण नाहीं. पण तुह्मीं थोडा धीर मात्र धरला पाहिजे. बायकांची जात जराअचरट आहे. सूमंत रावाची आशा नाहींशी झाली ह्मणजे मग खाचित ती तुह्माला पसंत करील.

नाना०— तर मग तुह्मीं आजपर्यंत जो मला विश्वास दाखविला. तो आमच्या धीराचाच काय;

चंद्र०— पण नानासाहेब किती उतावळे होतां! मी तुमच्या करितां किती खटपट करीत आहें, ती तुह्मीं पहातच आहां. सुमंत रावाचा तिला नाद असलेला समजल्यापासून तिला प्रतिबंधांत ठेविलें आहे. मी केव्हां केव्हां तिची समजूत करण्याकरितां तर जातच असत्यें, केव्हां रागें भरत्यें, केव्हा आर्जव करित्यें, केव्हां भय दाखविल्यें; असे अनेक प्रकारें यत्न चालविले आहेत. हें तुह्मीं पाहातांना?

नाना०— होय, पण मला त्याचा काय उपयोग; त्या बिचारिला मात्र यातना भोगाव्या लागत आहेत.

चंद्र०— तें सर्व खरें. परंतु यत्नाशिवाय सर्वच गोष्टी साध्य होण्याजोग्या नसतात. तुह्मींही केव्हां केव्हां जाऊन तिचें मन वळवीत जा.

नाना०— माझ्याकडून सर्व तयारी आहे, पण ती आपला हट्ट अगदीं सोडीत नाहीं. तिला सूमंत राव मात्र आवडतो.

चंद्र०— तिचे पंच प्राण सर्व सूमंत रावावर आहेत. ते दिवशीं मारेकरी पाठवून सुमंत रावाचा घात करविला, असें मी तिला सांगीतलें, तेव्हां तिने जो आकांत केला तो सांगतां येत नाहीं. जिणें आजपर्यंत माझा कधीं अनादर केला नाहीं, ती अमर्याद शब्द बोलूं लागली; व शेवटीं वीष खाऊन मरण्यासही सिद्ध झाली. तेव्हां पुन्हा सुमंत राव जिवंत असल्याबद्दल जेव्हां तिची खात्री केली, तेव्हां ती

स्वस्थ झाली.

नाना०— असें जर आहे तर तिचें कोणत्या आधारानें मन वळेल असे ह्मणतां.

चंद्र०— किती झालें तरी बायकांचें मन तें. कधीं वळल्याशिवाय रहाणार नाही. पण तत्पूर्वी एक उद्योग शेवटास नेला पाहिजे.

नाना०— तो कोणता?

चंद्र०— मणि दत्ता सुद्धां त्या घरच्या सर्व मनुष्यांवर कोणता तरी आरोप ठेऊन त्यांस कैद केलें पाहिजे.

जय०— तें कां;

चंद्र०— रत्नमालेला मणि दत्ताची मुलगी सगुणा साह्य आहे. व सुमं त रावाच्या प्रीतीवरून तीं सर्व माणसें रत्नमालेवर प्रीति करितात.

जय०— मग एवढया करितां कैद कां?

चंद्र०— सगुणीकडून सुमंतरावाची बातमी तिला समजते.

जय०— मग पाहिजे तर तिची आणि रत्नमालेची भेट होऊं देऊं नका ह्मणजे झालें.

चंद्र०— पण तेवढ्यानें नाना साहेबाचें कार्य निर्विघ्न पार पडेल असें वाटत नाहीं त्यांजवर कांहीं तरी दोषारोप ठेवून त्यांस शिक्षा दिली पाहिजे

जय०— अशा गोष्टीपासून कांहीं हांसील नाहीं आणि झालें असें समजा, तरी मणि दत्ताचें घराणे प्रसिद्ध सावकारांत मोडतें. संसारांत लाग णाऱ्या सर्व वस्तूंचा पुरवठा त्या घरीं असून माल फार स्वल्प नफ्यानें विकिला जातो. अशी त्याची सर्वत्र कीर्ति आहे. व तें घराणें आज चंद्रन गरांत बहुतेक लोकांस प्रिय आहे. तेव्हां अशांवर विनाकारण संकट उ पस्थित झालें, तर तें सर्वांच्या मनास वाईट वाटतें. आणि आज आम च्या नव्या कारकिर्दीमध्यें तर असा प्रकार होऊं देतां कामा नये.

चंद्र०— त्यावर एकदां गुन्हा शाबीद केला ह्मणजे कोणालाही वाईट वाटणार नाहीं.

जय०— तर मग अशा सज्जन पुरुषावर कोणता आरोप ठेवावयाचा

चंद्र०— राजद्रोह.

जय०— राज द्रोहाची शाबिदी त्यावर कशी होईल.

चंद्र०— सुमंत राव ज्यापेक्षां माणिपाल राजाच्या कामाकारितां निघून गेला आहे त्या पेक्षां तोच राजद्रोह ठरण्याला कोणतो हरकत आहे?

जय०— एकवेळ असें समजा कीं, तो ठरला. पण त्याचें मणि दत्ता कडे काय?

चंद्र०— माणि दत्तानेंच हा व्युह रचला आहे. असा पुरावा तयार केला पाहिजे.

जय०— ( मनांत )एकंदरांत या बायकांची जात कपटी, दुष्ट आणि घातकी अशी आहे. ह्या केव्हां काय करितील. याचा नेम सांगवत नाहीं. यांच्या कानाला जो लागेल तो कधींच सुख पावणार नाहीं. नाना साहेबा सारखे जे लोक असतील ते असेच फशीं पडावयाचे.

चंद्र०— का विचार कसचा चालला आहे.

जय०— कांहीं नाहीं विचार. तुह्मीं ह्मणतां त्याप्रमाणें केल्यास जनापवाद टाळतां येईल कीं काय, हा विचार करीत आहे.

चंद्र०— त्याबद्दल महाराजानीं काळजी करण्याचें अगदीं कारण नाहीं

जय०— पण माझें अंग अगदीं नाहीं असें दृष्टोत्पतीस आलें पाहिजे

चंद्र०— बरें आहे. मी तशी खबरदारी ठेवीन. महाराजानीं निष्काळजअसावें.

जय०— ( मनांत )आतां येथून लोकर निघावें हें बरें! नाहींतर ही काय अरिष्ट आणून सोडील हें सांगतांही येत नाहीं. ( उघड )बरें तर, आतां मला निरोप मिळावा.

नाना०— मला देखील!

चंद्र०— उभयतांची कृपा असावी ह्मणजे झालें.

भाग ५ वा.

संध्याकाळचे पांच वाजण्याच्या सुमार झाला आहे. कचेरीमध्यें कितिएक सरकारी नोकर लोक आपण सगळा दिवस, मर मरमरून तयार केले

ले कागद अधिकाऱ्यांकडे नेऊन त्यांनीं तपासल्यावर त्यांच्या गड्या देत आहेत. कितिएक अधिकारी लहानशी चूक दृष्टीस पडली, तरी देखील रागावून " गाढव आहां लोक तुह्मी! तपाचीं तपें कामें करून ह्मातारे झालां तरी देखील अक्कल ह्मणून कशी असते; ती तुमच्यामध्यें तिळभरही दृष्टीस पडत नाहीं. आपल्या हातून कामें होत नाहींत तर द्यावीं सोडून. आणि पोटें जळत नसलीं तर गुरें राखावीं. गद्धे कोठचे " याप्रमाणें शिव्या देत आहेत. कित्येक वर लिहिल्याप्रमाणें शिव्या खाऊन आंबट तोंड करून मनांतल्या मनांत जळफळत घरीं जात आहेत. कितिएक आज आपल्या शिव्या चुकल्या याच आनंदांत आहेत. कित्येक शिपाई लोक वरिष्ठ अमलदारांची छत्री उजव्या हातांत व जोडा डाव्या हातांत घेऊन त्यांच्या रस्त्याकडे डोळे लावून दरवाजांत उभे राहिले आहेत. तितक्यांतच त्यांचा कोणी एखादा मित्र दृष्टीस पडला ह्मणजे त्या कामाची जरा लाज वाटून जोडा एके बाजूस करीत आहेत. अशावेळीं शहर फौजदार कांहीं हाताखालचे शिपाई बरोबर घेऊन कचेरींतून बाहेर पडला व शिपायानें पुढें ठेवलेला जोडा घालून हातांतील काठी फिरवीत फिरवित मोठ्या त्वरेने निघाला. प्रस्तूत ज्यांस कोतवाल ( चिपकानिस्टेबल ) अशी संज्ञा आहे. त्याच अमलदारांस पूर्वी फौजदार असें ह्मणत असत. राज्यामध्यें जरा अंदाधुंदी असली ह्मणजे मग या लोकांस जें कांहीं फावतें तें विचारतांच नये. कोणावर कांहीं कोणावर कांहीं आरोप उपस्थित करून अथवा भय दाखवून, जेणें करून आपली तुंबडी भरेल तिकडे नेहमीं यांचें लक्ष असतें. यामुळें यांच्या अंतः करणांतील सदयता अगदीं नाहींशी झालेली असते. एखादा श्रीमंत गृहस्थ कोणत्या वेळीं आपल्या हातीं येइल याची ते वाटच पहात असतात. आणि तसें झालें तर शिकार करणारास शिकार सांपडली ह्मणजे जसा आनंद होतो तसा यांस होतो. यांच्या हाताखालचे लोकही कमी निर्दय नसत.त ते एक एकटे असले ह्मणजे फौजदार आपण असें समजून गोर गरिबांवर ताव काढण्याचा प्रसंग पहात असतात. श्रीमान किंवा मूाशिक्षित लो

क ल्हूवा यांचें फारसें भय मानीत नाहींत. तथापि रानटी लोक किंवा कुणबी लोक हे ह्या यमदूतांस पाहून थर थर कांपत असतात. पांढ रपेशे लोक एखाद्या प्रसंगांत सांपडल्या शिवाय हे त्यांच्या वाटेसच जा त नाहींत. असो; आज फौजदार साहेब इतके जलद निघाले आहेत कोणीकडे: हें पाहण्याकडे कितिएकांचें लक्ष लागलें. इतक्यांत ते हिं मत रावाच्या दरवाजावर येऊन पोहोंचले, व त्यांनी दरवाजांतील ए का पहारे कऱ्यास आपण आल्याची वर्दी यजमानणीस द्यावी अशी सूचना केली. चंद्र प्रभा त्यांची वाटच पहात बसली होती. तिने ता त्काळ त्यांस आंत नेऊन बसावयास जागा दाखविली; आणि ह्मणाली

चंद्र०— फौजदार साहेब, आज कांहीं विशेष कामाकरीतां मुद्दा म बोलावणें पाठवून आपणांला मीं तसदी दिली आहे.

फौज०— मी बाई साहेबांच्या चरणांचा सेवकच आहें. यांत तसदी कशाची ?

चंद्र०— बरें, आज एक महत्वाचें काम तुह्मीं केलें पाहिजे.

फौज०— हुकूम झाला ह्मणजे घटकाभरही विलंब नाहीं.

चंद्र०—ऐका तर; माणि दत्त शेट सावकार आपणांस ठाऊक असेलच

फौज०— होय, तो एक श्रीमान् संभावित व्यापारी आहे.

चंद्र०— संभावित ह्मणू नका! दगलबाज ह्मणा! त्या कुटुंबानें आम चीं फार दुर्दशा उडविली आहे. व पुढें आणखी उडण्याचाही संभव आ हे. तेव्हां त्या कुटुंबास काराग्रहाची शिक्षा कांहीं दिवस मिळेल असें एखा दें प्रकरण उपस्थित करावयाचें आहे.

फौज०— हुकूम व्हावा मात्र. त्याकामांत माझ्याकडून जें होण्याजो गें असेल तें साह्य मी आनंदानें करीन.

चंद्र० त्यांस जन्म ठेपेची अगर देहान्ताची शिक्षा मिळावी अशा प्र कारचा राज द्रोहाचा गुन्हा शाबीद करावा असा मी बेत केला होता, प ण तो बेत साधण्याजोगा दिसेना! तेव्हां हलका एखादा गुन्हा शाबीद करू न पांच चार वर्षांची शिक्षा देतां यावी; असा एखादा गुन्हा त्यावर शा

बीद झाला पाहिजे. तो कोणता ह्मणाल तर दरवडा.

फौज०— मणिदत्तावर हा अपराध शाबीद केला तर ही गोष्ट गांवांत एकालाही खरी वाटणार नाहीं.

चंद्र०— गांवाशीं आपणाला काय करावयाचें आहे. आणि प्रत्यक्ष त्यांनीं गुन्हा केला असें ह्मणावयाचें नरले तर एका गुन्हेगारास मदत केली असा आरोप शाबीद करावा ह्मणजे झालें. तेव्हां हें खटलें कसें तयार करितां येईल हें सांगा पाहूं?

फौज०— तर तो प्रकार असा कोणी तरी एका गृहस्थानें अमुक दिवशीं आपल्या घरांत दरवडा पडला अशी फिर्याद द्यावी. व त्या फिर्यादीनें अमुक एका मनुष्याचा वहमा आपणास आहे असें सांगून एका गरीब माणसाचें नांव सांगावें. व त्या वहम्याच्या मनुष्यास आह्मां कडून समजूत मिळाल्यावर त्यानें मणिदत्तशेट आपणास सामील आहे व तो नेहमीं चोरीचा माल खरेदी घेत असतो असें सांगावें. नंतर मणि दत्ताच्या वाड्याचा झाडा घ्यावा. फिर्यादीचा माल त्यांत सांपडावा. इतकें झाल्यावर पुढें मणिदत्तास व त्याच्या मनुष्यांस आमच्या लोकांनीं पाहिजे तशी समजूत देऊन, हा आपण गुन्हा केला खरा, असें त्यांजक डून कबूल करवावें. आणि न्यायाधिशाकडे हा खटला पाठवून देऊन त्यास शिक्षा द्यावी

चंद्र०— ठिक, तुह्मीं चांगली मसलत योजिली, पण मला आतां असें सांगा, दरवडा पडलेला फिर्यादी कोणीही ऊभा करितां येईल. पण जो कोणी तरी गरीब मनुष्य उगाच या खटल्यांत सामील करणार तो कां नाव सांगेल? आणि माणि दत्ताच्या घरांत चोरीचा माल सांपडा वा कोणत्या रीतीनें?

फौज०— अँ! यांत काय आहे. त्या गरीब मनुष्यास धमकी देऊन आह्मी माणि दत्ताचें नांव सांगावयास सांगूं. आणि जें चोरीचें जवाही र ठरवावयाचें तें एका पेटींत भरून ती पेटी एका मजूर दाराच्या डो किवर चढवून माणि दताच्या दारांत नेऊन उतरावयास लावावी. आणि

घरच्या मनुष्यांनीं कोणाची काय असें विचारिलें ह्मणजे हिचा धनी मागाहून येत आहे असें सांगून त्या मजूर दारानें निघून जावें. कांहीं वेळ वाट पाहून ती पेटी घरांतील माणसें आंत नेऊन ठेवतील, इतक्या संधीस आह्मी शिपाई लोक नेऊन वाड्याचा झाडा घ्यावा; ह्मणजे चोरीचा माल सांपडेल.

चंद्रप्रभा— ठीक खासी युक्ति! पण आतां तुह्मी उद्योगास लागा. तुह्मांला योग्य बक्षिस देण्याची तजवीज केली जाईल.

फौज०— बक्षिस कशाचें; हें आमचें कामच आहे, पण फिर्यादी कोण?

चंद्रप्रभा— फिर्यादी आमच्याच घरांतील एखादी दासी, आणि माझा स्वतःचा ऐवज तिच्या ताब्यांत असलेला आज रात्रौ चोरीस गेला. अशी उद्यां सकाळीं तुह्मांकडे फिर्याद येईल.

फौज०— कांहीं चिंता नाहीं मी आपल्याकडून तजवीज ठेवितों, जो चोरीचा माल ह्मणून ठरवावयाचा असेल, तो एका पेटी मध्यें घालून ठेवा; योग्यवेळीं मीं मनुष्य पाठवीन.

चंद्र०— त्याबद्दल कांहीं काळजी नको.

फौज०— बरें, आतां येतों तर! हुकूम मिळावा.

चंद्र०— बरें आहे; पण खबरदारी बाळगा.

याप्रमाणें संभाषण झाल्यावर फौजदार साहेब आनंदीत होऊन निघून गेले.

दुसरे दिवशीं हिंमत रावाच्या घरावर दरवडा पडून कांहीं दागदागीनें व कांहीं जवाहीर चोरीस गेल्याची बातमी जिकडे तिकडें गावांत पसरली, व फिर्याद होऊन फौजदार साहेब तपास करण्याकरीतां बाहेर पडून कांहीं कांहीं घराची झडती घेत चालले.

चंद्र नगरामध्यें सोमाजी या नावाचा एक किराणा जिनसाचा गरीब दुकानदार होता. व्यापार बरोबर चालत नसल्यामुळें, व घरीं मुलें माणसें चार खाणारीं असल्या मुळें त्याचें दुकान अगदीं मोडकळीस आलें होतें. सोमाजी हा हुशार, चतुर आणि उदार

अंतः करणाचा होता. तरी दरिद्राने व्यापल्यामुळें त्याचे ते सद्गुणदृष्टी स्पर्शास येण्याजोगे नव्हते. ह्मटलें आहे.

धनैर्निष्कुलीनाः कुलीना भवंति ॥
धनैरा पदं मानवा निस्तरंति ॥
धनेभ्यः परो बांधवो नास्ति लोके ॥
धनान्यर्जय ध्वं धनान्यर्जय ध्वम् ॥ १ ॥

" मनुष्य संपत्तिमान् असला ह्मणजे हलक्या कुळांतला असला तरी कुलीन होतो. धनाच्या योगानें कोणत्याही प्रकारचे दुःखांतून पार पडतां येतें. यालोकांत धनाहून साह्य कोणी नाहीं. यास्तव अवश्य धन संपादन करावें. "

आज पयत सद्गुण उघडकीस न येतां हजारों दरिद्री मरून गेले आहेत व दुर्गुणाचा लोप होऊन हजारों धनवान प्रतिष्ठा पावले आहेत. दरिद्री असला तर त्यास लोक उगीच तुच्छ मानितात व धनवान् असला तर त्यास पुज्य मानितात. खऱ्या खोट्याची निवडानिवड करण्याची शक्ति मनुष्यामध्यें असून चांगल्याची आवड करण्या कडे दुर्लक्ष होतें. हा इश्वराकडे खरोखर मोठा अन्याय आहे.

सोमाजी आपल्या लहानशा व्यापारामध्यें सचोटीचा उद्योग करीत असून जी कांहीं भाजी भाकर मिळत असे; तवढ्यावरच निर्वाह करून आनंदांत असे. दारिद्र्यानें पिडल्यामुळें जेवढीं जेवढीं संकटें मनुष्यावर येतात तेवढीं तेवढीं सोसण्याची मनुष्याच्या अंगीं शक्ति आहे; ती जर नसती तर एक दिवस देखील मनुष्याच्या अस्तित्वाचा संशय होता. फौजदार साहेब झाडा घेत येतां येतां आपण जो रंग भूमीवर प्रयोग करून दाखविणार त्यांतील नायकाचें सोंग कोणास द्यावें हा विचार करीत होता. इतक्यांत सोमाजीकडे त्याची नजर गेली. आणि त्यानें आपल्या हातारवालील शिपायांस सोमाजीच्या घराकडे जाण्याचा इशारा केला.

मुख्य प्रधानाच्या घरीं रात्रीं दरवडा पडला असून सरकारी लोक त्याचा तपास करीत आहेत. ही बातमी सोमाजीच्या घरांत समज

लीच होती. आणि इतक्यांत शिपायांसह फौजदारांची स्वारी त्याठिका णी जाऊन पोहोंचली तेव्हां ते लोक त्या उभयतांस व मुलांबाळांस काळा पेक्षां काळ दिसूं लागले. आणि तीं मनुष्यें जागच्या जागीं स्तब्ध झालीं. फौजदार ओट्यावर बसले. आणि शिपाई लोक आप ला पोषाक उतरून त्यानीं घराचा झाडा घेतला. परंतु घरांत कांहीं सांपडलें नाहीं. हें सांगावयास नकोच. फौजदारांनीं सोमाजीस बोलावून आणून सांगितलें कीं, काल रात्री प्रधानाच्या वाड्यावर जो दरवडा पडला त्याचा वहीम मालकाच्या आणि सर्वांच्या मतें तुजवर आहे. व सरकारची अशी खात्री होते कीं, हा गुन्हा खरोखर तुझ्या हातुन घडला आहे. तेव्हां तूं आतां कबूल होऊन चोरीचा माल आमच्या स्वाधीन करशील अशी मला फार आशा आहे. आणि असें केल्या पासून सरकार तुजवर थोडी बहूत तरी दया करील. व आमचेही श्रम कमी होतील तेव्हां सरकार तर्फे नाहीं! खासगी रीतीनें आमचें तु ला सांगणें आहे कीं, त्वां अपराध कबूल करावास. चूकून ह्मणा अ गर मुद्दाम ह्मणा. कोणत्याही रीतीनें जरी तुझ्या हातून तो अप राध झाला असला तरी चिंता नाहीं. सरकारांत तुजबद्दल आह्मी रदबदली करूं. बोल कायतें! हें भाषण ऐकतांच सोमाजीवर आकाश कोसळल्या प्रमाणें झालें. काय उत्तर द्यावें हें त्यास सुचेना. ईश्वराकडे वर दृष्टी करून तो रडूं लागला. तेव्हां फौजदार सा हेब ह्मणाले, आतां रडून काय करतोस. तूं दिसण्यांत तरी भला मनुष्य दिसतो आहेस. मग आतां विचार कसचा करितोस! काय असेल तें आ णून दे ह्मणजे झालें. त्यावर सोमाजी रडत रडत ह्मणाला. " सरकारच्या पायांजवळ मी शपथ घेऊन सांगतों कीं, यापैकीं मला कांहींएक माहिती नाहीं. " इतके शब्द सोमाजीच्या तोंडातून निघतांच फौजदार डोळे वटा रून ह्मणाले " अझून तरी तूं शुद्धीवर ये. हें तुला मी सोईनें सांगतों. विपत्ति भोगून शेवटीं कबूल व्हावें. ह्यांत कांहीं अर्थ नाहीं. नव विचार कर टंगळ मंगळ न करितां निमूट पणें कबूल हो. रडून दाखविल्यानें

चोरी पचेल असें समजू नकोस. ह्या काळाशीं गांठ आहे! बोल काय तें! "सोमाजी ह्मणाला" महाराज, निरपराध हा मजवर आरोप आलेला आहे हें मी परमेश्वरास स्मरून सांगतों " हे शब्द निघतांच फौजदाराच्या तळ पायांची आग मस्तकास जाऊन पोहोंचली. त्यानें रागानें डोळे लाल केले? आणि ह्मणाला " हराम खोर कुठचा; परमेश्वराचें भय सांगतोस. तुह्मां दरवडे खोरांना परमेश्वराचें भय असतें असें कोणी ह्मणेल काय; तूं अशानें कधीं कबूल होणार नाहींस. " कोण आहेरे, शिपाई रेम्या! रेम्या ह्मणाला, " जी सरकार; जा याला आंत घेऊन आणि थोडी समजूत द्या,, फौजदाराच्या तोंडांतून असे शब्द निघतांच त्या यमदुतांनीं सोमाजीस एका खोलींत नेलें. हा प्रकार पहातांच घरांतील बायका मुलांनी आकांत केला; पण फौजदार आणि शिपाई यांस त्यांची कांहीं दया आली नाहीं. शिपायांनीं सोमाजीस बराच खरपूस लाथाबुक्यांचा मार दिला. तो त्यास सहन न होऊन तो मोठ्यानें ओरडूं लागला. तेव्हां मुलें माणसेंही अतिशय आकांत करूं लागलीं तें ऐकून शेजारीपाजारी अतिशय दुःखी झाले! सोमाजी कडून हा अन्याय घडला नसून उगाच त्यावर तोहमत आली आहे. असें जर कळतें तर त्यांस फौजदार व शिपाई यांचा त्वेष आला असता. पण सोमाजीनें कदाचित हा दरवडा घातला असेल असें त्यांस वाटलें.

अर्ध मेला झाला तरी देखील हा कबूल होत नाहीं, अशी एका शिपायानें फौजदारास येऊन वर्दी दिली तेव्हां त्याच्या पायांत बिड्या घालून सर्व शिपाई यांसह फौजदार तुरंगाकडे कैदीस बरोबर घेऊन निघाले. परंतु जेवणा खाणाची वेळ झाली असल्यामुळें सोमाजीस फौजदारानें तुरंगांत पाठवून देऊन व त्याची जेवणाखाण्याची व्यवस्था एका शिपायास करावयास सांगून ते आपापल्या बिऱ्हाडीं निघून गेले.

दोन प्रहरीं जेवण खाण आटोपल्यावर रेम्या व दुसरे एक दोन शिपाई सोमाजीच्या खोलीमध्यें गेले. व पुन्हा त्यांनीं आपला उद्योग आरंभिला. रेम्या विचारूं लागला" कायरे हे गठडी. चोर; तूं आतां नि

मूट कबूल होतोस किंवा नाहीं" सोमाजी ह्मणाला" नाईक साहेब' खरोखर या दरवड्याच्या संबंधानें मला कांहीं ठाऊक नाहीं. तुमच्या माराच्या तडाक्यानें मी या भूमीवर मरून जरी पडलों तरी देखील हा अपराध खरोखर मी केला नाहीं. व ह्यांतील मला कांहीं ठाऊक नाहीं असेंच मला सांगावें लागेल; कारण ह्यांतील मला कांहींच माहिती नाहीं. कृपा करून माझे असे उगीच हाल करूं नका? हे शब्द ऐकतांच त्यांतील एक शिपाई ह्मणाला." रेमाजी बुवा, हा असा कधींही कबूल व्हावयाचा नाहीं. पाहतां काय; द्या एक लाथ कमरेंत! " दुसरा शिपाई ह्मणतो, " अरे, तो सांगतो आहेच कीं नाहीं. मरे पर्यंत आपण कबूल होणार नाहीं ह्मणून-रेम्या ह्मणाला " तर ह्याला पंधराव्या रत्नाचें बक्षिस अजूनही पाहिजे आहे. वाटतें. ,, लाथ मारून ह्मणतो, ,, हो कबूल नाहीं तर बघ तुझी आज गठडी वळतों ; ह्मणजे गांवांतले तरी दरवडे कमी होतील. " सोमाजी ह्मणाला, नाईक साहेब, आजपर्यंत मीं कधींही सरकारच्या गुन्ह्यांत सांपडलों नाहीं. पेठेमध्यें चौकशी करून पहा. ,, रेम्या ह्मणाला " तर तूं वस्ताद खरा गुलामा! आजपर्यंत एका देखील अपराधांतून सांपडला नाहींस ना ! आजपर्यंत सर्व चोऱ्या पचत गेल्या ह्मणूनच या मोठ्या दरवड्यांत हात घातलास! पण तो कुठचा लेका पचायाला आला आहे; आमचे हात देखील दुखायाला लागले बुवा ! पक्का बेरड बनलास ह्मणूनच तूं हा मार सोसलास. माझे हात आणि पाय अगदीं चुरून गेल्या सारखे झाले आहेत. बरें सध्यां काळीं दुकानावर जाऊन घोटभर पाणी प्यावें ह्मटलें तर त्याला तरी काय तुझ्या कडून मिळण्या जोगें आहे? तूं तर आमच्या पेक्षां अल्लाचा फकीर!

अशा गोष्टी चालल्या होत्या इतक्यांत फौजदार इकडेसच येत आहेत अशी एका शिपायानें येऊन वर्दी दिली. त्याबरोबर सोमाजीस तेथेंच सोडून सर्व शिपाई बाहेर आले. पुढें थोड्याच वेळानें फौजदारसाहेबाची स्वारी येऊन पोंहोंचली. त्यांस पहातांच सर्व शिपायांनीं लवून सला

म केला, आणि जवळच बाजूस उभे राहिले. फौजदार ह्मणाले " काय रे, सोम्या कबूल होतोस किंवा नाहीं, रम्यानें उत्तर केलें कीं, सरदार साहेब, तो पक्का ठग आहे. तो मरेपर्यंत देखील कबूल होईल असें दिसत नाहीं. ,, फौजदार ह्मणाले, " बरें, या मजबरोबर. ,, असें ह्मणून ते पुन्हा सोमाजी असलेल्या खोलींत गेले. त्यांस पहातांच सोमाजीच्या आंगावर परत कांटा उभा राहिला.

मनुष्याच्या स्वभावाचा असा एक धर्मच आहे कीं, खरोखर जर त्याच्या हातून अपराध घडला असला, तर तो भोगाव्या लागणाऱ्या यातना निमूटपणें सहन करून घेतो. व त्याबद्दल त्यास फारसें दुःख वाटत नाहीं आपण जी यातना भोगीत आहों, ती आपल्या अपराधास योग्य आहे; असें तो मानित असतो. पण निरपराध ज्यांवर अन्याय शाबीद होतो त्यास त्याबद्दल पराकाष्ठेचें दुःख होतें. आणि आपणाकडून अपराध घडला नाहीं असें ठाऊक असून जर कोणी छळ करूं लागेल तर त्याच्या मनाची जी स्थिती होते ती सांगतांच नये. तो परमेश्वराला, दैवाला, जगाला आणि सर्वांलाच दोष देत सुटतो. याप्रमाणें आमच्या सोमाजीची ह्यावेळीं अवस्था झाली. फौजदाराच्या पायांवर लोटांगण घालून मोठ्या आर्जवानें तो ह्मणाला, " सरकार, नाहक या गरिबाचा छळ होत आहे; मी आजपर्यंत कधींही कोणाचा एक छदाम चोरला नाहीं. मला थोडें बहुत जें कांहीं मिळतें; तेवढ्यानेंच मी काटकसर करून निर्वाह करीत असतों. आज आकस्मिक जो मजवर प्रसंग येऊन पडला. तेणेंकरून घरीं माझीं मुलें माणसें शोक करीत असतील. तीं मजवांचून अनाथ पडलीं आहेत. त्यांच्याकडे तरी कृपादृष्टी करून माझी यांतून मुक्तता करावी.

एखादा पाषाण हृदयाचा जरी मनुष्य असता तरी देखील त्यास ह्या वेळीं सोमाजीची दया आली असती. पण फौजदार साहेबास त्याबद्दल कांहींच वाटलें नाहीं. ते उलट ह्मणूं लागले" सोम्या' आतां हे पांडित्य पुरे कर. तूं आतां आहेस कोणाकडे. हें विसरलास वाटतें. सरकारी अंमल दारा पुढें कोणत्याप्रकारें वागलें पाहिजे, कसें बोल

लें पाहिजे? हें अजून तुला ठाऊक नाहीं. ह्यावेळीं तुजवर बे अदबी केल्याबद्दल खटलेंच उपस्थित करावयाचें. पण एक वेळ अडाणी स मजून सोडून देतों; बरें आतां असें सांग; उगाच डोकें उठवणार किं गुन्हा कबूल करणार? ह्यावर सोमाजी कडून मुळींच उत्तर मिळालें नाहीं. तेव्हां फिरून फौजदार ह्मणाले.

फौज०— या पेठें मध्यें मणिदत्त या नांवाचा एक सावकार रहात अ सतो. त्याला तूं ओळखतोस काय?

सोमा०— होय सरकार त्याला मी ओळखतों.

फौज०— बरें, तर या दरवड्याच्या कामांत तुला त्याची कांहीं मदत आहे काय? असल्यास होय ह्मण. ह्मणजे तूं यांतून मोकळा हो शील.

सोमा०— नाहीं सरकार; तो चांगला सचोटीचा मनुष्य आहे

फौज०— तूं एक सचोटीचा आणि तो एक सचोटीचा. गळे कातरू गुलाम. तुला आपली मुक्तता पाहिजे असेल तर ह्मण कीं, " मणि दत्त व आपण दोघानीं मिळून हा उद्योग केला असें; किंवा मणि द दत्ताच्या सांगण्या वरून हा आपण उद्योग करीत असतों असें ह्म ण किंवा सर्व चोरीचा ऐवज मणि दत्त विकत घेतो असें तरी सांग?

सोमा०— महाराज, असें कसें सांगूं? अशा चांगल्या माणसांवर आळ घेतल्यास परमेश्वर तरी काय ह्मणेल?

फौज०— ( रागावून ) नव्हती काय तुला मणि दत्ताची मदत? कोण आहेरे? मारा ह्याच्या लाथा कमरेंत! इतकें सांगण्या बरोबर मनांत कींव न आणितां सर्व शिपाई त्याच्या आंगावर जाऊन यज्ञामध्यें बो कडास ज्याप्रमाणें बुकलून मारतात. त्याप्रमाणें त्यास मारूं लागले. तेव्हां शेवटीं ह्या प्रकरणांत मणि दत्त आपणास सामील आहे असें त्यानें क बूल केलें; अस्तु. आतां हें प्रकरण कांहींवेळ येथेंच ठेऊन रत्नमालेकडे वळूं! इमारत बांधणारा एक बाजू पुरी करून नंतर दुसरीस आरंभ करितो असें होत नाहीं. त्यास चोहोंकडे लक्ष पोंचवावें लागतें. आह्मींही, ही

इमारत बांधीत आहों. शेवटास गेली तर तुमची ह्मणजे वाचकांची व आमची भेट होईल असें सांगण्याचें कारण मध्यें विघ्नेंहजार आहेत

रत्नमाला चिंताग्रस्त होत्सातां आपल्या खोलींत पलंगावर पडून आपल्याशींच बोलत होती; "काय करावें, विनाकारण जो आकांनीं माझा छळ मांडिला आहे; तो आतां माझ्यानें अगदीं सोसवत देखील नाहीं. कोणाशीं बोलायाला सांपडत नाहीं; कोणी माझ्या दृष्टीसही पडत नाहीं; माझ्या प्रीतींतल्या दासी काढून प्रस्तुत नवीन ठेविलेल्या असल्यामुळें, आणि त्या माझ्याशीं कठोर पणें वागत असल्यामुळें, आपलें दुःख त्यांना सांगूनही उपयोग नाहीं; आणि जीं माणसें दृष्टीस पडल्या पासून मला सुख होत नाहीं; उलट त्रास उत्पन्न होतो. तींच मनुष्यें वारंवार नजरे समोर येतात. या दैवामध्यें आणखीं काय लिहिलें असेल तें कांहीं समजत नाहीं. ज्याच्यावर माझें पूर्ण प्रेम आहे. तो तर कठोर मनकरून मला टाकून गेला. आतां मी या ठिकाणीं किती आकांत करून करून जरी दमल्यें तरी माझी समजूत करायाला कोण येण्याजोगें आहे? बरेंवाईट करणारीं जीं माझीं आईबापें तीं मला लहान पणींच सोडून गेलीं. इतक्यांत बाहेर कोणी येत असल्याची चाहुल तिला ऐकूं आली तों चंद्र प्रभा आंत येत आहे असें तिच्या दृष्टीस पडलें.

चंद्र०— रत्नमाले, इतकें झालें तरी देखील तुझ्या मनांतील निश्चय फिरत नाहींना?

रत्न०— फिरेल तर मग तो निश्चय कशाचा!

चंद्र० अग नाना साहेबाचें प्रेम तुजवर किति आहेह्मणून सांगूं! आणि काय त्याचें सौंदर्य! काय त्याची सौम्य प्रकृती! किती गोड स्वभाव! त्यांच्या पदरांत तुला घालायाची, हा जो माझा संकेत ठरला आहे. तो कधींही फिरावयाचा नाहीं; समजलीस?

रत्न०— तर तुह्मी आमच्या जन्माचें मातेरें करणार एकुण ! ह्यापेक्षां मला विहिरींत लोटून द्या. तें ही मला पत्करेल! ज्या माझ्या प्राणेश्वराला हें एकदां मन अर्पण केलें आहे. त्याच्याशिवाय मला इतर

बापा भावाप्रमाणें आहेत. कदाचित चंद्र सूर्याचाही पाश्चिमेस उदय होईल पण माझा हा निश्चय कधींही ढळणार नाहीं ! !

चंद्र०— ( रागानें ) कारटे, तुझें बरें व्हावें ह्या इच्छेनें मी उत्कृष्ट नवरा शोधुन काढिला. तर तें तुझ्या गांवीं देखील नाहींना ?

रत्न०— ज्याच्या पोटीं मी जन्म घेतला त्यांनीं शेवटीं मला तुझ्या स्वाधीन केलें आहे; तेव्हां माझें बरें करणार असें ह्मणतेस हें ठिकच आहे. पण मनापासून ज्याचा मी तिटकारा करित्यें, त्याची माझी गांठ घालून देणार तेव्हां ह्यांत माझें बरें तें काय करणार ! हें मला समजत नाहीं ! !

चंद्र०— पोरी, अजून सांगत्यें ऐक. त्या भिकाऱ्याच्या संगतीनें तुझें कधींही कल्याण होणार नाहीं. रस्तोरस्तीं तुला अन्नान्न करीत फिरावें लागेल, आणि नाना साहेबांच्या संगतीनें तुझें जन्माचें कल्याण होण्या जोगें आहे.

रत्न०— ( रागानें ) आका, तूं मला काय पाहिजे असेल तें बोल पण तिकडे एखादा वांकडा शब्द बोलून उगीच माझ्या काळजाला छिद्रें पाडूं नकोस.

चंद्र०— त्याला वांकडा शब्द बोलल्यानें तुला इतका राग येतो अँ०— बरें आहे! तर सुमंत राव तुझ्या दृष्टीसही पडणार नाहीं अशी तजवीज मी करीन; ते दिवशीं तो रखोजीच्या हातुन कसा सुटला, कोण जाणें. आतां सुमंत जिकडे गेला आहे; तिकडून पुन्हा येण्याचा संशय नकोच. पण जर आला तर त्याला जिवंत कधींही राहू देणार नाहीं. आणि कदाचित नानासाहेबा बरोबर लग्न लावण्यास तूं कबूल न होशील. तर अन्न पाण्या शिवाय या अंधार कोठडींतच तूं मरून जावें अशी मी तजवीज करीन? आतां मी निघून जात्यें अजुनही विचार कर पुढें रत्नमाला कांहीं बोलणार तोंच चंद्रप्रमा निघून गेली. व रत्नमाला पूर्ववत दुःखानें व्यापून जागच्याजागीं रडत राहिली.

भाग ६ वा.

चंद्रनगरच्या पश्चीमेस सुमारें दीड कोशावर उत्तर दक्षिण डोंगराची एक ओळ असून वर दाट झाडी होती. अनेक प्रकारच्या वृक्षांनीं तो डोंगर व्याप्त असल्यामुळें उंच उंच वृक्षांचें तें अरण्य आहे असें लोकांस वाटे. त्या डोंगराच्या पायथ्याशीं लहानशी एक नदी वहात होती त्याच्या आसमंतांत गोरगरिबांचीं दहा पांच झोंपडीं होतीं. डोंगराच्या उतरणीवर नदीच्या कांठीं एक लहानसा वाडा बांधिलेला होता; त्याला मठ अशी संज्ञा होती. त्यामध्यें आनंद स्वामी या नांवाचा एक साधू रहात असे. बरेच दिवस तो प्रसिद्धीस आलेला असल्यामुळें चंद्रनगरांतून त्या मठापर्यंत वीस हात रुंदीचा रस्ता बांधलेला असून दुतर्फा रांगेनें झाडें लाविलेलीं होतीं. मठाजवळ एक लहानसा तलाव होता. त्याचें नांव स्वामीनीं आनंदतीर्थ असें ठेविलें होतें. पायथ्यास जी एक लहानशी नदी होती ह्मणून सांगितलें! तिचें आनंदी असें स्वामींनीं नांव ठेविलें होतें; तसेंच वाड्याचें नांव आनंदमंदीर, वाड्या सभोंवतील जाग्याचें नांव आनंदस्थळ, आणि दहा पांच झोपडीं होतीं तेवढ्या सगळ्या प्रदेशास आनंद नगर अशीं स्वामीनीं नावें दिलेलीं होतीं. आलिकडे बराच लौकीक होऊन हजारों स्त्री पुरुषांचा समुदाय नेहमीं स्वामीच्या दर्शनास येत असल्यामुळें रस्त्यांतून गर्दी दृष्टीस पडे. त्यांत अनेक कामेच्छु स्वामीच्या सेवेकरितां मठा जवळ बिऱ्हाड ठेऊन राहिलेले होते. त्यांत कितिएक स्त्रि पुरुषें पुत्र प्राप्ती करितां, कितीएक धन प्राप्ती करितां, कितीएक रोग निवारणार्थ, कितीएक अंध गेलेले डोळे पुन्हा येण्या करितां, असे अनेकांचे अनेक हेतू होते. त्यांत कितिएक प्रातःकाळीं स्नानादि विधी आटपून मठासभोंवतीं प्रदक्षिणा घालीत असत कितएक मठा पुढें प्रदाक्षिणेच्या वाटेवर लोटांगणें घालीत असत. किती एक ताल मृदंगादी वाद्यें घेऊन भजन करीत असत, कोणी एकिकटेच राम राम किंवां कृष्ण कृष्ण किंवां कोणत्या तरी देवाचें भजन करित बसलेले असत. आंवळे पांगळे व दुसरे

कितीएक पोटार्थी रस्त्यावर दोहोंबाजूनीं फडकीं टाकून, कोणी पैसा अधे
ला, कोणी तांदूळ, कोणी कांहीं, कोणी कांहीं, टाकावें अशा इराद्यानें
बसलेले होते मठासभोंवती तऱ्हे तऱ्हेचीं शेंपन्नास दुकानें मांडिलेलीं होतीं
त्यांत तांब्यापितळेच्या भांड्याची व बारीक मोठ्या सणगाचीं दुकानें थोडींच
होतीं पण मेवामिठाइ व कापूर, अबीर, बुका, साखर, उदकाड्या हीं दुका
नें पुष्कळ होतीं. कितीएकांत तर नुसते नारळ राशीनीं भरून ठेविलेले
होते . कितीएक भुसारी दुकानें होतीं ह्या दुकानाच्या मागें यात्रेकरू
लोकांस भाड्यानें देण्याकरितां लहान लहान दहा वीस घरें जमीनदारानीं
बांधून ठेविलीं होतीं. चंद्रनगरांतील एका श्रीमान व्यापाऱ्यानें आनंदीच्या
कांठीं दोन तीन धर्मशाळा बांधून ठेविल्या होत्या. मठाजवळ एक घुमटी
प्रमाणें देऊळ बांधून आंत स्वामींनीं लिंगस्थापना केली होती; त्याचें
नांव त्यांनीं आनंदेश्वर असें ठेविलें होतें. त्या देवालयाचें पुष्कळ काम
व्हावयाचें होतें. मुळचें साधूचें नांव आनंदस्वामी आणि इतर; आनंदी.
आनंदीतिर्थ, आनंदस्थल, आनंदनगर, आनंदमंदीर, आनंदेश्वर इ०
नांवांप्रमाणें सर्वच त्याठिकाणीं आनंद होता; यांत तिळमात्र संशय ना
हीं. संसाराच्या व कामधंद्याच्या सर्व यातना मागें टाकून पीडितजन
याठिकाणीं येऊन आनंद पावत असत.अशाप्रकारचें हें स्थळ बनून गेलेलें होतें
खरेंच आहे. विश्वास बसल्यावर पीडित जनास दुःखाचा परिहार होऊं
लागला आहे; असें त्यांस वाटत असतें. आणिं त्यांचें मन समाधान
पावूं लागतें. पण दुःखाचा परिहार होण्याजोगा नाहीं असें समजून आलें ह्म
णजे मग अविश्वास बसून त्याचें मन अतिशय क्षुब्ध होऊन जातें,
आणि ज्यावर विश्वास ठेविला असतो तो शत्रूसारखा वाटू
लागतो. असो आनंदस्वामी हें काय प्रकरण आहे ह्याची
रिक्षा पहावी अशा इच्छेनें कित्येक, कित्येक उगाच मौजेनें, व कि
त्येक यात्रेचा समारंभ पाहाण्याकरितां, व कित्येक दुसऱ्या निरनिरा
ळ्या हेतूनें सहस्त्रावधी लोक त्याजागीं जमत असत. त्याठिकाणें
उभें राहिलें असतां एखाद्या चतूर मनुष्यास स्वामीच्या ठिकाणी भों

वना आहे कोणाची आणि नाहीं कोणाची, हें सहज समजे. आनं द स्वामीही चतूर असल्यामुळें भक्तांस ओळखून निरनिराळे प्रकारें त्यांच्याशीं आपलें वर्तन ठेवित असत.

एके दिवशीं सकाळीं सहा घटके दिवसास भाविक जन प्रीती पुरःसर पूर्वी सांगितल्याप्रमाणें सेवा करीत असतां स्वामी मठाच्या दरवाजांतून बाहेर पडून आंगणांमध्यें एक खुर्ची टाकलेलि होती त्यावर येऊन बसले. ते नित्यशाः या ठिकाणीं चार घटका येऊन बसत असत. बाकी दिवसरात्रीतून केव्हांही मठा बाहेर पडत नसत. तेव्हां अर्थात ह्या चार घटका भक्तांस विशेष आनंद दायक गडबडीच्या होत स्वामीची स्वारी दृष्टीस पडताच एकदम भक्तांचे सर्व व्यापार बंद होऊन आपापलें गाऱ्हाणें पूर्वी कळवितां यावें अशा इराद्यानें ते स्वामी जवळ येऊन गर्दी करीत. त्यांत कितिएक धष्ट पुष्ट असतील ते त्यांतून पुढें जात. अर्थात लुंगें सुंगें आणि अशक्त, हे मागें पडत असत. आणि बहुत्वा तमासागीर ह्मणजे मौज पाहणारे हे सभोंवती असत. त्या ठिकाणीं बसण्याची चार घटकेचीच स्वामीची मुदत असल्यामुळें सर्व लोकांची गाऱ्हाणीं कधीं संपत नसत. यामुळें किती एकांस तर दोन दोन महीनें कुचंबावें लागत असे. बायकांस पुत्र प्राप्ति करीतां पिंपळास प्रदाक्षिणा रोग्यांस मठासभोंवती प्रदाक्षिणा, व लोटांगणें, व द्रव्य प्राप्तिची आशा धरणारांस एका एका देवाची आराधना, या प्रमाणें कोणास कांहीं कोणास कांहीं, स्वामी सांगत असत. प्रथम दर्शनी स्वामी पुढें मोठी भेट ठेवावी लागत असे. ह्या चार घटकेच्या अवकाशांत नारळ, केळीं, साखर, मेवा मिठाई, व रोकड निदान शेंपन्नास तरी; याप्रमाणें दर दिवस स्वामीची प्राप्ती असे. व श्रीमान लोकांकडून त्यांच्या शक्ति प्रमाणें विशेषही लाभ होत असे.

ह्या शिवाय आणखी दुसऱ्या एका बाजूनें स्वामीस दिवसांतून बरीच मोठी प्राप्ती होती तो प्रकार असा कीं मंदिराच्या ओऱ्यावर छत लावून एक चौक तयार केलेला होता त्यांत एक सुंदर मखर होतें. मखराच्या

आंत एक चौरंग मांडून त्यावर रुपेरी मुलाम्याचा देवारा ठेऊन त्यांत एक सुवर्णाची लहानशी दत्ताची मूर्ति ठविलेली होती. मखरा पुढें एक चौरंगावर एक रुप्याचें ताट ठेविलेलें होतें. भक्तांस जी कांहीं दक्षिणा ठेवावयाची असेल ती त्या ताटांत ते टाकीत असत. शिवाय नारळ केळीं शाळीं, मेवा मिठाई यांच्याही जवळ राशी पडलेल्या असत. सर्व काळ अबीर, बुका, उदकाड्या, यांचा घम घमाट सुटलेला असे. कापूर जळून जळून त्याच्या काजळानें वरचें छत अगदीं काळें कीट झालें होतें. यामूर्तीची पूजा स्वतः स्वामी कधींच करीत नसत. पण कांहीं व र्षासनें नेमून देऊन मूर्तीच्या पूजे करितां एक दोन पूजारी ठेविलेले होते. रखवाली करितां विश्वासूक अशा आठ दहा असामींची तिकडे यो जना केलेली होती. ते आळी पाळीनें दोन दोन असामीं त्याठिकाणीं असत. त्या मूर्तीस स्वामींनीं श्री अशी संज्ञा दिलेली होती. आणि तेंच त्याचें आराध्य दैवत होतें; अस्तु.

स्वामी मंटपांत येऊन दोन घटका झाल्या नाहींत तोंच कांहीं सी पायांसह वर्तमान हिंमत राव व चंद्र प्रभा हीं उभयतां त्या ठिकाणीं येऊन पोंचलीं. त्यांस पहातांच स्वामी आनंद भरीत झाले. आणि सर्व लोकांस एके बाजूस होण्याकरितां त्यांनीं खूण केली. हीं जाडीं प्रकरणें पहातांच सर्व भक्तांनीं बाजूस होऊन त्यांस रस्ता दिला. तेव्हां ती स्वामीं पुढें येऊन पोंचलीं.

चंद्र प्रभेनें एका सोन्याच्या ताटांत कांहीं जवाहिर, कांहीं पुतळ्या कांहीं मोहरा घालून बरोबर आणिलें होते. तें तिनें स्वामीपुढें ठेवीलें; तिकडे पहातांच स्वामी फार आनंदित झाले. कारण, त्यांस एवढा नजराणा आजपर्यंत कधींच मिळाला नव्हता. नंतर चंद्र प्रभा व हिंमत राव नमस्कार करून हातजोडून पुढें राहिलीं. तेव्हां स्वामी ताटाकडे बोट करून ह्मणाले,, हें कशाला? आह्मीं दिगंबर लोक, आह्मांला ह्याची काय जरूर आहे.

हिंम०—महाराजांकरितां कांहीं नकोच. पण श्रीच्या खर्चाकरितां

जरूर आहे ( मनांत ) गुलामा, बायका पोरांना आणि अज्ञान लोकांना तूं ठकवितोस यांत कांहीं नवल नाहीं. परंतू मी देखील हिच्या संगतीनें तुझ्या नादीं लागलों.

चंद्र०— श्रीच्या खर्चाकरितां एक दोन गांव निराळेच तोडून द्यावे; असें इकडे मनांत आहे.

हिंम०— ( मनांत ) काय करूं ? ही तर अजूनही ह्या ढोंग्याची भर करूं पहात आहे. पण गांव आपले हातचे गेले तरी आपलेच आहेत; असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

स्वामी०— बरें तुमच्या इच्छेप्रमाणें सर्व गोष्टी घडून आल्याना; बोला उघड ? आतां कांहीं चिंता नाहीं.

चंद्र०— नुकतेंच बंड केलेलें महाराजांनीं ऐकिलेंच असेल.

स्वामी०— होय, थोडकें चुकलें. नाहींतर मणिपाल जगांतून नाहींसा होऊन तुह्मांला शत्रू ह्मणून कोणीच उरला नसता.

चंद्र०— तेवढीच आतां एक धुग धुग आहे ह्मणावयाची.

स्वामी०— कांहीं चिंता नाहीं. श्रीच्या कृपेनें सर्व यथास्थित होईल. मणिपालाची भिती धरण्याचें कांहीं कारण नाहीं.

हिंम०— ( मनांत ) थोडें चुकलें ! तूं बायकांना आपल्या नादीं लावून ठेवितोस व आपल्याला पदच्यूत करण्याची मसलतही सांगितली होतीस, असें जर कां मणिपूरच्या राजाला समजलें असतें. तर त्यानें तुझें डोकेंच उडविलें असतें. आणि तसें झालें असतें तर राजद्रोहांतून मीही सुटलों असतों.

चंद्र०— एकदां जयपाळ राज गादीवर बसून सर्वत्र शांतता व्हावी अशी इच्छा आहे.

स्वामी०— कांहीं चिंता नाहीं. सर्व यथास्थित होईल.

चंद्र०— मग या दासीकडून जी कांहीं अल्प स्वल्प सेवा व्हावयाची तींत कांहीं आळस होणार नाहीं; हें सांगणें नको ! पण उगीच आपली सूचना केली आहे.

स्वामी०— त्याबद्दल आह्मांस कांहीं आशा नाहीं. श्रीची सेवा करा अगर न करा. इतकें ह्मणून शिष्यांस एक आसन मांडावयास सांगून त्यावर या दंपत्यास बसण्याची स्वामींनीं खूण केली. इतक्यांत नळ व्याधीनें पीडित झालेला एक शिष्य एका हातानें पोट दाबून धरून ओरडत पुढें आला. त्यास पहातांच स्वामींनीं एका शिष्यास पळीभर त्याच्या हातावर तीर्थ घालण्यास सांगितलें, तें प्राशन करितांच तो रोगी खडखडीत बरा झाला. हें पाहून चंद्रप्रभेस आश्चर्य वाटलें. हा ईश्वरानें पीडिताच्या रक्षणाकरितां अवतार धरला असावा. अशी तिनें कल्पना बांधिली. तिचा त्यावेळचा चेहरा पाहून स्वामी ह्मणाले " चंद्रप्रभे, तूं इतकें आश्चर्य कसचें करितेस. ही सर्व ईश्वरी सत्ता आहे. "

चंद्र०— मनांतील भाव देखील महाराजांनीं जाणिला.

स्वामी०— चंद्र प्रभे, गर्वानें कांहीं नाहीं सांगत. पण भूत, भविष्य, वर्तमान हें सर्व श्रीच्या कृपेनें जाणत असतों. त्या दिवशीं जयपाळ व तुह्मी मणिपालाच्या घाताविषयीं जेव्हां बेत केलात, त्याच वेळीं मला समजलें; व या आमच्या गोविंद भटजीं जवळ ती मी गोष्ट बोललों होतों.

गोविं०— होय, महाराज त्यादिवशीं ह्मणाले खरें.

हिंम०— हें सर्व महाराजांनीं सांगितलें पाहिजे असें नाहीं. प्रत्यक्ष अनुभव आहेच. ( मनांत )आतां या ठिकाणीं फारवेळ बसून उपयोगी नाहीं. हा ढोंगी आणखी किति साक्षात्कार आह्मांस दाखवूं लागेल याचा नेम नाहीं. तेव्हां आतां निघावें हें बरें. ( उघड ) महाराज, फार उशीर झाला, आतां आज्ञा मिळावी.

स्वामी०— श्रीची भक्ति मनोभावें करा. ह्मणजे कांहीं कमी पडणार नाहीं.

चंद्र०— त्यांत कांहीं अंतर पडत नाहीं. हें महाराजही जाणत असतीलच.

स्वामी०— होय, पण उगीच आपली सूचना केली आहे.

यापमाणें संभाषण झाल्यावर त्या उभयतांनीं स्वामीच्या चरणीं मस्तक ठविलें व जाण्याची आज्ञा घेऊन गाडींत जाऊन बसलीं. आणि शिपाई प्याद्यासहवर्तमान चंद्रनगराप्रत जातीं झालीं. असो; आतां दरवज्याचें प्रकरण भिजत पडलें आहे तें हातीं घेऊं.

"सामाजीनें माणिदत्त शेटीचें नाव सांगितलें आहे.,,

एके दिवशीं सकाळीं मुख मार्जनादि विधी आटपून माणिदत्त आप ल्या पुढील दारीं येत होता, इतक्यांत त्यास एका चाकरानें येऊन सां गितलें कीं, कोणी एका मजूर दारानें आमच्या दरवाज्यांत एक पेटी आणून ठेविलेली आहे. त्यास आह्मीं कोणाची, काय, हें विचारतां त्या नें हिचा धनी मागाहून येत आहे असे सांगितलें; आणि तो निघून गे ला. ह्या गोष्टीस बराच वेळ झाला तरी अद्यापि कोणी धनी येत नाहीं. ही गोष्ट ऐकतांच माणिदत्तास व घरांतील सर्व माणसांस मोठें आश्चर्य वाटलें; पण थोड्याच वेळानें आपला सुमंतराव येत असेल; व तो को ठें तरी बोलत उभा राहिला असेल; अशी त्यांनीं कल्पना काढिली.व चाकरास आंत पेटी आणून ठेवावयास सांगून तीं सर्व माणसें सुमंत रा वास पहाण्यां करितां दरवाजांत येऊन उभीं राहिलीं. सगुणीचा तिच्या वयाप्रमाणें थोडासा अल्लड आणि उतावळा स्वभाव होता. ती त्याच्या येण्याच्या वाटेनें धांवत पुढें निघाली; परंतु सुमंतराव कोठें दिसेना; ते व्हां निराश होऊन पुन्हां मागें परतली. तिला मागें येताना अतिशय वाईट वाटूं लागलें.! ती पुन्हा मागें पाही; पुन्हा चाले; असें करीत द रवाजांत येऊन पोंचली. आणि दादा कोठें नाहीं असें सांगून माणिदत्ता च्या गळ्यास मिठी मारून ती रडूं लागली. तिच्याकडे पाहून त्यासर्व कूटुंबाचे डोळें पाण्यानें भरून आले.

सुमंतराव येत आहे, असें जर सगुणीस समजलें नसतें; तर तिला इतकें वाईट वाटतें नसतें. पण सुमंत रावाच्या येण्याची आशा दिसून शेवटीं निराशा झाली. तेव्हां तिचें कोमल अंतः करण असल्यामुळें ती रडूं लागली ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. बराच वेळ झाला, तरीही

तिचा हुंदका आटपेना! असें पाहून मणिदत्तशेट ह्मणाला " बाळे, किती रडशील; उगी रहा. सुमंतराव लौकरच येईल; खचित तो च्यार दोन दिवसांत आल्याशिवाय रहाणार नाहीं .रडून रडून डोळे किंग सुजाविलेस! अशा अनेक गोष्टी सांगून मणिदत्त व त्याची बायको हीं दोघेंही तिची समजूत करूं लागलीं. अशा गडबडींत पेटीचा त्यांस विसर पडला.

इतक्यांत दहा पांच शिपायांसह फौजदार त्याठिकाणीं येऊन पोचले त्यांस पहातांच सगुणीकडे त्यांचें दुर्लक्ष होऊन येणाऱ्या मंडळीकडे लागलें. मणि दत्त शेटीनें फौजदार साहेबांस लोडाजवळ जागा देउन बसविलें. व तें इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलुं लागले. सगुणीनें ही आपलें रडें बंद करून ती दाराच्या आंत जाऊन खिडकींतून हे काय बोलतात तें ऐकूं लागली. चाकर माणसें आपल्या कामास लागलीं.

आपल्या घराचा झाडा घेण्या करीतां हे आले असतील; असा मणिदत्तास संशय देखील आला नाहीं. व आजपर्यंत कोणत्याही प्रसंगीं याच्या घराची झडती झाली नाहीं. असो मणिदत्त ह्मणाला.

मणि०— आज आपले इकडे कोणत्या हेतूनें येणें झालें असावें बरें.

फौज०— ( जरा विचार करून ) आपल्याच इकडे नुकतीच प्रधान साहेबांच्या वाड्यांत चोरी झाली आहे हें आपणांस माहित असेलच.

मणि०— होय, कांहीं जवाहीर व कांहीं दागदागीने गेले असें ऐकितों.

फौज०— त्या दरवडे खोरांस तुह्मी सामील असल्याचें समजण्यांत आलें. तेव्हां त्या चौकशीकरितां आह्मी याठिकाणीं आलों.

हे शब्द कानीं पडतांच मणिदत्ताच्या आंगावर कांटा उभा राहून तो अगदीं चकित झाल्यासारखा झाला. आज आपल्या पांच दहा पित्या हा धंदा चालला असून कलंक ह्मणून कोणत्याही प्रकारचा कधींच लागलेला नाहीं.आपणही पुष्कळ दिवस सचोटीच्या व्यापारांत घालविले असून आतां आपला वृद्धापकाळ आला. अशावेळीं हा प्रसंग येऊन पडावा, अशी परमेश्वरानें वेळ आणिली. तेव्हां पुढें करावें काय ? हा

तो विचार करूं लागला. शेवटीं त्यानें असें ठरविलें कीं, जर अब्रू जाण्याची वेळ आली तर हिरकणी झरवून पिऊन मरावें. आजपर्यंत शेंकडों प्रामाणिक व्यापारी अब्रूच्या रक्षणार्थ ज्या मार्गीनें गेले आहेत त्या मार्गानें आपणही जावें हें बरें. सुमंतराव आपल्या मागें कुटुंबाचें रक्षण करील. ह्याप्रमाणें आपल्या मनाची समजूत करून व मन घट्ट करून तो ह्मणाला " फौजदार साहेब, सरकारास आजपर्यंत ज्या गोष्टीचा कधीं ही संशय लागला नाहीं, त्या गोष्टीचा आज संशय लागला याचें कारण काय ? सरकारास ज्यावेळीं कर्ज काढण्याचें कारण लागतें त्यावेळीं माझ्या जवळून लक्षावधी रुपये घेतले जातात. इतर सावकार याठिकाणीं पुष्कळ असून माझ्याशिवाय दुसऱ्याकडून सरकार कर्ज कधींच घेत नाहीं. जर कोणास कधीं जामीनाची गरज असली तर केवढ्याही रकमेपर्यंत सरकार मला जामीन घेतें. महत्वाच्या खटल्यांत जर पंचाची गरज लागली,तर प्रारंभीं मला बोलावणें येतें एकंदरींत सरकारचा पूर्ण भरंवसा आह्मांवर असून आज विलक्षण संशय सरकारास कां बरें आला असावा,, फौजदार साहेब ह्मणाले, " तुह्मी ह्मणतां तें सर्व खरें; असें मलाही वाटतें; पण पुरावा पडल्यावरून तुमच्या घरचा झाडा घेणें जरूर आहे. ,, मणिदत्तशेट ह्मणाले " असें आहे तर होऊं द्या. ,,

इतकें झाल्यावर फौजदारानें शिपायांच्या हातचें कलमदान घेऊन व एक कागदाचें पान चुरून ह्या तिघांचेंही जबाब घेतले. त्यात त्यांनीं प्रधानाच्या घरी झालेल्या दरवड्याबद्दल आपणास कांहीं एक ठाऊक नाहीं वगैरे मजकूर सांगितला. तेव्हां फौजदारानें शिपाई लोकांस कपडे उतरावयास सांगून झाडा घेण्यास आरंभ केला. जामदारखाना व इतर ठिकाणच्या पेट्या वगैरे उघडून पहातां पहातां चोरीचें जवाहीर व दागीनें एका पेटींत सांपडले. हें कोणीतरी कपट आह्मांस पाशांत घालण्याकरितां केलें असावें! अशी माणि दत्ताची खात्री होऊन त्यानेंही पेटी येथें कशी आली; वगैरे प्रकार फौजदारास समजावून सांगितला. पण तेवढ्यानें समजूत न होतां फौजदार अतिशय संतप्त

झाले. आणि आपल्या नित्याच्या वहिवाटी प्रमाणें शिवीगाळ करूं लागले. हा सर्व प्रकार पहातांच वरांतील मनुष्यें अगदीं घाबरून गेलीं. ह्या संकट काळीं जर आपणांस कोणी साह्य कर्ता भेटेल तर फार चांगले होईल; असें त्यांस वाटूं लागलें. शेजारी पाजारी व कांहीं संभावित गृहस्थ त्याठिकाणीं आले होते, पण त्यांतुन कोणीएकानें ही तोंडातून शब्द काढिला नाहीं. मुद्याचा माल पहातांच ते सर्व तटस्थ झाले. व याठिकाणीं माल सांपडावयाचा नाहीं; अशी जे फौजदाराची खात्री करीत होते, तेअगदीं खजिल झाले; व त्या सर्व लोकांस तुह्मीं देखोल या चोराचे भागीदार खचितच असाल असें ह्मणून शिपायांकडून फौजदारानें बाहेर घालविलें; आणि मणिदत्त, सगुणी, व तिची आई यातिघांस एके ठिकाणीं बोलावून आणून आजपर्यंत तुह्मीं दुसरा कांहीं चोरीचा माल छपविला आहे काय? असें त्यांस फौजदार साहेब विचारूं लागले, पण तीं कसचें उत्तर देतात? तीं मनुष्यें बोलत नाहींत असें पाहून फौजदारानें त्या प्रत्येकास एका एका खोलींत नेऊन समजूत देऊन कबूल करा; असें रेम्यास सांगितलें. हे शब्द कांनीं पडतांच त्या त्रिवर्गाच्या मनाची काय स्थिती झाली असेल, याचा वाचकांनींच विचार करावा. ती बरोबर दाखवितां येणें हें काम फार बिकट असल्यामुळें आह्मी हातचें सोडून देतों.

हा प्रकार चालला असतां सर्व चाकर माणसें एका कोनांत जाऊन रडत बसलीं होतीं; पण समजुतीची गोष्ट फौजदारानें काढतांच त्यांतील पांच चार चाकरांस अतिशय आवेश उत्पन्न झाला; व ते दांत ओंठ चावूं लागले, आणि तेथून उठून जरा एका बाजूस जाऊन कांहीं गुजगुज बोलूं लागले. ते काय बोलले हें समजलें नाहीं; कारण, ते अगदीं हळू बोलले होते; पण पुढील शब्द मणिदत्त जरा जवळ असल्यामुळें त्याच्या कानीं पडले. " अरे पहातां काय? जवळच्या कोनांतील चार सोडगीं घेऊन फौजदाराच्या व इतर शिपायांच्या डोकीवर घालून त्यांस यमाच्या दरबारांत न्याय करण्या करितां पाठवा! ह्मणजे चांगल्या माणसांस देखील विनाकारण तुह्मीं जी समजूत देतां ती कां?

असें विचारून यम धर्मच त्यांची समजूत करील. धन्याच्या जिव खातर आमचें काय होईल तें होवो. सूळावर चढलों तरी चिंता नाहीं. " हे शब्द कानीं पडतांच माणि दत्तानें नेत्रसंकेतानें त्यांस गप्प रहाण्याविषयीं खूण केली. आणि फौजदार साहेबाचा हात धरून त्यास घरांत घेऊन गेला, व एक पेटी उघडून दहा हजारांचें जवाहीर काढून त्यानें फौजदारा पुढें ठेविलें; तें पहातांच फौजदार संतुष्ट झाले, पण तेवढयानें आनंद न दाखवितां ह्मणाले! अँ! यांत काय आहे; एवढें एखाद्या गरीबाकडून आह्मास मिळतें. तुमच्या सारख्या कडून निदान पन्नास हजार तरी रोखड मिळालि पाहिजेत हें ऐकतांच निरुपायानें पन्नास हजार किंमतीचें जवाहीर मणिदत्तानें काढून दिलें, तें घेऊन फौजदार ह्मणाले, आतां तुह्मी समजुतींतून सुटलां; असें सांगून तें जवाहीर त्यानें आपल्या खिशांत घातलें. व खिसा भरून गेला तेणें करून आनंदित होत्साता बाहेर आला; आणि रेम्यास हांक मारून ह्मणाला, ह्या तिघांच्या पायांत बिड्या घालुन यांस तुरगांत घेऊन चला. बिड्यांची गोष्ट काढतांच तीं मनुष्यें पुन्हा संकटांत पडलीं. मणिदत्तानें पुन्हा फौजदारास आंत नेऊन दुसरें पन्नास हजारांचें जवाहीर त्याच्या पदरांत घातलें, त्यानें दुसरा खिसा भरला असें पाहून फौजदार मनांत ह्मणाला, जन्मांत अशी शिकार कधींच सांपली नव्हती. चंद्र प्रभा बाई साहेबांचा हा प्रसादच समजावयाचा! या प्रमाणें विचार करीत फौजदार बाहेर आले, आणि रेम्यास सांगू लागले, " रेम्या, या त्रिवगींच्या पायांत बिड्या घातल्याशिवाय यांसघेऊन चालते व्हा.,, याठिकाणीं वाचकांस असा संशय येईल कीं, शिपाई लोक पुष्कळ असून फौजदार साहेब रेम्यालाच कां दिवसभर हांक मारितात? तर आह्मी सर्वांस एकदां असें कळवून ठेवितों कीं, रेम्या हा फौजदार साहेबाच्या प्रीतींतील शिपाई होता, ह्मणूनच ते त्यास पूर्वीं हांक मारीत असत. असें जरी होतें तरी ह्याप्रसंगीं फौजदाराचे दोन्हीं खिसे भरले, पण आपल्या हातास कांहीं लागलें नाहीं, व तें लागण्याची संधी फौजदारानें घालविली; ह्मणून ता व

दुसरे शिपाई मनांत चुटपुटूं लागले. पुन्हां तुरुंगाकडे पाठविण्याची फौज दारानें गोष्ट काढल्या बरोबर मणिदत्त त्याची विनवणी करून ह्मणाला, " मी पाहिजे तो जामीन देतों, तेवढ्यावरच तूर्त माझी मुक्तता व्हावी ,, फौजदार ह्मणाले " जामीनबिमीन कांहीं एक नाहीं. तुह्मांल तुरुंगांत गेलेंच पाहिजे. ,, मणिदत्त ह्मणाला, " जरा अवकाश सांपडेल, तर तुमच्या वरिष्ठाकडून जामिनावर मुक्त होण्याची मी तजविज करीन,, फौंजदार ह्मणाले " किती वटवट लावतोस, रेम्या, खें चून यांना बाहेर काढ. ,, इतकें सांगतांच रेम्या मणिदत्ताच्या चटकन् आं गावर धांवला आणि त्याचा हात धरून एका हिसक्यानें त्यास ओट्याच्या बाहेर खालीं लोटून सगुणी व लिलावती यांस ह्मणाला " चला, पडा बा हेर सोईनें. ह्यावेळीं त्या तिघांस " दे माय धरणी ठाय ,, झालें! तें तिन्ही मनुष्यें ढळढळां रडूं लागलीं, व विलाप करूं लागलीं! त्यांस पहातांच सर्व चाकर माणसें रडून आकांत करूं लागलीं! या प्रमाणें तें सर्व घर करुणा स्वरानें अगदीं दणाणून गेलें. मरण समयीं कुटुं बांच्या आकांताकडे लक्ष न देतां काळ ज्याप्रमाणें प्राण जबर दस्ती नें नेतो; त्याप्रमाणें चाकरांच्या विलापाकडे लक्ष न देतां त्यांचे हे तीन प्राण, शिपाई लोकांनीं खेंचित बाहेर काढून तुरुंगाकडे चालविले

मणिदत्ताचें सर्व घराणें परोपकारी व जगन्मीत्र, असल्यामुळें का ळांनीं त्यांस ओढून नेतांनां ज्यांनीं ज्यांनीं ह्मणून पाहिले व ऐकिलें. त्या सर्वांच्या नेत्रांतून अश्रु गळाले फौजदारास व शिपायांस पुष्कळ शा प दिले पुढें ही बातमी नगरामध्यें थोडक्याच वेळांत चोहोंकडे पसरली!

## भाग ७ वा.

राजा व रघोजी अरण्यांत जाण्याकरितां निघाले, हें पूर्वी कळविलेंच आहे. सूर्योदयाच्या सुमारास ते एका ओढ्याच्या कांठीं येऊन पोंहों चले. ह्यावेळेपर्यंत त्यांस नुसती पायवाट देखील सांपडली नव्हती. स्नाना दि विधी आटपून घटका दिवसाचे सुमारास ते ओढ्यावरून फिरून निघाले. थोड्याच वेळानें त्यांना एक बारीक पाऊलवाट दिसूं लागली. ती वाट अड

चणांची होती, व चडउतार फार होता यामुळें दोन प्रहर पर्यंत देखील पांच चार कोश त्यांच्या हातून मागें पडले नाहींत. दोनप्रहरचें ऊन कडक झाल्यामुळें व दोघेही अगदीं श्रमून गेल्यामुळें ते एका झाडाखालीं उतरले. रघोजीस राजाकडे पाहून फार वाईट वाटलें. क्षुधा व तृषा येणेंकरून दोघांचेही प्राण व्याकूळ झाले होते; परंतु रघोजी जरा काटक असल्यामुळें त्यास त्या बद्दल कांहींच वाटलें नाहीं; पण राजा अगदीं गलित होऊन गेला. त्याचें मूख आतिशये म्लान झालें मुखावरचा गौरवर्ण नाहींसा होऊन ताम्र वर्ण दिसूं लागला, व वर घर्म बिंदु उमटले अशी स्थीतीझाली तरी पण गार वृक्षांचि छाया व थोडी वाऱ्याची झुळूक लागतांच ते जरा सावध झाले. नंतर रघोजीनें झाडाच्या पानाचे द्रोण लावून त्यांतून एका झऱ्याचें पाणी आणिलें. येतेवेळीं कांहीं वाईट बरीं फळें तोडून घेतलेलीं होतीं तीं राजापुढें ठेविलीं; आणि दोघांनीं यथेच्छ फलाहार केला, व पाणी प्याले. क्षुधा लागलेली असल्यामुळें त्यांना तेंच मिष्टान्न भोजन झालें. नंतर कांहीं वेळ विश्रांती घेऊन ते पुन्हा मार्गस्थ झाले. अज्ञातवास करण्यास कोठें तरी आश्रय मिळेल, अशी त्यांस आशा होती, परंतु सूर्यास्त होण्यास सुमारें दोन घटका अवकाश राहिला, तरी देखील त्यांनां वस्ती करण्यास जागा कोठें सांपडेना, तेव्हां ते अगदीं निराश झाले, इतक्यांत जवळच कोणी तुतारी वाजविल्याचा स्वर त्यांच्या कानीं आला. मागें पहातात तों दोन तरुण गृहस्थ घोड्यावर बसून आपल्या मागाहून येत आहेत, असें त्यांच्या नजरेस आलें. आपण येत आहों असें ह्यांस कळविण्या करीतां त्यांनीं मुद्दाम तुतारी वाजविली होती. त्यांच्या डोकीला पटके गुंडाळलेले होते, आंगांत तंगदार अंगरखे होते; रेशीम कांठी धोतरें नेसलेले होते; दोघेही शरिरानें मजबूत असल्यामुळें तालीमबाज असावे असें दिसत होतें; दोघांनींही कांसोटे मारलेले होते; कमरेस तरवार लटकत होती; आणि हातामध्यें बंदुका घेतलेल्या होत्या; मागाहून चार शिकारी कुत्रे येत होते; त्या तरुणांनीं केलेली कांहीं रान जनावरांची व कांहीं पक्षांची शिकार घोड्यावर पुढें घेतलेली हो

ती. त्या तरुणांस पाहातांच राजा व रवोजी हे अगदीं भयाभित हो ऊन गेले. कदाचित् आपला शोध काढीत आपणांस पकडण्या करितां हे कोणी लोक आलेले असावे. असें त्यांनां वाटूं लागलें; पण ते दोघे च होते, व हे शस्त्र धारी होते, ह्मणून त्यांचे भय कमी झालें. इतक्यां त ते दोघेही भर धांव घोडे काढून अगदीं राजा जवळ येऊन पोंहो चले. त्या दोघांनींही राजा व रवोजी ह्यांस लवून सलाम केला, तेव्हां राजानें आपणही सलामी दिली. इतक्यांत ते दोघेही तरुण गृहस्थ घोड्यावरून खालीं उतरून आणि घोडे एका झाडा च्या मुळांशीं बांधून राजा पाशीं येऊन उभे राहिले. त्यांस राजा ह्मणाला,

राजा०— हे तरुणांनों, तुह्मी कोठील राहाणारे व इकडे को णीकडे निघालां आहां. हें कळविण्यांस जर कांहीं हरकत नसेल तर सांगा.

पहिलातरुण— महाराज, आपल्याकडे लपविण्यासारखें कांहींच नाहीं. आपण थोर मनुष्य आहांत, असें आपल्या चेहऱ्यावरून दिसतें; पण आपल्याशीं मर्यादेनें कोणत्या रीतीनें बोलावें हें आह्मांस समजण्याजोगें नाहीं. आपण आमच्या घरीं यावें, ह्मणजे आमचीं आईबापें सर्व हकिगत तुह्मांस कळवितील. पुढें समोर जी टेंकडी दिसते आहे. तिच्या पायथ्या शीं आमचें घर आहे. आह्मांला थोडासा शिकारीचा नाद असल्यामुळें आह्मीं शिकार करण्याकरितां इकडे आलों होतों. संध्याकाळची वेळ झा ली, आणि या अरण्यामध्यें आमच्या घराखेरीज तुह्मांस वस्तीस रहाण्या जोगी दुसरी जागा जवळ नाहीं, यासाठीं तुतारी वाजवून आह्मीं आपले घोडे भरधांव काढिले. आतां इतकीच विज्ञप्ती आहे कीं, आमच्या घरीं येऊन आह्मांस आनंदीत करावें.

राजा०— ( मनांत ) हीं मुलें मोठ्या कुळांत जन्मलेलीं असावीं असें वाटतें. पण यांचें अशा अरण्यामध्यें वास्तव्य कां व्हावें ? हें कांहीं कळत नाहीं. कांहीं असेल तें असो; पण ज्यापेक्षां हे आपण होऊन घरीं येण्याविषयीं आग्रह करिताहेत, त्यापेक्षां आतां जाण्यास हरकत नाहीं. ( उघड ) बरें; मुलांनो चला आतां आज आह्मी दोघेही तुमच्या

घरचे पाहुणे आहों.

याप्रमाणें संभाषण झाल्यावर त्या दोघांनीं आपले घोडे राजा व रघोजी यां स बसण्याकरितां दिले. त्यांनीं होय नाहीं ह्मणतां ह्मणतां ह्या अतिशय आग्रह केल्यामुळें राजा व रघोजी हे दोघे त्या दोन घोड्यांव र स्वार झाले. आणि सूर्यास्ताच्या सुमारास ते सर्वजण इच्छित स्थळीं येऊन पोहोंचले.

आपल्या घरीं आलेल्या पाहुण्याचा आदरसत्कार कोणत्या रीतीनें क रावयाचा हें त्या लहानशा झोंपडींत, आणि अरण्यांत रहाणाऱ्या गरिब कुटुंबास चांगलें समजत होतें; पण अगदीं अरण्यांत ह्यांचें रहाणें आल्या मुळें वाटसरू किंवा एखादा प्रवाशी याठिकाणीं क्वचितच येई. कोणी ए खादा शिकार करणारा मात्र थकून भागून गेला असला तर तो याठिका णीं येऊन आराम पावे.

आज आपल्या मुलांबरोबर कोणी येत आहेत असें पहातांच घरच्या सर्व माणसांचे डोळे तिकडे लागले. दोघे पाहुणे घोड्यावरून खालीं उ तरतांच चाकरांनीं येऊन घोडे नले; आणि घरच्या यजमानानें त्या दो घांसही हातीं धरून घरांत एक लहानसा दिवाणखाना होता; त्यांत ने ऊन खुर्चीवर बसण्याविषयीं सांगितलें, पण रघोजी खुर्चीवर न बसतां जवळच जमिनीवर एका हांतरीवर बसला; तेव्हां ह्यांचे धनी चाकराचें नातें आहे, असें घरधन्याच्या लक्षांत येऊन चुकलें. पुढें त्यांचें आगत स्वागत त्यानें उत्तमप्रकारें केलें व जेवण्याचा बेतही चांगला ठेविला होता. ह्या कुटुंबाची एकंदर रीत भात पाहून राजा मनांत अगदीं चकित झा ला. हीं कोणीं तरी थोरघराण्यांतील माणसें असून कांहीं विलक्षण संकटा मुळें अशा अरण्यांत येऊन राहिलीं असावीं; असें राजास वाट लें, आणि जेवण झाल्यावर पान सुपारी खात असतां, आपल्या संश याचा खुलासा करावा असें वाटून तो त्याकडे वळून ह्मणाला, " महाराज, आपली रीत भात कांहीं रानटी माणसांप्रमाणें दिसत न सून राज दरबारांतील सभ्य व कुलीन घराण्यांत जशी व्यवस्था अ

सावी तशी येथें दिसते. आपण तर या घोर अरण्यांमध्यें वास्तव्य करून राहिलां आहां. तेव्हां यांतील तथ्य काय आहे; हें सांगण्यास जर कोणत्याही प्रकारचा संकोच नसेल तर सांगण्याची कृपा करावी. ,,

राजाच्या ह्या प्रश्नानें तो जरा विचारांत पडल्या सारखा झाला, तेव्हां आपला संशय अगदीं खरा आहे असें राजास दिसून आलें. पण थोडक्याच वेळांत तो ह्मणाला " आपण ह्मणतां तें कांहीं अंशीं खरें आहे. माझें नांव वीरबाहू. आह्मीं पांच चार वर्षांत याठिकाणीं येऊन राहिलों आहों. पण आह्मीं आपली खरी हकिगत कोणासही कळविली नाहीं; आणि ती कांहींशी न सांगण्यांसारखीही आहे; पण आपल्या मुद्रे वरून तुमच्याजवळ कांहीं चोरण्याची जरूर नाहीं. तेव्हां ती उद्ईक कळवीन. आज तुमची सर्व हकिगत ऐकण्या विषयीं फार उत्कंठा लागली आहे. ती कळविण्यास जर कांहीं हरकत नसेल तर कळवावी अशी माझी विनंती आहे. या त्याच्या आग्रहावरून राजानें आपली सर्व हकिगत त्यास सांगितली. आणि ह्मणाला, " सुमंतराव चंद्रनगरास केव्हां येऊन पोंचणार हें कळण्याची आह्मांस जरूर आहे. कारण, तोंपर्यंत असेंच अज्ञात वासांत दिवस काढून तो येतांच त्यास जाऊन मिळालें पाहिजे. परंतु तो कधीं येणार हें कांहीं समजण्यांजोगें नाहीं ह्यासाठीं त्याबद्दल कोणती तजवीज करावी ह्या विचारांत मी पडलों आहें! ,, वीरबाहू ह्मणाला " महाराज, आपण सुमंतराव येईपर्यंत ह्याच ठिकाणीं रहाण्याचा बेत करावा; कारण, इकडे आपण असाल हा संशय कोणासही येण्याचा संभव नाहीं. ही जागा अगदींच एकांत आहे. आतां सुमंतराव कधीं येणार वगैरे चौकशी करण्या करितां एक दोन दिवसांत मी आपला चाकर तिकडे पाठविण्याची तजवीज करितों ,, राजा ह्मणाला " हे आपले एकंदरींत मजवर उपकार आहेत. ,,

ह्या प्रमाणें कांही वेळ गोष्टी झाल्यावर ती मंडळी निजावयास गेली.

दुसरे दिवशीं सकाळीं मुख मार्जनादि विधी आटपल्यावर सर्वांनीं थोडेशी न्यहारी केली. नंतर वीरबाहू राजा व रवोजी यांस बरोबर घेऊन आपल्या घरासभोंवतील प्रदेश दाखविण्यास बाहेर पडला.

डोंगराच्या पायथ्याशीं वीरबाहूचें झोंपडें होतें; आणि तेथून थोडक्याच अंतरावर खालच्या बाजूस त्यानें आपल्या चाकरास एक झोंपडें बांधून दिलें होतें, तेंच त्याचें शेजार घर होतें; असें ह्मणण्यास हरकत नाहीं. त्याच्या खालच्या बाजूस गुरांकरिता बराच मोठा गोठा बांधिला होता. त्यांत एका बाजूस गुरें, व एका बाजूस निराळी स्वतंत्र जागा करून त्यांत कांहीं उमदे घोडे बांधलेले होते. वीर बाहूच्या घराच्या वरच्या बाजूस एक विहिर होती. त्या विहिरींत मुळचें पाणी फार नसून वरून बरेच मोठे दोन चार झरे वहात येत होते. तें पाणी विहिरींत येऊन ती सर्वदा भरून वहात असे. तेथपासून वीर बाहूनें वर एक पाट बांधून काढिला होता. तो त्याच्या घरा खालून नेऊन बागेतून शेतांत सोडलेला होता. त्याचें पाणी एवढें मोठें होतें कीं, त्यावर सहस्त्रावधी लहानमोठ्या वृक्षांचें पोषण होऊन, शिवाय ह्या दोन्ही कुटुंबाला बारा महिनें पुरेल एवढें धान्य दरवर्षी पिकत असे जागा चमत्कारीक रितीनें शोभिवंत केलेली होती. त्याच्या घरा खालीं बऱ्याच अंतरावर एक मोठी नदी ऊत्पन्न होऊन रानांतून समोर चालली होती. एवढ्या अफाट रानांत हीं दोन कुटुंबें रहात असल्यामुळें संसारांतील जीं हरएक प्रकारचीं सुखें त्यांचा लेशही यांना प्राप्त होत नसेल, असें प्रारंभी वाटे. पण त्यांच्या एकंदर स्थितीबद्दल विचार केला ह्मणजे त्यांस कोणत्याही प्रकारची उणीव नाहीं. असें दिसून येई. यांच्या घरासभोंवती सुवासिक फुलझाडें, त्यांच्या बाहेर केळींचीं मोठमोठीं बनें, व त्यांच्या बाहेर नारळी, पोफळी, आंबे, फणस, डाळिंबी, पेरू, नारिंगी, अंजीर, सिताफळ, पपनीस; इत्यादी लहान मोठीं झाडें होतीं, त्यामुळें साही ऋतूंत पिकणारी अनेक प्रकारची फळफळावळ त्यांस मिळत असे. घराखालीं बरेंच मोठें एक मैदान होतें, त्यां

त साळी, जोंधळा, मका, भात, गहूं, वगैरे अनेक प्रकारचीं धान्यें तीं मनुष्यें पिकवीत असत. त्यांतच एखादे ठिकाणीं पांच चार बिघे जमिनी त उंसांची लागवड करीत. दहा पांच म्हशी व दहा पांच गाई निरंत दुभत्या असत; यामुळें त्या दोन्ही कुटुंबास दुभत्याचा कधींच तोटा पडत नसे. घराच्या वरच्या बाजूस डोंगरांत मोठें विस्तीर्ण कुरण होतें, म्हणून पाहिजे तितकीं गुरें बाळगण्यास त्यांस कठीण पडत नसे. परसांत बारा महिनें होणारा भाजीपाला विपूल उत्पन्न होत असे. त्याच्या घराच्या उत्तरेच्या आंगास एक फुलबाग असून त्यांत गुलाब, मंदार, गुलछबू, सूर्यकांत, अनंत, सेवंती, जासवंत, दवणा, मरवा, पाच, इ० असंख्य पुष्पवृक्ष; व जाई, जुई, मोगरी, चमेली, इत्यादि पुष्पयुक्त वल्लीचे मंटप होते; तेणेंकरून निरनिराळ्या ऋतूंत निरनिराळ्या प्रकारचीं सुवासीक पुष्पें मिळत असत. आंतून फिरूं लागले म्हणजे हिरव्या गार ताटव्या ची सुंदर शोभा दिसत असे. त्या बागेंत पुष्पबृक्ष इतके सुवासीक होते कीं, बागेंत हिंडून घरीं आलें तरी देखील शरिराचा व वस्त्रांचा वास जात नसे.

हा सर्व प्रदेश वीरबाहूनें आपल्या पाहूण्यास फिरून दाखविल्या वर राजा म्हणाला, "वीरबाहो, खेड्यांत रहाणाऱ्या लोकांस संसारा मध्यें लागणारे बहूतेक पदार्थ या ठिकाणी तुह्मीं स्वतः उत्पन्न करीत असल्यामुळें बहूतेक सर्व तुह्मांला मोला शिवाय मिळतात. आणि ही जागाही शहरापेक्षां एका प्रकारें उत्तम मनोरंजक आहे. प्राचीन काळचे ऋषी अशाच अरण्यामध्यें वास्तव्य करीत असत. असें पुराणांतरी वर्णि न केलेलें आहे. अशा स्थळांत राहिल्यानें कपटी आणि दुष्ट लोकांचा स हवास होऊन जीं संकटें यावयाचीं तीं आपोआपच नाहींशीं होतात,, वीरबाहू ह्मणाला, "महाराज, अशा स्थळांत वास्तव्य होण्याचें मा झेही तेंच कारण आहे. काल मी आपणाला माझी साद्यंत हकिगत मग कळवीन असें सांगितलें होतें; ती सांगण्यास आतां आरंभ करितों.,,

"चंद्र नगरच्या ईशान्य भागीं चाळीस पंचेचाळीस कोशांवर रत्न

पुर ह्मणून एक राजधानीचें शहर आहे; त्या ठिकाणी कांहीं दिवसां पूर्वी विजयचंद्र या नांवाचा एक राजा राज्य करीत होता, व प्रस्तुत त्याचा कनीष्ठ पुत्र हेमचंद्र गादीवर आहे. त्याजकडून फार दिवसां पासून चंद्रनगरच्या राजास करभार मिळतो. तेव्हां ह्याबद्दल माहिती महाराजांस असेलच.,, मणिपाल राजा ह्मणाला" होय, आहे माहीत. विजयचंद्राचा व माझा फार परिचय होता. मात्र हेमचंद्राचा नाहीं.,, वीर बाहू ह्मणाला "कांहीं दिवसांपूर्वी विजयचंद्राच्या हाता खालीं फौजेवर मीं मुख्य अधिकारी होतो.,, हें ऐकतांच राजा वीरबाहूकडे वळून ह्मणाला "विजयचंद्राचे सेनापती वीरबाहू असें मी ऐकिलें होतें तेच आपण!,, वीरबाहू ह्मणाला, "होय; तोच मी.,, राजा ह्मणाला "तर मग आपण तिकडून इकडे येऊन राहण्यास कारण काय झालें!,, वीरबाहू ह्मणाला "तेंच सांगत आहें. विजयचंद्राचें देहावसान झाल्यावर त्याचा जेष्ठ पुत्र प्रतापचंद्र हा गादीवर बसला. प्रतापचंद्र आपल्या पाठीमागें राज्य चालविण्यास योग्य असल्यामुळें त्यासच गादीवर बसवावें असें विजयचंद्रानें ठरविलें होतें; व त्यास रयतही अनुकूळ होती; पण प्रतापचंद्राचें दैव प्रतिकूळ झाल्यामुळें तो गादीवर बसून सहा महिनें झाले नाहींत, तोंच हेमचंद्राच्या मातेनें ह्मणजे प्रतापचंद्राच्या सावत्र आईनें सर्व सरदार लोक अनुकुळ करून घेतले; आणि त्यांच्या संमतानें हेमचंद्रास गादीवर बसवावें असें ठरविलें. पुढें एके दिवशीं राजा प्रतापचंद्र शिकारीस गेला होता, तेव्हां ही संधी आपणास अनुकूळ आहे, असें समजून कांहीं सरदार लोकांनीं हेमचंद्रास गादीवर बसविलें. राजा प्रतापचंद्र लाब असल्यामुळें सर्व सेना जरी माझ्या हातीं होती, तरी उघड रीतीनें हेमचंद्रास गादीवर बसविण्यास मला हरकत करितां येईना. पुढें थोडक्याच दिवसांत माझ्या हाताखालचे कांहीं अधिकारी व इतर लोक हेमचंद्राच्या आईनें ह्मणजे प्रभावतीनें फितूर केले. असें झाल्यावर माझा अगदीं हिरमोड झाल्यासारखा झाला; कारण हेमचंद्राचा दुष्ट स्वभाव असल्यामळें प्रजा खुष राहून राज्य सुरक्षित राहील, ही आशाच नव्हती; आणि अशाप्रकार

चें राज्य जरी कांहीं दिवस टिकलें, तरी त्यांतील लोकांचें जीवित आणि द्रव्य हीं अगदीं क्षणभंगुर असतात. केव्हां, कोणावर, आणि कोणतें प्रकरण उपस्थित होईल; याचा अगदीं नेम नसे .. अशा काळजींत मी असतां प्रभावती बाईनीं मला बोलावणें पाठवून सांगितलें कीं, प्रताप चंद्र लौकरच शिकार आटपून मार्गे येणार आहे; अशी बातमी आतांच समजली; तेव्हां तुह्मीं थोडेंसें सैन्य बरोबर घेऊन प्रतापचंद्र बेसावध असतां रस्त्यावरच त्यावर हल्ला करावा; अथवा तो रात्रीच्या प्रहरीं निजला असतां मारेकरी पाठवून त्याचा घात करावा. कोणत्याही रीतीनें प्रतापचंद्राचें जगांतील अस्तित्व नाहींसें झालें पाहिजे. ही कामगिरी तुह्मांवर सोपविली आहे. महाराज, हे शद्ब तिच्या तोंडांतून निघतांच माझ्या हृदयास छिद्रें पडल्या सारखीं झालीं; पण होय नाहीं ह्मटल्यास कदाचित् आपल्यावर कांहीं विलक्षण प्रसंग येऊन गुदरेल, या भीतीनें मी तीस आश्वासन देऊन घरीं निघून आलों; व माझा एक विश्वासू चाकर होता, त्यासतो सर्व हकिगत कळविली, आणि मीही आपल्या कुटुंबासह निघून जात आहें, असें सांगितलें. तेव्हां तोही आपल्या मुलां माणसांसह माझ्या बरोबर येण्यास तयार झाला. पुढें आपल्या सर्व माणसांस मी त्या चाकराच्या हहवालीं करून त्यासर्वांस एका खेड्यामध्यें जाऊन रहावयास सांगितलें आणि मी थोडेंसें सैन्य घेऊन प्रतापचंद्र महाराजांकडे निघालों.

पांच चार कोश जमीन निघून गेल्यावर माझ्याबरोबरचें सर्व सैन्य कांहीं निमित्य सांगून वाटेवर एक किल्ला दृष्टीस पडला, त्याच्या रक्षणार्थ ठेविलें. असें करण्याचें कारण इतकेंच कीं, हें सर्व सैन्य प्रतापचंद्र असलेल्या ठिकाणीं जाऊन पोहोंचल्यास राज्यक्रांतीची बातमी सर्वांस समजेल. आणि तसें झालें तर प्रतापचंद्राच्या जिवावर येऊन बेतेल; ह्या हेतुनें मी आपल्या बरोबर एकही मनुष्य न घेतां प्रताप चंद्रास येऊन भेटलों; आणि त्यास सर्व हकिगत कळविली; तेव्हां तर त्याच्या आंगावर कांटाच उभाराहिला. पुढें कांहीं वेळ बोलणें झाल्यावर तुह्मीं स्वप्राण रक्षणार्थ बरोबरच्या लोकांस बातमी न देतां निघून गेलेंच पाहिजे, असें त्यांस क

ळविलें. तेव्हां आपली जन्म भूमी, आपला देश, आपल्या कुटुंबांतील माणसें ह्यांचा वियोग सहन न होऊन तो कोमलांतःकरणी प्रताप चंद्र ढळढळां रडूं लागला. कांहीं वेळानें आलेल्या प्रसंगानुरूप वागणें जरूर आहे, असें वाटून प्रतापचंद्र निघून जाण्यास कबूल झाला; तेव्हां शेवटीं आह्मी दोघेही दोन घोड्यावर स्वार होऊन शिकारीच्या निमित्यानें बाहेर पडलों; आणि मी ज्या खेडेगांवांत आपलीं माणसें पाठविलीं होतीं तेथें येऊन पोहोंचलों.

महाराज इतकें झालें तरी देखील प्रतापचंद्र निर्भय झाला नाहीं, त्यावर दुसरें संकट उद्भवलें. आह्मीं ज्या गांवांमध्यें येऊन उतरलों तो गांव रत्नपूरच्या ताब्यांत होता; आणि हेमचंद्र गादीवर बसल्याची बातमी सर्वत्र पसरली होती; तेव्हां प्रतापचंद्रास पकडून दिलें असतां हेमचंद्राकडून कांहीं तरी बक्षीस मिळेल, अशी तेथील लोकांस आशा लागली, आणि त्याबद्दल जिकडे तिकडे लोक गुजगुजूं लागले; तेव्हां तो सर्व प्रकार माझ्या लक्षांत येऊन मी तत्काल प्रतापचंद्रास वाट सांपडेल तिकडे निघून जाण्याविषयीं सांगितलें; तेव्हां संकटसमय जाणून थकलेला आणि उपाशीं होता, तरीं देखील विश्रांतीची किंवा जेवणाची वाट न पहातां घोड्यावर स्वार होऊन तो चालता झाला; तो आतां कोणीकडे आहे, व त्याची काय स्थिती आहे ह्याची बातमी अजूनपर्यंत मला कांहींच नाहीं; असो.

नंतर दुसरे दिवशीं खेड्याहून जे आह्मी निघालों, ते पांच चार दिवसांनीं या अरण्यांत येऊन पोहोंचलों.

राजा०— बरें वीरबाहो, तुह्मी अशा अरण्यामध्यें जे येऊन राहिलां, ते दुसऱ्या एखाद्या राज्यामध्यें जर जाऊन राहतां तर तुमच्या आंगचा गुण जाणून तुह्मांला एखाद्या राजानें हुद्यावर ठेविलें असतें नाहीं काय ?

वीर०— महाराज, तें सर्व खरें; परंतु कदाचित् राजद्रोहाचा आरोप आह्मांवर ठेवून आह्मांस आपल्या स्वाधीन करून घेण्याविषयींचें त्या

राजाबरोबर कारस्थान हेमचंद्र बांधता नसता असें ह्मणवत नाहीं.

राजा०— वीरबाहो, असो; गेले दिवस ते गेले. परंतु आतां कदा चित् जयत्सेनाकडून मदत मिळून जर आमचें राज्य आमच्या ताब्यांत आलें तर तुह्मी चंद्रनगरामध्यें अवश्य आलें पाहिजे.

वीर०— ताब्यांत घेण्याकरितांच महाराजांस मी मदत करावी अशी माझी इच्छा आहे. माझीं दोन्ही मुलें समर कर्मांत आतां बरींच निपूण केलीं आहेत. लढाईच्या गोष्टी ऐकून त्यांसही कधीं कधीं स्फुरण येतें. बाबा, आह्मांस लढाईस न्याल काय ? असें ते कधीं कधीं विचारीत असतात; तेव्हां महाराजांनीं आह्मांकडून सेवा घेतलीच पाहिजे, असें माझें ह्मणणें आहे.

राजा०— बरें आहे तर, ज्यापेक्षां आनंदानें तुह्मी मला मदत करण्याचें कबूल करितां त्यापेक्षां माझ्या सुदैवानेंच हा योग आला असें मी समजतों.

याप्रमाणें संभाषण चाललें होतें. इतक्यांत जेवणाची वेळ टळली ह्मणून घरांतील मनुष्यें वाट पहात आहेत; असें एका चाकरानें येऊन त्यांस कळविलें. तेव्हां ती सर्व मंडळी घरीं निघून गेली.

## भाग ८ वा

एके दिवशीं रत्नमाला आपल्या खोलींत बूक वाचीत बसली होती, इतक्यांत नाना साहेबांची स्वारी त्याठिकाणीं येऊन पोंचली, त्यांस पहातांच रत्नमालेकडून पुस्तकांतील विषयास रजा मिळाली. पण ती पुस्तकाकडे उगीच पहात राहून मनांत ह्मणूं लागली " आला! दुष्ट नष्ट चांडाळ आला!! यानें तर माझी पाठच पुरविली. परवांच्या बंडांत याचे जर कोणी तुकडे तुकडे केले असते; तर त्यास मी मोठें बक्षिस दिलें असतें; साखर वांटली असती, आणि अंबेच्या देवळांत जाऊन मोठ्या आनंदानें प्रदक्षिणा व लोटांगणें घातलीं असतीं; याला पहातांच माझ्या पायांची आग मस्तकास जाऊन पोंचते. मनुष्याच्या स्वभावाचा हा एक धर्म असावा. असें दिसतें कीं, एखाद्यास पाहिलें ह्मणजे उगाच आपला

आनंद होतो. व एखाद्यास पाहिलें ह्मणजे उगाच त्राम उत्पन्न होतो; मग त्याची आपली ओळख असो अगर नसो; त्याप्रमाणें ह्या पुरुषास पाहून माझी स्थिती होते; अशा प्रकारच्या विचारांत ती गुंतली आहे, तोंच नाना साहेब अगदीं जवळ येऊन पोंचला. त्यानें भिंती जवळची खुर्ची जरा अलिकडे ओढून घेतली, आणि तोही उगांच विचार करीत बसला. बराच वेळ झाला तरी पुस्तक हातचें ठेवून रत्नमाला आपल्याकडे पहात नाहीं असें पाहून नाना साहेब बोलूं लागला.

नाना०— कां आज वाचण्यांत चित्त गुंतून गेलें आहे असें वाटतें.

रत्न०— होय; असें तर खरेंच.

नाना०— काय विषय आहे? ऐकूंद्या. जरा मोठ्यानें वाचाल तर आह्मीही ऐकत बसूं.

रत्न०— ही कथा चालली आहे— पांडवांची स्त्री द्रौपदी अज्ञात वासामध्यें एके दिवशीं कीचकाच्या दृष्टीस पडली; व तो तिला भुलून गेला; आणि ती वश होण्याचे उपाय करूं लागला. पुढें तिचे साह्य कर्ते जवळ नसल्यामुळें कांहीं दिवस तिला संकटांत काढावे लागले. पण शेवटीं.—

नाना०— हो, ही कथा आहे मला ठाऊक. बरें, तें असो. पण रत्नमाले खरेंच सांग, मी आलों ह्मणजे माझा तुला राग येतो, तूं माझा तिरस्कार करितेस हें असें कां बरें?

रत्न०— होय, पण इतकें झालें तरी देखील तुह्मी निर्लज्जपणीं पुन्हा इकडे येतांच.

नाना०— सुंदरी खरेंच सांगतों; तुझा मला जो ध्यास लागून गेला आहे तो सांगतां पूरवत नाहीं. ध्यानीं, मनीं, स्वप्नीं, तुझ्याशिवाय दुसरें मला कांहींच दिसत नाहीं. तुझ्या प्राप्तीसाठीं मी काय काय करीत आहें! तें जर तुला समजतें असतें तर.—

रत्न०— तें सर्व खरें असेल, त्याबद्दल माझी खात्री करावयास नको. पण काय सांगूं, तुह्मी दृष्टीस पडलां ह्मणजे माझें मन अस्वस्थ हो

ऊन केव्हां एकदां दृष्टी आड व्हाल, असें होऊन जातें. अधिक तर काय सांगूं, तुह्मी जाऊन चार घटका होईपर्यंत देखील माझें चित्त स्वस्थ होत नाहीं.

नाना०— कां बरें. तूं मला इतकी कंटाळतेसकां?

रत्न०— कां तें मला सांगतां येत नाहीं; पण इतकें मात्र सांगत्यें कीं, कृपा करून हा माझा नाद तुह्मी सोडून द्या. ह्यापासून तुह्मांला व मला काडीभरही सुख होणार नाहीं.

नाना०— मला सुखहोणार नाहीं? मीं तुझ्या प्राप्तीनें हिमालया इतका मोठा आणि आकाशा इतका उंच होईन. हजारों वर्षे तपश्चर्या करून स्वर्ग प्राप्ती करून घेतात; त्या स्वर्गालाही तुच्छ मानीन. तूं काय पाहिजे तें सांग, तुझ्या प्राप्ती करितां पाहिजे तें साहस करण्यास मा गें पुढें पहाणार नाहीं. ह्याबद्दल जर तुला संशय असेल तर—

रत्न०— नाहीं, मला मळींच संशय नाहीं, पण अशी एक कल्पना करा कीं, तुमची माझी गांठ पडली. आणि मी दुःखांत असल्यें तर तुह्माला सुख कसें होईल?

नाना०— सुंदरी, तुला सुखांत ठेवण्याकरीतां काय बरें मी करणार नाहीं? सोनें, हिरे, पाच, माणीक, मोतीं, इत्यादिकांच्या व जडावाच्यां दागिन्यांनीं पायाच्या नखांपासून केशांच्या अग्रापर्यंत तुला भरून काढीन; उंची उंची शालू, पैठण्या, इत्यादि वस्त्रें कारागिर लोक घरीं बोलावून आणून त्यांजकडून तयार करवीन; शेंकडो दास दासी तुझ्या सेवेंत आणून ठेवीन! कोणत्याही गोष्टीची प्रतिकुलता ह्मणून ठेवणारच नाहीं.

रत्न०— होय, तें सर्व खरें; परंतु एक उणीव आहे. अशी एक ह्मण आहे कीं "लाख नही क्रोड नही नही प्रीतनका मोल,, तेव्हां अमोल अशी जी प्रीति ती नाहींना?

नाना०— हा अजुन तुला संशयच आहे काय? रत्न माले, जगांत दुसऱ्या कोणत्याही वस्तुवर माझी प्रीती नाहीं. अधिक तर का

य सांगूं? माझ्या प्राणाहूनही तुजवर माझी प्रीती अधिक आहे.

रत्न०— अहो, पण माझ्या प्राणाहूनही त्या प्रियकरावर मी अधिक प्रीति करित्यें.

नाना०— पण तुझ्याप्रमाणें तो तुजवर प्रीति करीत असेल या विषयीं तुझी खात्री आहे काय?

रत्न०— होय, त्याविषयीं माझी पूर्ण खात्री आहे. ह्यांत जर चूक पडेल, तर जगतांत प्रीती ह्मणून मुळींच नाहीं; आणि सर्व जग तुमच्याप्रमाणें दुष्ट, नष्ट, चांडाळ लोकांनीं भरलेलें आहे, असें ह्मणावें लागेल; पण अशी गोष्ट होईल तरी कशी?

नाना०— सुमंत रावाचा तूं उगीच नाद धरलेला आहेस. तो कपटी आणि घातकी आहे.

रत्न०— हें आपण कशावरून ह्मणतां?

नाना०— हें मला पुरें ठाऊक आहे. ह्या चंद्रनगरामध्येंच हनुमान पेठेंत चंद्रकांत या नांवाचा एक मोठा सावकार रहात असतो. त्यानें आपली कन्या मालिनी सुमंतरावास देण्याविषयीं माणदत्ताबरोबर बोलणें लाविलें आहे, व ती गोष्ट सुमंत रावास कबूलही आहे. कारण, मालिनी व सुमंत राव यांची एकमेकांवर फारदिवसांपासून प्रीति जडली आहे.

रत्न०— हें आपण कशावरून ह्मणतां?

नाना०— त्या चंद्रकांताचा व माझा अत्यंत स्नेह आहे. तोच मजजवळ ही गोष्ट बोलला.

रत्न०— मी सगुणाबाईच्या तोंडून असें ऐकिलें आहे कीं, तिच्याशीं लग्न करण्याचें त्यांनीं नाकारिलें. पण अशी कल्पना करा कीं ती गोष्ट जमून आली, तर मी त्या मालिनीची दासी होऊन सर्व जन्म घालवीन; पण अन्य पुरुषाला कधींही माळ घालणार नाहीं.

नाना०— असें कां बरें,

रत्न०— मनानें त्यांना मी वरिलें आहे; आणि अष्ट विवाहा पैकीं

च हा एक विवाह आहे.

नाना०— पण मग सर्व जन्म तूं दुःखांत घालविणार ना!

रत्न०— छेः छेः!! असें ह्मणूं नका, सुखांत असें ह्मणा. तशा नेंच मी आनंदांत राहीन.

नाना०— बरें, पण तूं मोठ्या प्रतिष्ठित सरदाराची मुलगी आणि हलक्या कुळांतल्या आणि निर्वाहा करितां व्यापाऱ्याची चाकरी करून काळ घालविणाऱ्या मनुष्या बरोबर लग्न करणार, हें तुझ्या कुळाला लांछन नाहीं काय?

रत्न०— नाहीं, बहुतकरून संपत्तिवान् मनुष्यालाच कुलीन मानितात; पण माझी तशी समजूत नाहीं. तुमच्या सारखे शेंकडो कुलीन आणि सरदार एका पारड्यांत घातले, आणि त्या मोहऱ्याचे सद्गुण एका पारड्यांत घातले तर तुमचें पारडें वर उचलेल.

नाना०— तर एकूण त्याच्या पेक्षांही मला तूं हलका मानितेसना!

रत्न०— हा अजून तुह्मांला संशय का आहे?

नाना०— होय, माझें कुळ आणि संपत्ति पाहून मला तूं कधी मानणार नाहींस.

रत्न०— बरें तर, तुह्मी माझा नाद सोडा, ह्मणजे तुह्मांला थोर मनुष्य समजेन.

नाना०— ही गोष्ट तर कधींही घडून यावयाची नाहीं!

रत्न०— तर मग अशीच माझी तुह्मी पाठ पुरविणार ना?

नाना०— सुमंतरावापेक्षां तूं मला हलका मानितेस, ही गोष्ट कधीं विसरणार नाहीं. ह्याबद्दल तुला व सुमंतरावाला योग्य शासन केल्या खेरीज कधीं सोडणार नाहीं.

रत्न०— माझें काय पाहिजेतें करा; पण त्या माझ्या जिवलगास मात्र दुखवूं नको! त्यांनीं तुमचा काय बरें अपराध केला आहे?

नाना०— अपराध, अपराध मग सांगेन; त्यानें काय अपराध केला आहे तो. तुला व त्याला कारागृहांत ठेवून दोघांचेही हाल हाल करीन.

मला तूं त्यापेक्षां नीच मानितेस काय? आजपर्यंत मी तुझे पुष्कळ आर्जव केले, पण तूं फार उन्मत्त पणें वागतेस. माझें कुळ, शील, विद्वत्ता, धैर्य, चातुर्य, आणि संपन्नता यांतून तूं कांहींच मानीत नाहींस; आणि नीच कुळोत्पन्न अशा हलक्या मनुष्याशीं तूं लग्न लावणार? पाहून घेईन.

रत्न०— ( संतापून )नाहीं, पाहिजेतें, कर; पण त्यांना वाईट शब्द बोलून आपली जीभ विटाळून घेऊं नकोस!

नाना०— बरें आहे, पाहून घेईन; कधीं सोडणार नाहीं. या प्रमाणें चडफडत चडफडत रत्नमालेच्या मंदिरांतून नानासाहेबांची स्वारी चालती झाली. अस्तु.

आतां पुन्हां आपण मणिदत्ताकडे वळूं.

मणि दत्त वगैरे आरोपी तुरंगांत पाठविल्यावर त्यांच्या वतीनें पुष्कळ लोकांनीं अधिकाऱ्याकडे जाऊन ह्यांस जामीनावर मुक्त करण्याविषयीं रदबदली केली; पण कांहीं एक उपयोग झाला नाहीं. उलट त्यांनीं त्यांस कडक बंदोबस्तांत ठेवण्याविषयीं तुरंगावरच्या अधिकाऱ्यास कळवेलें. त्यांच्या हातापायांत बिड्या व शृंखला घालण्याविषयीं हुकूम केला; व जेवढें अन्न कैदी लोकांस दररोज मिळावयाचें त्याच्या निम्मे ह्यांस देत जावें, आणि तेंही कदन्न द्यावें; असा हुकूम झाला. ह्या तिन्हीं माणसांस एकमेकांचें बोलणें एकमेकांस ऐकूं न यावें; याकरितां त्यांस दूरदूरच्या खोल्यांत ठेविलें होतें. त्या खोल्यांस आंत हवा येण्याकरितां एकेक लहानशी खिडकी होती; पण तेवढ्यानें प्रकाश किंवा हवा आंत भरपूर येण्याजोगी नव्हती. एकंदरींत त्या खोल्या अंधार कोठडी सारख्या होत्या असें ह्मणण्यास हरकत नाहीं. गर्भश्रीमान आणि अब्रूच्या मनुष्यांस अशाप्रकारचा प्रसंग आला असतां त्यांची काय स्थिती होत असेल याची कल्पना वाचकांनीं करावी. त्या त्यांच्या यातना लिहितांना आह्मांस फार वाईट वाटते. इतकेंही करून त्या कदाचित लिहिल्या तर आमच्या वाचकांपैकीं जे कोंवळ्या मनाचे असतील त्यास अतिशय खेद होऊन

तें नेत्रांतून टपटपां अश्रु गाळितील. तरी पण थोडीशी हकिगत कळावि
णें जरूर आहे. त्या अंधार कोटडींत पोंचल्यावर त्यांनीं चार दोन दि
वसांत मुळींच अन्न घेतलें नाहीं. परंतु पोटाची आग ही कठीण आहे.
ज्या प्रकारचें अन्न स्वप्नांतही त्यांनीं कधींही पाहिलें नव्हतें, तेंच त्यांस
क्षुधा निवारणार्थ थोडथोडें खावें लागलें, थोडथोडें हें याठिकाणीं सां
गण्याची जरूर नव्हती. कारण, जास्त न मिळण्याविषयीं तजविज झा
लेली होती हें आह्मी मागें कळविलेंच आहे. सारा दिवस रडून रडून
तीं माणसें आपल्या आयुष्याचे दिवस ढकलीत असत. खाण्याला धड
अन्न नाहीं ! मोकळ्या जाग्यांतील हवा नाहीं ! पायांत बिड्यांचें ओझें
आणि अत्यंत शोक ! येणेंकरून निद्राही नाहीं !! अर्थात् तीं माणसें
दिवसें दिवस क्षीण होत चाललीं. त्यांचे अस्थिपंजर मात्र अवशेष रा
हिले, ही बातमी बाहेर फुटून चंद्रनगरांतील लोक हळहळूं लागले. म
णिदत्ताच्या इष्ट मित्रांनीं वकील करून त्या मार्फत लौकर चौकशी सुरू
व्हावी, असा न्यायाधिशाकडे अर्ज दिला. त्या कारणामुळेंह्मणा. अगर न्या
याधिशाच्या मनांत लौकर खटल्याचा निकाल करावयाचा होता, ह्मणून
ह्मणा. आठ दहा दिवसांत त्यांनीं खटला हातीं घेतला; आणि त्या तिघां
ही अपराध्यांस न्यायाच्या दरबारांत आणिलें.

त्या दिवशीं नगरांतील शेट सावकार वगैरे सभ्य लोक कज्जाचा नि
काल पाहाण्या करितां दरबारांत पुष्कळ जमले होते. आरोपीस पाहि
ल्या बरोबर त्यांस गहिंवर आला व ह्यांसही इतरांकडे पहातांच फार
वाईट वाटलें. पुढें कज्जास सुरवात होऊन सोनार वगैरे कारागिरांस
आणवून चंद्रप्रभा बाईचे दागिनें हेच, अशी न्यायाधिशानें आपली खा
त्री करून घेतली. फिर्यादीच्या तर्फेच्या साक्षीदारांच्या जबान्या होऊन
तें खटलें तसेंच त्या दिवशीं तहकूब राहिलें; आणि कचेरी बरखास हो
ऊन सर्व लोक आपआपल्या घरीं निघून गेले. साक्षीच्या जबान्यावरून
ह्या खटल्याचा कोणत्याप्रकारचा निकाल होईल ह्याचा विचार करून
लोकांनीं असें ठरविलें कीं, मणिदत्त ह्यांतून मुळींच सुटण्याची आशा ना

हीं; पण माणिदत्ताची बायको व मुलगी हीं मात्र दोघें बहुधा सुटतील.

दुसरे दिवशीं बारावर दोन वाजतां पुन्हा दरबार भरलें. त्यादिवशीं आरोपीच्या तर्फे कांहीं साक्षीच्या जबान्या व कांहीं वकिलांचें भांडण होऊन त्यादिवशीं कचेरी विसर्जन झाली. तेव्हां ही पूर्ववत प्रमाणें लोकांनीं वाटावाट केली. त्यांत आरोपीच्या तर्फे जो पुरावा झाला तो निर्बळ असून मणिदत्तास अनुकूल असा निकाल होण्या जोगा नव्हता

तिसरे दिवशीं पुन्हा दरबार भरलें. तो दिवस खटल्याचा निकाल सांगण्याचा होता, ह्मणून त्या दिवशीं लोकांची फार दाटी झाली. पूर्वींच एकंदर पुराव्याचे कागद मणिदत्तास वाचून दाखवून ह्यावर तुमचें काय ह्मणणें आहे? असें त्यांस न्यायाधिशानें विचारिलें; पण त्यांच्या कडून कांहींच उत्तर निघालें नाहीं. व निघण्याजोगेंही नव्हतें; कारण, त्यांनीं जें काय आपलें गाऱ्हाणें सांगावयाचें तें पूर्वींच सांगितलें होतें. आणि ही तक्रार निरूपयोगी आहे; असें न्यायाधिशानेंही त्यांस कळविलें होतें. इतकें झाल्यावर फिर्यादीस व आरोपीस लांब उभे करून निकाल अमुक रीतीनें व्हावयाचा हें न्यायाधिशानें वकिलांस कळविलें. तेव्हां आरोपीच्या आणि सरकारी वकिलांनीं पुष्कळ हरकती घेतल्या, त्या ऐकून न्यायाधिशानीं निकाल लिहून आरोपीस पुढें बोलावून आणून वाचून दाखविण्यास आरंभ केला; तो येणेंप्रमाणें.—

मुख्य प्रधान श्री० हिंमत राव यांच्या वाड्यांत सौ० चंद्रप्रभाबाई साहेब यांचे कार्तीक वद्य १४ दशी गुरुवार रोजीं रात्रौ कांहीं दाग दागिनें व कांहीं जवाहीर दासीच्या ताब्यांत असलेलें चोरीस गेलें. ती फीर्याद होऊन फौजदारानीं तपास केल्यावर तो चोरीचा माल मणिदत्त शेटीचे घरांत सांपडला, त्याबद्दल दोंहो तर्फेचा साक्षी पुरावा घेऊन निकाल सांगण्यांत येत आहे तो असा कीं.— किराणा व्यापारी सोमाजी बिन गोमाजी यांच्या सांगण्यावरून व चोरीचा माल माणिदत्ताचे घरांत सांपडल्यावरून माणिदत्तानेंच अथवा माणिदत्ताच्या तर्फे त्याच्या चाकरांनीं सोमाजी बिन गोमाजी

याची मदत घेऊन ही चोरी केली असें सरकारच्या नजरेस येतें. फिर्यादीच्या तर्फे झालेल्या निशाणी ५ ६ ७ ८ चे साक्षीदारांच्या जबानी वरून माणिदत्तानेंच हा गुन्हा केला, अशी सरकारचा खात्री होते. फक्त निशाणी ९ चा साक्षीदार सोमाजी बीन गोमाजी हा पूर्वी कांहींसें गुळमुळला; पण शेवटीं फौजदारानें दरडावून खरें सांग, असें ह्मणण्या बरोबर माणिदत्तानें व आपण ही चोरी केली खरी, असें चावत चावत सांगतो. ही साक्ष फिर्यादीस कांहींशी प्रतिकूळ दिसते; तरी पण सदरहू साक्षीदार हा आरोपी असल्यामुळें त्याच्या साक्षीवर फारशी बळकटी ठेवितां येत नाहीं. आरोपीच्या तर्फेचे साक्षीदार निशाणी ११ १३ १८ आणि २० हे माणिदत्त मोठा सचोटीचा मनुष्य असून याचा व्यापार फार दिवसांचा आहे, याच्या हातून असें नीच काम व्हावयाचें नाहीं; असें सांगतात; पण ह्या सांगण्यावरून आरोपीच्या पक्षास कांहीं बळकटी येते असें नाहीं. कारण बाहेरून सचोटी दाखवून आंतून पुष्कळ सावकार लोक माना कापणारे असे दृष्टीस पडतात. दुसरे प्रतिवादींच्या तर्फेचे निशाणी २२ २३ २४ २५ चे साक्षीदार कोणी एका मजूर दारानें पेटी आणतांना आपण पाहिली. चंद्र प्रभा बाईसाहेबांच्या मनांत ह्या कुटुंबाविषयीं वांकडें आलेलें आहे. वगैरे सांगतात. पण त्या मजूर दारास ओळखीत नाहींत. चंद्र प्रभा बाईसाहेब एवढ्या मोठ्या कुळांतल्या असल्यामुळें द्वेष भाव मनांत ठेऊन हें नीच कर्म करावयास प्रवृत्त होतील असें सरकारच्या नजरेस येत नाहीं. ही कोणी आपल्या घरीं पेटी आणून ठेवली अशी आरोपीची तक्रार आहे; पण लक्षावधी रुपयांचा ऐवज कोणी दुसऱ्याच्या घरांत नेऊन टाकून देईल; असा संभव मुळींच दिसत नाहीं. आरोपीच्या तर्फे वकिलांनीं आणि सरकारी वकिलांनीं जी तक्रार केली ती अगदीं पोकळ आहे. ह्या एकंदर पुराव्याकडे लक्ष पुरवून माणिदत्त शेटीस दहा वर्षे सक्त मजूरीची शिक्षा देण्यांत आली आहे; लीलावती व सगुणी ह्यांस चोरीची सर्व माहिती असून त्यांनीं आपणास कांहीं ठाऊक नाहीं ह्मणून सांगितलें, ह्यावरून ह्या दोघां

चे ह्या दरोड्याच्या कामांत अंग आहे असें ठरवून त्यांस तुर्त पांच पांच वर्षांची सक्त मजूरीची शिक्षा देण्यांत आली आहे. पण सोमाजी बिन गोमाजी ह्याच्या खटल्याचा निकाल होईल त्या वेळीं, सरकाराम जरूर दिसल्यास ह्या शिक्षा जास्त वाढविण्यांत येतील. झालेली शिक्षा योग्य मानून व परमेश्वरास भिऊन यानंतर अशा प्रकारचें वाईट कृत्य आरोपीनीं सोडून द्यावें असें आमचें त्यांस सांगणें आहे.

हा निकाल ऐकतांच त्या बिचऱ्यांची काय स्थिती झाली असेल ती सहजच दिसते, पण जमलेल्या लोकांतून कित्येक जे पाषाणहृदयी होते; त्या सर्वांचे कंठ दाटून नेत्रांतून टपटप अश्रु गळूं लागले. न्यायाधिश पाषाण हृदयीच होता तरी देखील त्याला फार वाईट वाटलें. फक्त फौजदार व त्यांच्या शिपाई लोकांस मात्र आनंद झाला. ह्याप्रमाणें निकाल होऊन सभा विसर्जन झाली.

प्रत्येक मनुष्याच्या जन्मापासून मरणकाल पर्यंत जी एकंदर हकिगत घडते तेंच त्याचें चरित्र होय. हें प्रत्येकाचें चरित्र जर लिहिलेलें सांपडेल, तर तें मोठें उपदेशपर होईल. लहान मोठ्या मनुष्यांवर लहान मोठीं शेंकडो संकटें वारंवार येतात. प्रथम जरी तीं सोसण्याची मनुष्याच्या आंगीं शक्ति नसते तरी ती पुढें उत्पन्न होते. ह्यांत बहुतेक संकटें दुर्जनाच्या सहवासापासून उत्पन्न झालेलीं असतात. दुर्जन जे आहेत त्यांस दुसऱ्याचें बरें पाहून वाइट वाटत असतें आणि वाईट पाहून बरें वाटत असतें. दुर्जनापासून उपस्थित होणाऱ्या संकटांची टाळाटाळ करित बसणें हा एक मनुष्याच्या मागें स्वतंत्र उद्योग लागून जातो; व निरंतर काळजी करावी लागते. तशांत प्रसंग येऊन पडला ह्मणजे ज्या विपत्ति भोगाव्या लागतात त्या सांगतांच नये. कबिरांनीं ह्मटलें आहे.

दोहरा.

॥ चंदन पडे चमारघर नीत उठकर कुटे चाम ॥
॥ चंदन बिचारा क्या करे पडा नीचसे काम ॥ १ ॥

असो, आमच्या मणिदत्त शेटीवर व त्याच्या अनाथ कुटुंबावर जें

आज संकट येऊन पडलें आहे तें कठीण मन करून व परमेश्वरावर भरंवसा ठेवून त्यांनीं सोशिलें पाहिजे. दुसरा उपाय नाहीं.

भाग ९ वा.

" सुमंतराव निघून बरेच दिवस झाले ,,

चंद्रनगरापासून ललितपट्टण पंधरा कोश लांब होतें. सुमंतराव रात्री च्या प्रहरीं बरीच रात्र असून निघाल्यामुळें सूर्योदयाच्या सुमारास त्यानें सहा कोश मजल मारिली; पण मग जसजसें उन पडत चाललें तसत शी त्याची चाल मंद होत चालली. शेवटीं दोन प्रहरीं कांहीं वेळ विसा वा घेऊन संध्याकाळच्या दोन घटका दिवसास तो ललितपट्टणास जाऊ न पोंहोंचला. पुढें जयत्सेनराजानें सुमंतरावाचा आदरसत्कार उत्तम री तीनें केला.

मणिपाल व जयत्सेन ह्यांमध्यें स्नेहभाव भारी असून त्यांचें कांहीं नातें होतें. जयत्सेनांची बहीण विलासिनी मणिपाल राजास दिलेली हो ती. ती प्रस्तुत गरोदर असल्यामुळें ललितपट्टणास निघून आली होती. मणिपाल राजाचें पत्र वाचून पाहिल्यावर जयत्सेनानें ती गोष्ट तशीच गु प्त ठेविली; कारण, त्यावेळीं विलासिनीचे नऊ महिने पूर्ण भरत आले हो ते; तेव्हां न जाणो; एका संकटामागें कदाचित् दुसरें संकट उपस्थित होईल. सुमंतरावासही जयत्सेनानें कारण सांगून बातमी बाहेर न फुट ण्याविषयीं खबरदारी ठेवा असें सांगितलें.

चंद्र नगरा पेक्षां ललित पट्टण हें राज्य विस्तीर्ण होतें; आणि वसूल ही दुपटीच्या मानानें होता. जागोजागीं किल्ले पुष्कळ बांधिले होते; ते व्हां निम्मे फौजतरी स्वराज्याच्या रक्षणार्थ अवश्य ठेविली पाहिजे; असें वाटून जयत्सेनानें अर्धी फौज मणिपालाच्या मदती करितां पाठविण्याचा विचार केला; पण इतकी तयारी होईपर्यंत आठचार दिवस निघून गेले. इतक्यांत दुसरा एक मनुष्य मणिपाल राजा कडून पत्र घेऊन ललित पट्टणास आला. त्या पत्रांतील म जकूर असा होता कीं, " सुमंतरावांस पूर्वी तिकडे पाठविलें आहे. त्यांक

ढून गर्व मजकूर समजला असेल. तर आतां दिवस गत न लावितां ज रूरीनें तयारी करावी. मी प्रस्तुत कोणत्या ठिकाणीं आहें हें पत्र देणार मनुष्य तोंडीं सांगेल. तुमची तयारी झाली ह्मणजे ह्या पाठविलेल्या मनुष्यास पूर्वी आह्मांकडे जरूर पाठवून द्यावें, ह्मणजे आह्मी रस्त्यांत सेनेस गांठून घेऊं. ,, हें पत्र वाचून सुमंतराव व जयत्सेन यांनीं मणिपाल राजा तूर्त कोणीकडेस आहेत; वगैरे हकिगत विचारून घेतली व ते गुप्त स्थळीं चांगल्याच्या संगतीनें खुशाल असल्या विषयींची बातमी ऐकून त्यांस आनंदझाला. पुढें एक दोन दिवसांत मदतीस जाणारी फौजही तयार होऊन चार दिवशीं ह्मणजे सोमवारीं रात्रौ निघण्याचा बेत आहे; अशी मणिपाल राजास जयत्सेनानें वर्दी पाठविली.

निम्मे फौज जरी त्यानें ठेवून घेतली होती, तरी देखील मदतीची फौज पुष्कळ होती. या फौजेंत पंचवीस हजार घोडेस्वार, दहा हजार कवाईत शिकलेले लोक, तीस हजार साधारण शिपाई, ह्या खेरीज धनुष्य बाणानीं लढणारे पांच हजार अशी एकंदर सत्तर हजार फौज, आणि पांच हजार बाजार बुणगे, एक हजार लढाऊ हत्ती, दीड हजार ओझीं वहाणारे हत्ती, पांचशें तोफा, याशिवाय उंटें वगैरे सरंमजाम पुष्कळ होता. या प्रमाणें तयारी पाहून सुमंतरावास अतिशय आनंद झाला. नियमीत दिवशीं चार घटका रात्रींच्या सुमारास लष्कराची पाठवणी करून व सुमंत रावास अर्ध कोशपर्यंत पोहोंचवून जयत्सेन राजा पुन्हा मागें आला.

नंतर सुमारें रात्रीचे बारा वाजे पर्यंत चालून ती सर्व फौज चंद्र नगरापासून पांच कोशांवर तळ देऊन एके ठिकाणीं राहिली.

दुसरे दिवशीं सकाळीं मुखमार्जनादि विधि आटपून पुढें जाण्याचा सरदार लोकांचा विचार चालला होता. इतक्यांत आपल्याकडे कोणी घोडे भरधांव फेंकित येत आहेत, असें त्यांच्या दृष्टीस पडलें. सुमंत रावास राजा येणार हें पूर्वीच ठाऊक असल्यामुळें महाराज येत आहेत असें त्यानें बरोबरीच्या सरदारांस सांगितलें. ही बातमी तत्काळ

सैन्यांत पसरून सर्वांस आनंद झाला.

थोडक्याच वेळांत ती सर्व मंडळी त्या ठिकाणीं येऊन पोहोंचली. हे कोणकोण होते हें वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. एक मणिपाल राजा, रघोजी, वीरबाहु व त्याचे दोन मुलगे, एकाचें नांव सूर्यकांत व दुसऱ्याचें नांव चंद्रकांत होतें. ही सर्व मंडळी घोड्यावरून खालीं उतरल्यावर सुमंतराव दृष्टीस पडतांच वीरबाहूनें जाऊन त्यास प्रेमालिंगन दिलें; आणि ह्मणाला, "राजाधिराज, आपण कोणीकडे आहां, ह्याची बातमी मला अजून पर्यंत नव्हती. आज दैवयोगानें हे चरण माझ्या दृष्टीस पडले." ह्या दोघांमध्यें अत्यंत स्नेहभाव पाहून राजास परम आश्चर्य वाटलें; आणि ह्मणाला, "वीरबाहो, सुमंतरावास तुह्मी ओळखतां काय?" वीरबाहु ह्मणाला "महाराज, रत्नपुराधिश प्रतापचंद्र ह्मणून जे मी आपणाला सांगत होतों ते हेच होत." हें ऐकतांच मणिपाल राजा अगदीं चकित झाल्या सारखा झाला. तो सुमंतरावाकडे वळून ह्मणाला "मित्रा, मी तुझी योग्यता न जाणतां तुला श्रम दिले याबद्दल मला क्षमा कर." सुमंत राव ह्मणाला "अं यांत काय आहे; मी राजपुत्र असलों तरी आपल्या आश्रिता पैकीं आहें; तेव्हां महाराजांची सेवा करणें हें आमचें कर्तव्यच आहे. तरी पण सर्वांपाशीं माझी अशी विनंती आहे कीं, सुमंतराव या नांवानेंच मलाहाक मारून माझें वास्तविक नांव ह्या वेळीं लोकांत मुळींच प्रसिद्ध न करण्याची कृपा करावी. ह्याप्रमाणें कांहीं वेळ गोष्टी झाल्यावर मणिपालराजा त्यादिवशीं सैन्यासह त्याठिकाणींच राहून दुसरे दिवशीं चंद्रनगराकडे निघाला. त्यादिवशीं वाटेंतच पुढें कोणत्या प्रकारें लढाई करावयाची हा त्यांचा ठराव झाला. पुढें तें सर्व सैन्य पूर्व भागीं चंद्रनगराच्या बाहेर एक कोशावर मैदानांत तळ देऊन राहिलें. प्रतिपक्षाकडील लोकांस ही गोष्ट तत्काळ समजली. ह्यावेळेपर्यंत जो त्यांस उत्साह झाला होता, तो सर्व एकाएकीं नाहींसा झाला. जयपाळ यास चंद्रनगरचा राजा आपण असें वाटूं लागलें होतें. हिंमतरावास पूर्वीचें प्रधानपद प्राप्त झालें

होतें; व नानासाहेब सेनाधिपतीचे जागीं होते. हें त्रिकूट पूर्वेकडील तटावर जाऊन शत्रूचें सैन्य किती आहे, हें न्याहाळून पाहूं लागले; तों त्यांस ती समुद्रा सारखी सेना दिसूं लागली. त्याबरोबर ते अगदीं चकित झा ल्यासारखे झाले.

अशावेळीं आपली जी थोडी मद्दतसेना असेल तीच किल्याचे तटावर रक्षणार्थ ठेवून शत्रूवर मारा करावा. पुढें काय होईल तें होवो! त्यांस वाटूं लागलें! शत्रूचें सैन्य तळ देऊन राहिलें याचें कारण असें होतें कीं, जर का तटावर तोफखाना सुरू केला तर आपल्याच तटाची व आपल्याच शहराची दुर्दशा होऊन जाईल. पण याचा अर्थ जयपाळा नें निराळाच केला. तो ह्मणाला "शत्रु आमच्या अंगावर चालून ये ण्यास भितो. तेव्हां त्याची जर एवढी अफाट सेना आहे तरी आमचा त्यांस अद्यापि कांहीं अजमास समजला नाहीं. तोंच शत्रूवर मारा सु रू करावा, असा त्यांनीं विचार केला.

पण दुसरी कांहीं एक चमत्कारीक गोष्ट घडून आली. ह्यामळें यांचा उत्साह नाहींसा झाला. तो प्रकार असा कीं, बंड झाल्या दिवसापासून सैन्यांतील सर्व लोक व विशेषतः प्रमुख प्रमुख अधिकारी यांचें चित्त अ गदीं उद्विग्न झालें होतें. राज्यक्रांती व्हावी ही एकाची देखील इच्छा नव्हती. तथापि थोडेसे लोक जयपाळाला अनुकूळ होते. तेव्हां बाकी च्या लोकांत धर सोडीचा प्रकार दिसूं लागला. नानासाहेबाच्या हा ताखालचे कित्येक अधिकारी आपल्या घरींच पडून राहिले होते. तेव्हां त्यांच्या शिपायांनींही तोच कित्ता गिरवला. बाकी कित्येक अधिकारी आ पल्या सेनेस तयार करून तटाकडे गेले. पण त्यांच्या अंगीं स्फुरण ह्म णून कांहींच उत्पन्न होईना; तशांतच नानासाहेबांनीं प्रारंभीं तोफखा ना सुरू केला; पण ते तरी काम नीट करायें चालतें. चार दोन घटके तून एखादि तोफ भरावी आणि पुन्हां केव्हां तरी उडवावी; असा प्रकार दिसूं लागला; तेव्हां नानासाहेब अतिशय कोपयुक्त होऊन त्यांनीं त्या लोकांस दूर करून आपणास अनुकूळ व विश्वासू असे लोक तोफखा

न्यावर पाठविले. तेव्हां सरासरी तें काम नीट चालूं लागलें.

इकडे मणिपाल राजाकडील लोक ह्यावेळपर्यंत स्वस्थ होते; पण जें व्हां तोफेचे गोळे सैन्यांत येऊन भराभर पडूं लागले, तेव्हां आतां आ पण उगीच बसून उपयोग नाहीं; असें त्यांस वाटूं लागलें. इतक्यांत सुमंतराव मणिपालराजास ह्मणाला, "महाराज, अशा प्रसंगीं शत्रूचा मारा चुकवितां येईल, अशी जागा पाहून आपलें सैन्य जरा मागें घ्या वें, हें फार चांगलें. हें बोलणें सर्वांस पसंत पडून त्यांनीं ती युक्ती पसंत केली. आणि सैन्याचा तळ मागें घेतला हें पाहून जयपाळादि वीर फारच विस्मय पावले. शत्रूच्या मनांत काय आहे, हें त्यांस कांहींच समजेना. बरें त्याच्या आंगावर चालून जावें तर आपल्या सेनेंत फुटाफूट झाली आहे. तेव्हां आपली जागा धरूनच असावें हें त्यांस बरें असें वा टलें. याप्रमाणें तो एक दिवस पार पडला. तितक्या वेळांत कोणत्याही पक्षाचा सांगण्यासारखा कांहीं तोटा झाला नाहीं. पुढें जेवणखाण आ टोपल्यावर प्रहर रात्रीच्या सुमारास नानासाहेबाच्या हाता खालचे सर्व अधिकारी एकत्र जमून विचार करूं लागले. त्यांतून बहुतेकांनीं मणिपा लराजावर शस्त्र धरणें ठीक नाहीं असें ठरविलें; आणि मणिपाल राजा कडे एक वकील पाठविण्याची तयारी केली. " आपल्या विरुद्ध बंड उ भारण्याची आमची मुळींच इच्छा नसून ती गोष्ट आह्मांस ठाऊक सुद्धां नव्हती. जर महाराजांवर असा प्रसंग येणार असें आह्मांस समजलें असतें तर आह्मीं सर्वांनीं आपले प्राणही बळी दिले असते. तथापि आतां झाल्या गोष्टीस इलाज नाहीं. महाराज कबूल करीत असल्यास रात्रींतच आह्मीं बहुतेक लोक आपल्या सैन्यांत येऊन मिळण्यांस खुषी आहों ,, अशी म णिपाल राजास आपली इच्छा कळविण्या विषयीं त्यांनीं वकिलास सांगितलें.

मध्यान्ह रात्र उलटून गेली होती. मणिपाल राज्याच्या सैन्यातील सर्व लोक जिकडे तिकडे निद्रिस्त झाले होते. व पहारे करी सभोंवते फि रून पहारा करीत होते. अशा संधीस त्याठिकाणीं गुप्त रीतीनें तो व कील जाऊन पोहोंचला. त्यानें कांहीं विशेष कामाकरीता आलों आहें

असें राजास जाऊन कळविण्यास एका शिपायास सांगितलें. शिपाया नें तो मजकूर राजास जागृत करून त्याचे कानावर घातला. तेव्हां मु मंतरावादि लोकांस बोलावून आणुन त्यांच्या संमत्तानें वकिलास आंत आणण्याची राजानें शिपायास परवानगी दिली. पुढें तो आंत आ ल्यावर त्यानें त्या सर्वांस आपल्या कडील लोकांचा मनोदय कळविला. तेव्हां सर्वांस आनंद होऊन विनाकारण असंख्य लोक बळी पडणार होते तो भयंकर परिणाम ईश्वरकृपेनें नाहींसा झाला. ही गोष्ट फारच आ ह्मांस हितकर झाली, असें सर्व ह्मणूं लागले. शेवटीं तुमच्या ह्मणण्या प्रमाणें आह्मी कबूल आहों असें सांगून त्यानें वकिलास रवाना केलें. इक डे हे लोक त्याची वाट पहातच राहिले होते. इतक्यांत वकिलानें येऊन तिकडील सर्व हकिगत सांगितली. तेव्हां बहुतेक लोक रातोरात मणिपा ल राजाच्या पक्षास जाऊन मिळाले.

ही बातमी कळतांच जयपाळ आदिकरून लोकांचे अगदीं हातपाय मोडल्यासारखे झाले. पुढें काय करावें हें त्यांस सुचेना. आपल्या पक्षा कडील बहुतेक लोक नाहींसे होऊन हजार पंधराशेंच्या आंत शिल्लक रा हिले; तेवढ्यानें आतां निभाव लागतो कसा ! असा विचार करीत ते ब सले होते; इतक्यांत तटावरील एका शिपायानें येऊन वर्दी दिली कीं, मणिपाल राजाचें लष्कर आपल्या आंगावर चालून येत आहे. ही हकि गत समजतांच त्या सर्वांची मनस्वी धांदल उडाली. आगा सुगा नसतां शत्रू एकाएकीं येऊन भिडला; तेव्हां हत्यारें घेऊन सर्व लोक किल्लयाचा तटाकडे धांवून गेले व वर चढून पहातात तों तोफेचा मार त्यांजवर ला गू होत नाहीं इतके ते अगदीं जवळ येऊन पोहोंचले. आणि दरवाजाव र त्यांनीं तोफ लागू केली; आणि त्याचे तुकडे तुकडे केले.

इतकें झाल्यावर एकदम सर्व शिपाई शहरांत घुसले. आणि तुमळ युद्ध सुरू झालें. जयपाळाच्या पक्षाकडील लोक शें पांचशें मरून पड ले; कांहीं स्वाधीन झाले. याप्रमाणें या लढाईचा एकदां शेवट झाला.

इतकें झालें तरी देखील मणिपाल राजाचे मुख्य शत्रु जे जयपाळादि

त्यांतून कोणी एकही हातीं लागला नाहीं व ज्यांच्या अविचारानें हा एवढा प्रसंग आला व एवढे लोक बळी पडले ते लोक पारिपत्यांतून गुटून फरारी झाले; ह्या गोष्टीचें त्यांस फार वाईट वाटलें. याप्रमाणें जय प्राप्त झाल्यावर मणिपालराजानें वेशीवर कांहींकडे बंदोबस्ता करितां पूर्ववत शिपाई लोकांचे पहारे बसविले. आणि आपण सुमंतरावादि सरदारांसह राजवाड्यांत निघून आला. राजा वाड्यांत आल्याची बातमी लागतांच मोठ मोठ सूबेदार, मानकरी, संभावीत व श्रीमान लोक राजाच्या दर्शना करितां राजवाड्यांत आले त्यावेळीं राजाच्या विरुद्ध कोणी एकही चंद्रनगरांत नव्हता; असें ह्मणण्यास चिंता नाहीं जयपाळ गादीवर बसल्यानंतर जी लोकांस एके प्रकारची धास्ती उत्पन्न झाली होती ती या वेळीं सर्व नाहींशी होऊन सर्व लोक आनंदांत निमग्न झाले. मणिपाल राजानें आलेल्या सभ्य गृहस्थाचा आदर सत्कार करून सर्वांची प्रीतिपुरःस्सर भेट घेतली. नंतर पानसुपारी होऊन सर्व लोक आपआपल्या घरीं गेले. याप्रमाणें तो दिवस सर्वांस मोठ्या आनंदाचा झाला.

याप्रमाणें व्यवस्था झाल्यावर सुमंतराव राजाचा निरोप घेऊन कांहीं लोकांसह घोड्यावर बसून घरीं जावयास निघाला. राजवाड्यांत जी लोकांची गर्दी जमली होती त्यांत मणिदत्त शेट यावे असें त्यास वाटत होतें; पण ते न आल्याबद्दल त्याचा विचार चालला होता, इतक्यांत त्याच्या हातांत एका स्त्रीनें पत्र आणून दिलें; तें तो फोडून वाचूं पाहूं लागला. तें पत्र त्याच्या प्रियेचें ह्मणजे रत्नमालेचें होतें. यामुळें त्यास फार आनंद झाला. त्यांतील मजकूर येणेंप्रमाणें.—

आपल्या वखारींत आपली व माझी जी शेवटली भेट झाली. त्या वेळीं डोळेभर आपणाकडे पाहाण्यास देखील आकाकडून मला फुरसत मिळाली नाहीं. अर्थात सर्व मनोराज्य लयास गेल्यासारखें झालें. त्या दिवसापासून आजपावेतों कारागृहा प्रमाणें एका खोलींत दिवस काढीत आहें. माझी कोणाशीं गांठ पडूं नये व मी कोणाशीं भाषण करूं नये. अशा इराद्यानें आकानें पक्का बंदोबस्त ठेविला होता. आजपर्यं

त जीं जीं दुःखें मी भोगीत आहें त्याबद्दल विस्तार करून मी सां गत बसत नाहीं. कारण तणेंकरून आपणांस पराकाष्ठेचें दुःख वाटे ल. माझ्या खाण्यापिण्यांत कोणतेही गोष्टीची कमतरता आहे असें नाहीं. माझ्या आवडीप्रमाणें मला नवे नवे पोशाख मिळतात, माझ्या चाकरीस दोन दासी आहेत; पण त्या नव्या आणून ठेविल्या आहेत. आणि मजव र त्यांची सक्त नजर आहे. नानासाहेब आका व दोन दासी ह्याखेरीज पांचवें मनुष्य कधींच माझे दृष्टीस पडत नाहीं. नानासाहेब मजवर खुष झालेला आहे. पण मला तो मुळींच आवडत नाहीं. तुझें दर्शन देखील मला नको असें मी त्याला निक्षून सांगितलें तरी तो माझी पाठ सोडी त नाहीं. आजच्या लढाईंत आपल्या पक्षास जय मिळाल्यामुळें तुमच्या शत्रूंनीं जयवंतगडास पळून जाण्याचा बेत केला आहे. मला तिकडे जा णें भाग पडेल. कारण, खुषीनें न गेल्यास माझे हातपाय बांधून नेण्याचा त्यांचा विचार आहे. याकरितां आपण होऊन जावें, असा मी निश्चय केला आहे. हें पत्र तुमच्या हातीं पोंचण्यापूर्वीच आमचें निघणें होईल, असें मला वाटतें. तेव्हां आपण कोणत्याही प्रकारें जयवंतगडांत माझी भेट घ्यावी आणि मला काळाच्या हातून सोडवावें. पण ह्यापूर्वी एक महत्वाचा उद्योग आहे तो असा कीं, तीं० मणिदत्त व मातोश्री लीला वती व सगुणाबाई या सर्वांवर कांहीं विलक्षण आरोप घेऊन चंद्रप्रभेनें फौजदारास वश करून त्यांस तुरुंगांत ठेविलें आहे; तर आपण हें पत्र पहातांच तुरुंगाकडे जाऊन त्यांची सुटका करावी. माझ्या संगतीचेंच फळ आज त्यांस प्राप्त झालें आहे. ह्याबद्दल मला फार दुःख वाटतें. त्यांची हकिगतही समजण्याचा मला मार्ग नव्हता. पण आपणाकडे पत्र पोंचवि णारी ही माझी जुनी दासी असून ती अलिकडे चोरून मला भेटत अस ते. तिनेंच वरील गोष्ट मला कळविली. शेवटीं त्यांची व माझी सुटका करण्याकडे विशेष लक्ष असावें; एवढीच आपल्या चरणापाशीं प्रार्थना आहे.

हें पत्र वाचल्या बरोबर सुमंत रावाच्या आंगावर कांटा उभा राहि

ला. पत्र देणाऱ्या दासीस " रत्नमाला अद्यापि येथें आहे काय? ,, असें त्यानें विचारिलें. ती ह्मणाली " ती निघून गेल्यास सुमारें प्रहर दहा घटका होतील.,, असें ऐकतांच सुमंत रावानें आपला घोडा तुरंगाकडे चालविला. वाटेनें चालते वेळीं दुसऱ्या कोणत्याही वस्तूकडे त्याचें लक्ष गेलें नाहीं. तुरंगाकडे पोंचल्यावर खालीं उतरून त्यानें तेथील अधिकाऱ्यांस आपल्या समोर बोलावून आणिलें, आणि त्यास सर्व हाकिगत कळवून ह्मणाला " त्यांस कोणत्या भाग्यांत ठेविलें आहे, तिकडे चला.,, तेव्हां त्या अंमलदारानें त्या खोल्यांचीं कुलुपें काढून दारें उघडून दिलीं. माणिदत्त व सुमंतराव यांची दृष्टीभेट होतांच सुमंतराव त्याच्या गळ्यास मिठी मारून आकांत करूं लागला! माणिदत्तास हा काय प्रकार आहे हें मुळींच समजेना! सुमंतरावावर कोणतें तरी प्रकरण उपास्थित होऊन त्यास आपल्या प्रमाणेंच इकडे यावें लागेल असें त्यास वाटत होतें. पण तो प्रकार एका बाजूस राहून सुमंतराव आपली मोकळीक करण्याकारितां आला. हें पाहून त्यांस आश्चर्य वाटलें सुमंतराव त्यांस ह्मणाला ,, माझ्या दुर्दैवाचें हें फळ आपणास भोगावें लागलें.,, याप्रमाणें बोलत असतां सुमंतरावानें आपल्या हातानें त्याच्या पायांतील बिड्या काढून टाकिल्या. पुढें लिलावती व सगुणी यांची मुक्तता होऊन तीं मनुष्यें मागील सर्व दुःखें विसरलीं. व त्यांस पराकाष्ठेचा आनंद झाला. नंतर सुमंतरावानें फौजदारास पकडून तुरंगांत ठेवण्यास अधिकाऱ्यास सांगून माणिदत्त, लिलावती व सगुणी यांसह तो घरीं निघून गेला.

संध्याकाळच्या वेळीं पुन्हा राजानें सर्व सरदार व मानकरी लोकांस आमंत्रणें पाठवून दरबार भरविलें. व सर्वांस आपला अभिप्राय कळवून सुमंतरावास प्रधानाचीं वस्त्रें दिलीं. वीरबाहूची सेनापतीच्या जागीं नेमणूक केली. आणि रघोजीस त्याच्या हाताखालीं एका मोठ्या जाग्यावर नेमिलें. प्रधान हिंमतराव व सैन्याध्यक्ष नानासाहेब व जयपाळ राजा यासर्वांची जो स्थावर जंगम मिळकत असेल ती जप्त करण्याचा हु

कूम केला. त्या तिवांस जो कोणी पकडून देईल त्यास प्रत्येकाबद्दल द हा दहा हजारांचें बक्षिस मिळेल; असें जाहीर नामें जिकडे तिकडे लावण्याची ताकीद दिली. याप्रमाणें व्यवस्था लाविल्यावर पुढें दरबार बरखास्त करण्या विषयीं राजानें हुकूम केला. सर्व लोक निघून गेल्यावर बंडवाले जयवंत गडाकडे निघून गेल्याची बातमी सुमंतरावानें राजास कळवून तिकडे स्वारी स्वतः करण्या विषयीं परवानगी मिळविली, आणि तो घरीं निघून गेला.

भाग १० वा

चंद्र नगरामध्यें जयपाळाच्या पक्षाचा मोड झाल्यावर त्याच्या पक्षास जे शेंपन्नास लोक सांपडले, त्यांस व बायका मुलांस बरोबर घेऊन तो चंद्रनगरच्या नैऋत्य दिशेस एक बळकट जयवंतगड या नावाचा डोंगरी किल्ला होता; तिकडे आश्रय मिळण्या करितां निघून गेला; पण किल्यावरील अधिकारी आपणास आंत घेईल किंवा नाहीं, हा संशय येऊन तो किल्या बाहेर एककोशावर तळ देऊन त्याठिकाणीं राहिला; आणि त्यानें आपला एक मनुष्य किल्यांतील अधिकाऱ्यापाशीं आश्रय मागण्या करितां किल्यांत पाठविला.

हा किल्ला चंद्र नगरच्या राजाच्या ताब्यांत होता. किल्याच्या रक्षणार्थ टेविलेली फौज बहूतेक भिल्ल जातीची होती व त्यावररामराय या नांवाचा एक मुख्य अधिकारी होता. किल्ल्याचा तट दुहेरी असून वीस हात रुंदीचा त्या दोन तटामध्यें खंदक होता. बाहेरच्या बाजूनें मुळव्या सारखा डोंगराचा कडा तुटलेला होता ह्यामुळें शत्रुचा प्रवेश आंत होण्याचा विशेष भीति नव्हती. उत्तरेकडच्या आंगानें समोरासमोर दोन तटास दोन दरवाजे होते. पुढच्या दरवाजांतुन आंतल्या दरवाजावर येण्याकरितां खंदकावर लांकडी पूल होता. प्रत्येक दरवाजावर शंभर शंभर शिपायांची एकेक टोळी रक्षणार्थ ठेविलेली होती. किल्ल्याचा घेर औरस चौरस चार मैलांचा होता. त्यांत मध्यभागीं एक राजवाडा असून तीच रामरायाची नेहमीची राहण्याची व कचेरीची जागा असे. दक्षिणेकडे तटाच्या आंत

एक लहानसा उंचवटा असून त्यावर जगदंबेचें देवालय होतें. किल्ल्याचें रक्षण करणारी ती देवी असें ते लोक मानीत असल्यामुळें बिकट प्रसंगीं तिची आराधना करून नंतर एखाद्या कामास हात घालीत. तटाच्या दरवाजाच्या आंतल्या बाजूस एक भव्य मारुतीचें देवालय होतें. ह्याशिवाय राजवाड्याजवळ एक महादेवाचें देवालय होतें. किल्ल्यावर वस्ती बरीच मोठी असून एक लहानशी पेठ होती. विशेष गर्जेच्या वस्तू बहुत करून त्यांत मिळत असत. अशा प्रकारच्या व्यवस्थेमुळें किल्ला हें एक स्वतंत्र राज्यच होतें, असें ह्मणण्यास हरकत नाहीं; असो.

राजवाड्याच्या सदरेवर लोडाशीं टेंकून रामराय एका हाताखालच्या अधिकाऱ्या बरोबर गोष्टी सांगत बसला होता. इतक्यांत दरवाजावरील एक रखवालदार पुढें येऊन मुजरा करून उभा राहिला. त्यास रामरायानें विचारिलें; कां? तो ह्मणाला, "जयपाळ महाराजांकडून एक मनुष्य आला आहे, व तो आंत येण्याची परवानगी मागतो,, रामरायांनीं त्यास आंत आणण्याविषयीं हुकूम केला, त्याप्रमाणें तो गृहस्थ येऊन पोहोंचला. त्यास रामरायांनीं बसण्या विषयीं जागा दाखवून विचारिलें कां, कोणी कडून? आलेला गृहस्थ ह्मणाला, " जयपाळराज येथून एक कोशावर कांहीं लोकांसह वर्तमान आलेले आहेत; व ते किल्ल्यांत आश्रय मागत आहेत. हें ऐकतांच रामरायास मोठा विचार पडला. राज्यांत झालेली घालमेल नुकतीच त्याच्या ऐकण्यांत आलेली होती. तेव्हां जयपाळास आश्रय द्यावा तरी पंचाईत, व न द्यावा तरी पंचाईत! असें त्यास वाटूं लागलें. दोन्ही किल्ल्याचे मालकच. जयपाळ आज गादीचा मालक जरी नाहीं, तरी आश्रय न दिल्यास कधीं ज्यावेळीं तो गादीवर बसेल, त्यावेळीं हें उसनें फेडल्यावांचून राहाणार नाहीं. बरें, द्यावा तर आजच राजद्रोह केल्याचा अपराध होतो. शेवटीं होय नाहीं ह्मणतां ह्मणतां जगदंबेस प्रसाद लावून तिनें त्यास आश्रय दे ह्मटल्यास द्यावा, व नको देऊं ह्मटल्यास न द्यावा; असा विचारकरून त्यानें पुजारी बुवांस बोलावणें पाठविलें.

ही प्रसाद लावण्याची वहिवाट सर्वत्र ठिकाणीं नसल्यामुळें प्रसाद लावणें ह्मणजे काय ? देवी अमुक गोष्ट कर व अमुक गोष्ट करूं नको असें सांगते हें काय ? असा आमच्या वाचकांस चमत्कार वाटेल, ह्मणून त्याबद्दल कांहीं माहिती कळविणें अवश्य आहे.

भातगोव्याचे मुद्दाम आयत्यावेळीं केलेले तांदूळ देवीच्या मूर्तीच्या हृदयापासून नाभीपर्यंत उजव्या व डाव्या बाजूस पांच पांच किंवा सात सात, पाण्यांत भिजवून लावितात; व आपणास जी कांहीं गोष्ट मूर्तीस विचारावयाची असेल, त्यांतील सर्व हकिगत पुजारी तीस सांगून अमुक गोष्ट करावी किंवा अमुक गोष्ट होईल असें असल्यास उजवा दे; आणि न करावी अथवा होण्याजोगी नाहीं असें असल्यास डावा दे, असें सांग तो. नंतर देव काय सांगतो ह्याची सर्व वाट पहात बसतात व मधून सां ग देवा, किंवा बोल देवा. अशी पुजारी मूर्तीचीं आर्जवें करीत असतो. शेवटीं उजव्या अंगचा किंवा डाव्या अंगचा एखादा तांदूळ खालीं प डला कीं, प्रसाद झाला असें समजतात. त्यांत सात सात किंवा पांच पांच तांदळांपैकीं मधले तीन तीन मात्र उत्तरदर्शक असतात. एवढ्या माहि तीवरून जर वाचकांची चांगली समजूत पडली नसेल, तर आतां जय पाळाबद्दल जगदंबेस प्रसाद लावावयाचा आहे त्यावरून पडेल.

रामरायाच्या बोलावण्यावरून पुजारी बुवा गेले तेव्हां त्यास रामरा यांनीं सर्व हकिगत कळविली; आणि देवी काय सांगेल तें आह्मांस क ळवा; असें सांगितलें. पुजारी ह्मणाले, "हें मोठें महत्त्वाचें काम आहे, या कारणास्तव आपण समक्ष येण्याची तसदी घ्यावी. हें बोलणें रास्त अ सें वाटून जयपाळाकडून आलेल्या गृहस्थास तेथेंच बसण्याविषयीं सांगून कांहीं मंडळीसह रामराय देवीच्या देवळांत निघून गेले. पुजारी बुवांनीं तांदूळ लाविल्यावर मालकास हातजोडावयास लावून देवीस गाऱ्हाणें सांगण्यास आरंभ केला. "हे जगदंबे, आदीमाये, प्रणवरू पिणी, महिषासुरमर्दिनी, जगज्जननी आई, चंद्रनगरच्या मणिपालराजा स पदच्यूत करून आपण गादीवर बसावें, अशा इच्छेनें जयपाळ मंड

उपस्थित करून मणिपाळास पळवून आपण गादीवर बसला. नंतर दु सऱ्या एका राजाचें साह्य घेऊन जयपाळास पदच्यूत करून पुन्हा मणिपाळ गादीवर बसला आहे. आणि जयपाळ दीन होत्साता तुझ्या आश्रयास यावें, अशा इच्छेनें किल्ल्याजवळ येऊन उतरला आहे. त्यास आश्रय द्यावा किंवा न द्यावा असें तुझे सेवक रामराय तवचरणीं लीन होऊन विचारताहेत. जर त्यास आश्रय द्यावा असें तुझें सांगणें असेल, तर उजवा दे, आणि न द्यावा असें असेल तर डावा दे. ,, याप्रमाणें विनंती करून उत्तराची वाट पहात सर्व त्याठिकाणीं बसले. कांहीं वेळानें देवीनें उजवा प्रसाद दिल्यावर जयपाळास आंत घ्यावें असा निश्चय करून रामराय पुन्हा वाड्यामध्यें आले; आणि जेवणखाण आटपून जमादारास बोलावून आणून त्यांनी सांगितलें कीं, जयपाळराज किल्ल्यांत यावयाचे आहेत. याकरितां त्यांस आपण सामोरें गेलें पाहिजे. तेव्हां पांचशें घोडेस्वार बरोबर नेण्याकरितां तयारींत असूंद्यात; व माझी खासगी घोड्याची गाडी जुंपून तयार करण्यास सांगा; तोंपर्यंत आह्मी जेवणखाण आटपून तयार होतों. इतकें सांगून जयपाळाकडून आलेल्या मनुष्यासह रामराय जेवणाकरितां निघून गेले.

इकडे जयपाळ रामरायाकडून उत्तर काय येतें, याची वाट पहातच बसला होता. फार वेळ झाला तरी पाठविलेला मनुष्य येत नाहीं, असें पाहून तो अतिशय चिंताक्रांत झाला. इतक्यांत मागच्या बाजूनें एक स्वार दौड करीत येत आहे असें त्याला एका चाकरानें येऊन कळविलें. कदाचित् कोणी पाठलाग करीत येईल तर आपणास कळावें अशा इराद्यानें जयपाळानें चारी दिशांस स्वार पाठविले होते. त्यांतीलच हा एक स्वार होता. त्यास पहातांच जयपाळाची पाचावर धारण बसली; आणि तो पुढें येऊन काय सांगतो हें ऐकण्याविषयीं तो अगदीं उतावीळ झाला. इतक्यांत स्वार पुढें येऊन ह्मणाला, महाराज, " कांहीं घोडे स्वारांच्या टोळ्या आपल्या मागें चंद्रनगराहून जलदीनें येत आहेत. घोड्याच्या टापांनीं उडत असलेला धुरळा माझ्या उंच उंच दृष्टी

स पडूं लागला; त्यावेळीं मी लक्ष देऊन तिकडे पाहूं लागलों. तेव्हां धुर ळ्यांतून स्पष्ट जरी दिसत नव्हतें, तरी ते घोडेस्वारच असावे असा अजमास दिसतो.

हा वृत्तांत ऐकतांच जयपाळाची जी काय धांदल उडाली, ती सांग तांच नये. आपल्या बरोबर स्वार किंवा सडे लोक फार नसून जनानखाना आहे, तेव्हां एक कोश मार्ग क्रमण पाहिजे तितकें जलद करितां येईल; अशी त्याची खात्री होईना; तरी त्यानें एका चाकरास तुतारी वाजवावया स सांगून सर्व लोकांस तयारी करण्याविषयीं सुचविलें; आणि तो कांहीं सामानसुमान टाकून कांहीं बरोबर घेऊन मोठ्या त्वरेनें किल्यांत जाण्या करितां निघाला; इतक्यांत किल्याकडून एक व समोरून एक अशा स्वा रांच्या दोन टोळ्या जवळ आल्या आहेत अशी जयपाळास एका चाकरा नें येऊन बर्दी कळविली; तेव्हां त्याची पांचावर धारण बसली. कदाचि त् किल्यावरील अधिकाऱ्यानें मणिपालराजास खुष राखण्याकरितां आह्मां वर ही टोळी पाठविली असावी; असा त्यांनीं तर्क केला. हें चमत्कारिक संकट पाहून नानासाहेबादि सर्व सरदार लोकांची गाळण ऊडाली तरी त्यांनीं शेंपन्नास जे आपल्या जवळ लढाऊ लोक होते त्यांस तयार रहा ण्या विषयीं सुचना केली. इतक्यांत किल्यावरून आलेले लोक अगदीं जवळ येऊन पोहोंचले; तरी त्यांचें लढाई करण्याचें कांहींच चिन्ह दिस लें नाहीं. तेव्हां जयपाळादिकांस कांहींशी उमेद आली. रामराय गाडीं तून खालीं उतरून जयपाळापाशीं येऊन ह्मणाले " महाराजांनीं मनां त कांहीं अंदेशा न धरितां किल्यावर येण्याचें करावें. ह्या दासाकडून जी कांहीं सेवा होण्याजोगी असेल ती करण्यांत अगदीं कसूर होणार नाहीं. यागोष्टीचा जयपाळास आनंद होऊन तो ह्मणाला, "शत्रूच्या कांहीं घोडे स्वाराच्या टोळ्या आमचा पाठलाग करीत येत आहेत. तेव्हां आ तां आपल्यास फार जरूरीनें किल्यांत जाऊन पोंचलें पाहिजे. ,, रामरा य ह्मणाला, " माझ्याकडून तयारी आहे; पण आपल्या या मंडळींत बा यका मुलें आहेत; त्यांसह लौकर जाणें कसें होईल? ,, जयपाळ ह्मणाला,

"बाकी काय होईल तें होवो; पण आमच्या पैकीं मुख्य मुख्य बायका तुह्मी गाडीमध्यें बसवून ती गाडी कांहीं स्वारांसह किल्यांत रवाना करा. मागाहून आह्मी कसेही सहज जाऊन पोहोंचूं. ही गोष्ट रामरायास पसंत पडून त्यानें त्या बायकांची कांहीं स्वारांसह रवानगी करून दिली. इतक्यांत शत्रूच्या घोडे स्वाराच्या टोळ्या मागें जवळच दिसूं लागल्या. तेव्हां एकेका घोड्यावर स्वार होऊन त्यांनीं घोडे भरधांव सोडिले. अर्थात, बायका, मुलें, कांहीं मेणें, पालख्या, त्यांचे भाई व कांहीं सरंजाम, शत्रूनीं गांठल्यामुळें त्याच्या हातीं लागला. मात्र मोठ्या पराकाष्टेनें जयपाळ वगैरे कांहीं लोक किल्यांत जाऊन पोहोंचले. तेव्हां पाठलाग करणारे घोडेस्वार मागें फिरले; व सुमंतराव पांच कोशावर लष्करासहीत उतरला होता. त्याठिकाणीं जाऊन पोहोंचले. आणि त्यांतील मुख्यानें सुमंतरावास इकडील हकिगत कळविली. तेव्हां सुमंतरावास पराकाष्टेचा आनंद होऊन तो फार जलद सर्व सैन्यासह किल्याकडे जाण्यास निघाला. शत्रू येत आहेत, अशी बातमी माहीत असल्यामुळें किल्यावरील लोक कडेकोट तयारींत होते; त्यामुळें दोहों पक्षांकडील तोफांची सरबत्ती सुरू झाली. किल्यावरून तोफांचे गोळे भराभर सुमंतरावाच्या सैन्यांत येऊन पडूं लागले. तेव्हां त्यांत बरेच लोक मरून पडले, व कांहीं लोकांस जखमा लागल्या; पण तेवढाही मारा सहनकरीत करीत सुमंतरावानें पुढे चाल केली; आणि दरवाजापर्यंत पोहोंचल्यावर तोफेच्या गोळ्याचा वर्षाव करून दोन्ही दरवाजे उडवून टाकिले. ते समोरासमोर असल्यामुळें दोन्ही फुटून त्यांचे तुकडे तुकडे झाले. इतकें झाल्यावर सुमंतरावाच्या सैन्यांत आनंद होऊन शिपाई लोकांस दुप्पट विरश्री उत्पन्न झाली. पुढें थोडक्याच वेळांत दोन्ही दरवाजांतुन लष्कर आंत शिरून कत्तल सुरू झाली. किल्यांतील लोकांनींही उमेदीनें लढाई चालविली. भिल्ल लोक हे स्वतःच शूर आणि बळकट असल्यामुळें, ह्यावेळीं अमक्याच पक्षास जयहोईल हें खात्रीनें सांगतां येत

नव्हतें. सुमंतराव तर विचारांत पडला होता. अलिकडे बरेच दिवस ता लढाईच्या व इतर कामाच्या खटपटींत असल्यामुळें त्यास फा र श्रम झाले होते. खरेंच आहे, प्रवासांत आणि रातबेरात कष्टाचें काम कर णाऱ्या लोकांची प्रकृती किती जपलें तरी क्षीण व्हावयाचीच. राजास साह्य करण्याच्या इच्छेनें जिवाकडे न पहातां सुमंतराव हे श्रम करीत होता; हें उघडच दिसतें; तथापि सुमंतरावास ह्यापेक्षां दुसऱ्या मोठ्या लाभाची आशा होती; हें वाचकांस ठाऊक आहेच. जिची प्राप्ती झाली असतां जन्माचें सार्थक, असें त्यास वाटत होतें; तरी रत्नमाला याठिकाणीं आपणास भेटणार आहे, एवढ्यानेंच त्याची हिंमत दुप्पट वाढली. सुमंत राव लष्कराच्यामागें राहून घोड्यावरून शिपाईलोकांस उत्तेजन देत हो ता. पहिल्या लढाईंत त्यानें प्रताप गाजविला होता, तेणेंकरून व तो लोकांस प्रिय असल्यामुळें त्याचें तेज पडे हें सांगणें नकोच. त्या लोकांस हाच आप ला धनी असें वाटत असे. सुमंतरावही आपल्या घरच्या मनुष्यांप्रमाणें त्यांवर प्रीति करीत असे. आलिकडे बरेच दिवस ते लोक त्याच्या हा ताखालीं असल्यामुळें; व सुमंतराव शिपाईलोकांशीं बरोबरीच्याप्रमाणें मो कळ्या मनानें वागत असल्यामुळें; ते त्यास विलक्षण मान देत. किल्लेकरी लोकांस एके प्रसंगीं जय मिळतो, असा रंग दिसूं लागला; ते व्हां सुमंतरावानें आपल्या सेनेस उद्देशून भाषण केलें तें येणेंप्रमाणें.—

" मित्रांनो, जरा नेट धरा. ह्मणजे आतांच पहा काय मौज होईल ती. किल्ला स्वाधीन होण्यास एक घटकाही लागणार नाहीं. आज तुह्मी राजाचें साह्य करण्याकरितां आलां आहां; आणि तुमचा पराक्रम पाहून च मी सेनापतित्व पत्करिलें आहे. जसें तुह्मी चंद्रनगरांतून नेटानें शत्रूस घालवून दिलें; त्याप्रमाणें येथूनही घालवून द्या. तुमचें शौर्य व अभिमा न पाहून मला फार आनंद होतो. तुह्मी आपल्या अब्रूचें रक्षण करा. आणि किल्लेकरी शरण येईपर्यंत त्यांस सोडूं नका. ,,

एवढ्यानें शिपाई लोकांस दुप्पट स्फुरण चढलें, आणि ते आवेशानें लढूं लागले.

इकडे रामरायही आपल्या सैन्यास धीर देत होता. तो ह्मणाला, " वीरानों, आज आपणावर केवढें संकट आलें, हें तुह्मी पहातच अहां; पण जरा धीर धरून लढाई कराल तर खचित यशाचा वांटा तुह्मांस मिळेल, मग परतंत्र होण्याची मुळींच भीति नाहीं; तेव्हां आतां जगदंबेचें नांव घेऊन शत्रूवर तुटून पडा. ,, रामरायाच्या या विरश्रीयुक्त भाषणानें किल्लेकरीही फार आवेशास चढले; आणि घोर युद्ध सुरू झालें. सुमंतरावाच्या सैन्यास चंद्रनगरामध्यें फार श्रम न करितां यशाचा वांटा मिळाला होता; तो प्रकार आज उलट होऊन अगदीं आणीबाणीची वेळ येऊन चुकली. दोहोंपक्षाकडील शतशः वीर पडले, रक्ताचे पाट वाहूं लागले, तरी देखील ते लोक निकरानें लढूं लागले.

ह्याप्रमाणें चाललें असतां सुमंतरावाची राजवाड्याच्या तिसऱ्या मजल्याकडे नजर पोहोंचली. त्याठिकाणीं दोघी चौघी स्त्रिया असून त्यांत रत्नमाला त्याचे नजरेस पडली. तिला पहातांच सुमंतराव आनंदभरित झाला. इकडे रत्नमालाही समर चमत्कार पहाण्याकरितां आपल्या बरोबरीच्या बायकांबरोबर त्याठिकाणीं फार वेळ उभी राहिली असून सुमंतराव तिच्या नजरेस पडतच होता. तेव्हां तिला असें झालें कीं, जर यावेळीं पक्षाप्रमाणें आपणास पंख असते तर आपण भरारी मारून ह्यांच्या हातून सुटून आपल्या प्रियकरास भेटल्यें असतें. सुमंतराव आपल्याकडे केव्हां पाहील, असें होऊन ती एकसारखी त्याच्याकडे टक लावून पहात होती; इतक्यांत सुमंतरावानें तिजकडे पाहिलें. तेव्हां दोघांसही आनंद होऊन त्यांचीं मुखकमलें प्रफुल्लीत दिसूं लागलीं. घटकाभर लोक लज्जा सोडून तीं दोघेंही एकमेकांकडे पहातच राहिलीं. तरी इतरांचें लक्ष लढाईकडे असल्यामुळें ह्यांकडे कोणीही पाहिलें नाहीं.

वर ज्या रत्नमाले बरोबर बायका होत्या ह्मणून सांगितलें, त्यांत चंद्रप्रभाही होती. तिला ह्या भावी दंपत्याकडे पाहून आतिशय कोप चढला तिनें रत्नमालेला मागें हो; ह्मणून सांगितलें; पण तिचें मन दुसऱ्यानें हिरावून नेलें असल्यामुळें तिला तें मुळींच ऐकूं आलें नाहीं. तेव्हां

चंद्रप्रभेला अतिशय कोप येऊन तिनें रत्नमालेला असा एक हिसडा दिला कीं, ती मागें चार पांच हातांवर जाऊन पडली. तिला पूर्वी देहभान नाहींसें होऊन गेलें होतें; पण ता लागलीच शुद्धीवर आली आणि आपण याठिकाणीं कशी येऊन पडलें; याबद्दल विचार करूं लागली, इतक्यांत चंद्रप्रभा डोळे लाल करून ह्मणाली, " बैस तेथेंच, खबर दार. तेथून उठशील तर,,

इकडे रत्नमालेच्या दर्शनानें सुमंतरावास देहभान नाहींसें झालें होतें आणि इतक्यांत तीही डोळ्यापुढून नाहींशी झाली; तेव्हां तो अगदीं विरस झाल्यासारखा झाला; आणि ती मागें कां गेली हा विचार करूं लागला. इतक्यांत एक शिपाई सुमंतरावास ह्मणाला, " महाराज, ह्या अणी बाणीच्या प्रसंगीं आपण जर बेसावध रहाल तर कांहीं तरी घात होण्याचा संभव आहे. शत्रूच्या सैन्याचा मोड होतांना दिसत आहे. ,, हे शब्द कानीं पडतांच सुमंतराव लढाईकडे वळला तों शत्रूच्या सैन्यांत दाणादाण होऊन त्यांतील कांहीं लोक वाट मिळेल तिकडे पळत आहेत आहेत असें त्याच्या दृष्टीस पडलें तेव्हां सुमंतरावास पराकाष्ठेचा आनंद झाला.

रामरायास आपल्या पक्षाचा मोड होतो असें वाटल्यावरून त्यानें लढाई बंद करण्याची सूचक तुतारी वाजविली; तेव्हां दोहोंपक्षाकडील वीर स्वस्थ झाले. पुढें रामरायानें तह करण्याकरितां सुमंतरावाकडे आपला एक मनुष्य पाठविला. त्यानें येऊन असें कळविलें कीं, ज्यांकरितां आह्मीं ही लढाई चालविलीहोती ते जयपाळराज व दुसरे सरदार समर सोडून पळून गेले आतां लढाई होऊन कोणत्याही पक्षांतील लोक पडले, तरी मणिपाल राजाचा नाश व्हावयाचा, यासाठीं तुह्मी लढाई बंद करावी, अशी आमची विनंती आहे.,, यावर सुमंतरायानें रामरायास असें उत्तर पाठविलें कि, " तुह्मीं ह्मणतां ही गोष्ट खरी आहे; पण ज्यापेक्षां तुह्मी बंडवाल्यांना सामील झाला, त्यापेक्षां लढाई बंदकरून तुह्मांस अजिनात मोकळे करण्याचा अधिकार मणिपाल राज्यानें आह्मांस दिलेला नाहीं; यासा

साठीं चंद्रनगरास जाईपर्यंत जर तुह्मी आमच्या कैदेंत राहण्यास कबूल असा ल तर लढाई बंद करण्यांत येईल. हें बोलणें निरुपाय झाल्यामुळें राम रायानें कबूल केलें; आणिआपण कैद होणार हें खचित असें समजून ही तो सुमंतरावांच्या स्वाधीन झाला. याप्रमाणें पूर्ण जय झाला असें पाहून बंदोबस्त राखण्याकरितां दरवाजावर, तटावर, व दुसऱ्या किती एक ठिकाणी लष्करी शिपाई लोक सुमंत रावानें रवाना केले; आणि आपण रत्नमालेच्या शोधाकरितां कांहीं सरदार लोक बरोबर घेऊन रा जवाड्यांतगेला. तेव्हां प्रतिपक्षाकडील जे वीर सांपडतील अशी त्यास आशा होती, त्यांपैकीं कोणीएक दृष्टीस पडला नाहीं. व रत्नमाला ही को णीकडे दिसेना; तेव्हां त्यांनीं वाड्याचा कोन कोंपरा धुंडाळून बारिक री तीनें शोध केला. पण कोणीएक सांपडलें नाहीं. तेव्हां गडाच्या आजूबा जूस सर्वांच्या शोधा" करितां सुमंतरावानें स्वार पाठविले; व किल्ल्यांत ही प्रत्येक घराचा झाडा घेतला; पण कुठें कांहींच शोध लागत नाहीं, हेंच गाऱ्हाणें सांगत पाठविलेले सर्व स्वार व इतर लोक पुन्हा मागें आले. तेव्हां सुमंतराव अगदीं उदास झाला! जयवंत गड स्वा धीन झाल्याबद्दल जो त्यास आनंद झाला होता त्याच्या शतपट रत्नमालेच्या वियोगानें दुःख झालें. आतां रत्नमालेची व आपली गांठ पड ते किंवा नाहीं, याची त्यास भ्रांती दिसूं लागली. कदाचित रत्नमालेची भे ट न झाल्यास सर्व आयुष्याचे दिवस मोठ्या संकटानें जाणार असें त्यास वाटूं लागलें. आजपर्यंत जिच्या समागमाचें सुख आपण जन्मभर भोगूं अशी त्यास आशा होती. तिची थोडक्याच वेळांत निराशा झाली. आ णि तो आपल्या एका हाता खालच्या अधिकाऱ्यास किल्ल्यावरील सर्व व्यवस्था करावयास सांगून कांहीं स्वारांसह चंद्रनगराकडे जाण्यास निघाला.

## भाग ११वा

चंद्रनगरच्या दक्षिण भागीं सुमारें चार कोशांवर एका डोंगराच्या पायथ्या शीं एक गुहा होती. तिच्या तोंडावर कांटेरी झुडपांचा विस्तार वाढल्या

मुळें ती लोकांच्या दृष्टीस पडण्याजोगी नव्हती. आजू बाजूस लहान लहान वृक्षांची दाट झाडी होती. जवळ झऱ्याचें निर्मळ पाणी झुळझुळ वहात होतें. गुहा लहानच होती, तरी आंत दोन तीन खोल्या तयार केलेल्या होत्या. नुकतीच येऊन राहिलेलीं त्यांत बायका आणि पुरुष मिळून सात मनुष्यें होतीं. तीं कोणत्या तरी संकटांत पडलेलीं होतीं, असें दिसत होतें. सूर्यास्ताच्या सुमारास तीं सर्व मनुष्यें गुहेच्या तोंडाशीं बसून कांहीं विचार करीत होतीं. थोड्याच वेळानें काळोख पडत चालल्यामुळें त्यांतील एक स्त्री उठून एका खोलींत गेली. ती खोली त्या लोकांचें स्वयंपाक घर होतें. त्यात दोन चुली बाहेरून पांच चार दगड आणून तयार केलेल्या होत्या. त्यांतील एका चुलींत माळशेण पेटत होतें; ती घेऊन आतांच आंत गेलेल्या स्त्रीनें नुकतेंच तेल वात घालून एका कोनाड्यांत एक पणती ठेविली होती; ती पेटविली. आंत दिवा दिसूं लागतांच ती सर्व मंडळी उठून आंत जाऊन दिव्याजवळ बसली; आणि पुन्हा त्यांनीं कांहीं विचार करण्यास आरंभ केला. कांहीं वेळानें त्यांतील एकजण ह्मणाला "आतां जर निघणार तर लौकर जेवणखाण आटपून चालतें व्हा." दुसरा ह्मणाला "छेः ! तितका अवकाश नको. कदाचित वेशीचा दरवाजा बंद झाला तर पुन्हां पंचाईत पडावयाची; तेव्हां तिकडेच कांहीं खाण्याची तजवीज करितां येईल, असें ह्मणून तो उठला आणि जवळच दुसऱ्या एका खोलींत जाऊन त्यानें आंगावरचा पोषाख उतरण्यास आरंभ केला. पोषाख उतरल्यावर जवळ बरेंच मोठें दोरखंड पडलेलें होतें; तें घेऊन त्यानें करगोट्याच्या ऐवजीं कमरेस गुंडाळलें; आणि जवळच एक फडका पडलेला होता त्यांतील थोडा फाडून घेऊन त्याची कोपीण बनविली; आणि नेसावयाचें धोतर सोडून एका बाजूस ठेविलें.

इतकें झाल्यावर तो पुन्हां मंडळी बसलेली होती त्या ठिकाणीं उजेडास आला. त्यास पहातांच रावांच्या मनांतील दुःख एका बाजूस राहून हंसूं येऊं लागलें; परंतु त्यास कदाचित राग येईल, अथवा वा

ईट वाटेल, ह्मणून त्यांनीं तें आवरून धरिलें. कोपीन लावलेल्या गृह स्थाचें नांव जोंपर्यंत आपल्यास कळलें नाहीं तोंपर्यंत त्यास आपण दिगंबर बुवा असें ह्मणूं. मधांच्या दिवा लावणाऱ्या बाईनें चुलींतील थोडीशी राख एका कागदावर घालून दिगंबर बुवापुढें ठेविली. तिंतील थोड थोडी घेऊन बुवांनीं पायांच्या नखांपासून केशांपर्यंत सर्व आंगास लाविली पूर्वीच बेत झालेला असल्यामुळें बुवांसाठीं काळा रंग देऊन जटेसह एक तागाचा टोप, एक झोळी, हातांत ध्यावयास एक दांडा, कांहीं रुद्राक्षाच्या माळा, असा सरंजाम तयार करून ठेविलेला होता. तो त्यांतील एकानें बुवांपुढें आणून ठेविला. नंतर एकेक वस्तु हातीं घेऊन बुवांनीं आपलें सोंग तयार केलें; आणि मंडळी कडे पाहून ह्मणाले, " बरें तर आतां निघतों मीं.,,

ह्यावेळपर्यंत त्यांनीं आपलें हसें आवरलें होतें; पण शेवटीं दिगंबर बुवा तयार होतांच सर्व माणसें पोट धरधरून हंसूं लागलीं; त्यावेळीं मात्र बुवांस फार वाईट वाटलें; पण तें त्यांनीं बाहेर न दाखवितां आपणही सर्वांबरोबर हंसूं लागले; आणि ह्मणाले, "कां माझें सोंग बनलें कीं नाहीं त्यांतून एकजण ह्मणाला, " आतां कांहीं काळजी नको. तुह्मीं दुसऱ्या एखाद्या जाग्यावरून आह्मांस माहीत नसतां अकस्मात् जर हें सोंग घेऊन याठिकाणीं आलां असतां तर आह्मी देखील तुह्मांस ओळखलें नसतें. आतां कोणत्याही प्रकारची भीती न बाळगितां तुह्मी खुशाल चला. कदाचित त्यांची गांठ पडली नाहीं. तर आतांच पुन्हां माघारे या. " बरें आहे, काळजी करूं नका.,, असें ह्मणून दिगंबर बुवा निघाले. तेव्हां ती सर्व मंडळी गुहेच्या दारापर्यंत त्यांस पोंचविण्या करितां आली. बुवा हळूच वांकून दरवाजांतून बाहेर पडले. आणि कांटेरी झाडांचा विस्तार हातांतील मोठ्यानें एका बाजूस करित करित मोकळ्या जाग्यांत आले. आणी त्यांनीं आंतील मंडळीस हांक मारून सांगितलें कीं, " जातों आतां. तुह्मीं कांहीं काळजी करूं नका.,, आंतून एकजण हळूच ह्मणाला " किती झालें तरी पुन्हां आतांच निघून या. कदाचित्

राहिलांच तर पहांटेस याच. त्यांनीं किती आग्रह केला तरी उद्यां दिवसाचे राहूं नका. काळ वेळ कांहीं सांगून येतनाहीं. ,, दिगंबर बुवा हूं ह्मणून चालते झाले. तेव्हां ती सर्व मंडळी आंत जाऊन जेवणाच्या तयारीस लागली.

आसमंतांत गर्द झाडी होती. तशांत काळोखी रात्र व पाय वाट मुळींच नाहीं; आणि बुवा अनवाणी असा प्रकार असल्यामुळें त्यांच्या पायांस दगड व कांटे लागून रक्त निघालें. अशा स्थीतींत तो कांहीं जमीन चालून गेल्यावर त्यास एक पायवाट सांपडली. ती पायवाट पुन्हां डोंगराच्या मुळांत जाऊन पोंहोंचली. तेव्हां त्यानें डोंगरावर चढण्यास आरंभ केला. ह्याठिकाणीं झाडी नसल्यामुळें मुंजरुक प्रकाश दिसूं लागला. त्यामुळें त्याला डोंगराच्या माथ्यावर येऊन पोंचण्यास फारशी अडचण पडली नाहीं. पुढें एक बारीक पायवाट लागली. त्या वाटेनें तो कांहीं वेळ चालल्यावर त्यास राजमार्ग सांपडला; तेव्हां त्याचें मन जरा स्वस्थ झालें.

मोठ्या मार्गास मिळाल्यावर त्यानें चोहोंकडे पाहिलें, तेव्हां रस्त्यांत कोणी वाटसरू नव्हते; त्यामुळें त्याला धीर येऊन तो चंद्रनगरास जाण्यास निघाला. यावेळीं त्याच्या पोटांत भीति जास्त उत्पन्न झाली. मध्यें जरा सटसूट झालें अथवा झाडाचें पान वाजलेलें ऐकूं आलें, ह्मणजे अगदीं कावराबावरा होऊन तो चोहोंकडे पाही; आणि आपणासच कोणी धरावयास येत आहे असें त्यास वाटे. याप्रमाणें मार्ग क्रमीत असतां कांहीं वेळानें तो चंद्रनगरापाशीं येऊन पोंहोंचला. तेव्हां तर त्याच्या मनांतील भीति जास्तच वाढली. पुढें जावें किंवा न जावें हाच तो विचार करूं लागला; पण काय होईल तें होवो; अशा स्थितींत राहण्यापेक्षां पुढें जावें हेंच चांगलें, असात्यानें निर्धार करून तोपुढें लोकांची नजर चुकवीतचुकवीत चालता झाला. थोड्याच वेळानें त्यास एक दरवाजा लागला. त्या दरवाजाची दिंडी अर्धवट उघडी होती, तींतून त्यानें आंत प्रवेश केला; तेव्हां त्याला थोडा धीर आला. त्या दरवाज्याच्या आंत एक बाग होती. त्याच्या आंत

एक वाडा दिसत होता. बागेमधून त्यावाड्याकडे जाण्यास एक रस्ता होता, त्यारस्त्यानें तो त्या वाड्याकडे जाण्यास निघाला. इतक्यांत त्या बागेच्या रक्षणार्थ त्याठिकाणीं एक विप्पाड कुत्रा होता. तोही विलक्षण व्यक्ति पाहून मोठमोठ्यानें भुंकत त्याच्या आंगावर धांवला. तेव्हां बुवाजी चपापून जागच्या जागीं स्तब्ध झाले. कांहींवेळ गेला तरी तो आपलें भुंकणें सोडीना; तेव्हां बुवाजी हळूच ह्मणाले. " नाम्या ,, हे शब्द त्या कुत्र्याच्या चांगले ओळखीचे होते; तेव्हां त्यानें भुंकणें जरा कमी केलें; पण हें स्वरुप त्यास कांहींसें विलक्षण वाटूं लागलें, यामुळें तो अगदीं गप्प ह्मणून राहीना. तेव्हां ते भीत भीत अगदीं कुत्र्याजवळ जाऊन त्याच्या आंगावरून हात फिरवून हळूच ह्मणाले, "नाम्या, अजून देखील माझी ओळख तुला पटत नाहींना.,, इतका विधी झाल्यावर ओळख पटून तो कुत्रा त्याच्या आंगावर उड्या मारूं लागला. तेव्हां बुवा निर्भय होत्साते पुन्हां मार्गास लागले. आणि उजव्या हातानें फूल झाडांतून त्यावाड्याच्या एका खिडकीपाशीं येऊन पोंहोंचल्यावर खिडकींतून डोंकावून आंत पाहूं लागले; तों त्यांस ज्या गृहस्थाची जरूर होती तो आंतच बसलेला त्यांच्या दृष्टीस पडला. त्यास पाहून ते हलक्या स्वरानें ह्मणाले ,, सर्जेराव, इतके शब्द कानीं पडल्याबरोबर आंतल्या गृहस्थाची खिडकीकडे नजर गेली; आणि तो उठून जवळ येऊन ह्मणाला, " कोण तो ,, हे शब्द कानीं पडतांच बाहेरील गृहस्थ ह्मणाला, " मी तो हिंमतराव. ,, आंतिल गृहस्थ म्हणाला कोण हिंमतराव! हिंमतराव म्हणाला, " होय, होय तोच मी. पण हळूच बोल; आणि दक्षणेकडचा धाकटा दरवाजा उघडून मला आंत घे. ,, हे शब्द ऐकतांच आंतील गृहस्थ वाड्यांतून दक्षिणेच्या आंगच्या दरवाजाकडे जाऊन बाहेर पडला, व खिडकीपाशीं येऊन पोंचला. आणि ह्मणाला, " हिंमतराव, ,, हिंमतराव ह्मणाला, " होय तोच मी. ,, सर्जेराव ह्मणाला," काळाच्या दाढेंतून सुटलेल्या माझ्या मित्रा, तुला एकदां मला कडकडून भेटूं दे. ,, खरोखरच तो

हिंमतरावाचा खरा मित्र होता. दोघांनीं एकमेकांस आनंदांत होऊन प्रेमालिंगन दिलें; आणि दोघेही त्याच दरवाज्यानें पुन्हां सर्जेरावाच्या खोलींत येऊन पोहोंचले; व दाराची कडी लावून आजूबाजूस कोणी नाहींसें पाहून त्यांनीं बोलण्यास आरंभ केला.

सर्जे०— ( हंसून ) मित्रा, सोंग पण किती उत्तम आणलें आहेस ह्मणून सांगूं. जर तूं नांव सांगितलें नसतेंस, तर मी तुला खचित ओळखलें नसतें.

हिंम०— जें दैवीं असेल तें भोगलें पाहिजे. हा आज आह्मांवर प्रथम प्रसंग आहे अशी गोष्ट नाहीं. आजपर्यंत शेंकडो लोकांस प्रसंगानुरुप अनेक वेष धारण करावे लागले आहेत. पण दुःखांत सुख इतकेंच कीं, मनांत धरल्याप्रमाणें तुझी एकदां गांठ पडली.

सर्जे०— बरें तें असो. त्यादिवशीं किल्ल्यावरचे लढाईंत जे तुह्मी नाहींसे झालां, तेथपासून तुमची कांहींच हकिगत समजली नाहीं.

हिंम०— बरें, आह्मां दोघांशिवाय आणखी कोणी आसपास नाहींना ?

सर्जे०— तो संशय नको. जेवणखाण आटपून मी नुकताच या खोलीमध्यें येऊन बसलों होतों. त्या किल्ल्यावरील लढाईपासून तुह्मांबद्दलची काळजी लागून गेली आहे. सुमंतराव व आह्मीं सर्व मंडळींनीं लढाई आटपल्यावर तुमचा शोध केला; पण कुठेंच ठिकाण लागेना. तेव्हां शेवटीं जी कत्तल उडाली, त्यांत तुह्मी सांपडलां, अशी माझी व सर्वांची खात्री झाली. ह्मणून चकामकीमध्यें जे प्रेतांचे ढीग पडले होते ते सर्व शोधून पाहिले; पण थांग नाहीं. तेव्हां तुह्मी काळाच्या दाढेंतून सुटलां खचित, अशी माझी खात्री झाली. परंतु चोहोंकडे बंदोबस्त असून तुह्मांला वाट मिळाली कशी ? हाच विचार करीत आह्मी सर्वजण कांहीं वेळ बसलों होतों. सुमंतरावानें तुमच्या शोधास्तव किल्ल्यासभोंवतीं शेंकडो स्वार पाठविले होते; पण पांच चार कोसांत देखील तुह्मी कोणीकडे नाहीं, हेंच त्या सर्वांनीं पुन्हा मागें येऊन कळविलें. किल्ल्यावर

बायकांचा समुदाय दिमत होता, तोंही अकस्मात नाहींसा झाला. तेव्हां सुमंतरावाचें तर अगदीं देहभान नाहींसें झालें. शेवटीं किल्ल्यावरील सर्व बंदोबस्त करून आह्मी मागें फिरलों.

हिंम०— अखेरीस आतां आपला जय होत नाहीं असें दिसूं लागलें त्यावेळीं एक युक्ति आठवली. राजवाड्याच्या खालच्या मजल्यांत एक चोरखण आहे तो तुला ठाऊक आहे काय ?

सर्जे०— नाहीं, ही गोष्ट मी कधीं ऐकिली सुद्धां नाहीं.

हिंम०— नसेल, मणिपाल राजाला व मला मात्र त्याची माहिती आहे. तो चोरखण उघडून आंत गेलें ह्मणजे, उजव्या हाताकडे एक भुयार आहे, त्यांतुन आंत उतरूं लागलें असतां डोंगराच्या पायथ्याशीं जाऊन पोंचतां येतें. तेथपर्यंत सर्व पायऱ्या बांधून काढलेल्या आहेत. किल्ल्यांतून सुटका करून घेतां यावी ह्मणून मुद्दाम हें तयार केलेलें आहे. तें काम बहुतेक गुप्त रीतीनें तयार केलेलें असून मोठें मजबूदही आहे. दुसरा उपाय नाहींसा झाल्यावर चौघी बायका व आह्मीं तिघे, चोरखणांतून उतरून भुयारांत प्रवेश केला; आणि हळू हळू संध्याकाळच्या दोन घटका दिवसास मुळाशीं जाऊन पोहोंचलों. तें भुयार ह्मणजे निबीड अंधःकाराचें स्थानच आहे. आंत हवा येण्यालाही मार्ग फारसे नाहींत; ह्यामुळें ज्या यातना भोगाव्या लागल्या त्या सांगतांच नये. पायथ्याशीं जाऊन पोंचल्यावर रात्र पडेपर्यंत आह्मीं आंतच राहिलों; आणि नंतर त्या अडचणींतून तसेच पुढें निघालों.

सर्जे०— तुमचा शोध लावण्या करितां पुष्कळ स्वार फिरत असतां तुह्मीं आजपावेतों त्यांजपासून आपलें रक्षण करून घेतलेंत, ही गोष्ट घडली तरी कशी!

हिंम०— मित्रा, तेंच सांगतों ऐक, ह्या नगराच्या पश्चिमेकडे सुमारें चार कोशांवर राज रस्त्याच्या उजव्या बाजूस जी एक टेंकडी आहे, त्या टेंकडीच्या पायथ्याशीं एक गुहा आहे त्या ठिकाणीं फार दिवसांपूर्वी एक साधू रहात असे; पण त्या स्थळाचा लोकांस आतां विसर

पडला आहे. ती जागा आह्मांस फार सोईची असें वाटल्यावरून आह्मी त्याठिकाणीं जाण्याचा बेत करून अडचणीच्या वाटेनें पण त्वरा करून निघालों आणि मोठ्या पहाटेस त्या ठिकाणीं जाऊन पोंहोंचलों.

सर्जे०— तुह्मी तिघेजण जयपाळ, नानासाहेब व तूं, आणि चौघीबायकांपैकीं रत्नमाला, चंद्रप्रभा आणि जयपाळाची स्त्री मालती; आणि चवथी स्त्री ती कोण?

हिंमतराव— चवथी मालतीची दासी रुक्मी.

सर्जे०— बरें, तुमची त्याठिकाणीं खाण्यापिण्याची तजवीज; व इतर प्रकारची व्यवस्था नीट आहे काय?

हिंम०— होय, जवळ निर्मळपाणी चांगलें विपूळ आहे. जवळच्या खेड्यापाड्यांत जाऊन ती रुक्मी जें लागेल तें सामानसुमान विकत घेऊन येते. त्या गुहेंतील जागा साफ करून खाण्यापिण्याची व निजण्याबसण्याची सर्व तजवीज केलेली आहे.

सर्जे०— बरें पुढें आतां तुह्मी कोणती मसलत आरंभिली आहे?

हिंम०— तें सर्व पुढें सांगतों. पण इकडील काय हकिगत आहे तें सांग?

सर्जे०— इकडील हकिगत; सर्व ठीक आहे. माणिपाल महाराज पुन्हां गादीवर बसले. सुमंतरावास प्रधानाचीं वस्त्रें मिळालीं. त्यादिवसाच्या इथल्या लढाईमध्यें जो एक वृद्ध पण तेजःपुंज वीर शिपाई लोकांस धीर देत होता. त्यासच सेनापतीचीं वस्त्रें मिळालीं ! त्याचें नांव वीरबाहू.

हिंम०— एकून सुमंतरावानें माझा अधिकार घेतला तर? बरें, कांहीं चिंता नाहीं. सुमंतरावास चांगलाच हात दाखविला पाहिजे.

सर्जे०— होय, पण तो कोणत्या रीतीनें दाखविणार?

हिंम०— तुझी जर मदत मिळेलतर सर्व गोष्टी घडून येण्याजोग्या आहेत

सर्जे०— माझी मदत, मीं काय केलें पाहिजे?

हिंम०— एकेदिवशीं रात्रींच्यावेळीं सुमंतरावाच्या वाड्यांत शिरून त्याची कत्तल उडवावयाची. आणखी दुसरें काय?

सर्जे०— मित्रा, पण हें वेड तुझ्या मनांत कां भरलें आहे?

हिंम०— पुन्हां हरप्रयत्न करून सुमंतराव आणि मणिपाळ ह्यां चा घात करून जयपाळाला गादीवर बसवावयाचेंच. या हलक्या मनुष्या ला मणिपालानें माझा अधिकार द्यावा; आणि मी वनवास काढावे; हें माझ्यानें कसें पहावेल?

सर्जे०— कोण हलका मनुष्य ह्मणतोस, सुमंतराव?

हिंम०— होय होय, तोच. ज्याच्या साह्यानें पुन्हा मणिपाल गा दीवर बसला; तोच सुमंतराव.

सर्जे०— हिंमतराव, तो हलक्या कुळांतील मनुष्य आहे; असें तुह्मी समजूं नका. तो आह्मां सर्वांपेक्षां थोर घराण्यातला आणि कु लीन असा आहे. विलास पुरच्या विजयचंद्र राजाचा पुत्र प्रतापचंद्र तो हा होय.

हिंम०— काय, प्रतापचंद्र?

सर्जे०— होय. विजय चंद्राचा ज्येष्ठपुत्र प्रतापचंद्र तोच हा.

हिंम०— प्रस्तुत गादीवर असलेल्या हेमचंद्राचा बंधु प्रतापचंद्र तो च हा सुमंतराव?

सर्जे०— होय, तोच तो.

हिंम०— तर ही गोष्ट तुला कशी समजली?

सर्जे०— सांगतों ऐक, रत्नपूरचा एक श्रीमान् व्यापारी गृहस्थ कां हीं कामाच्या संबंधानें याठिकाणीं आला होता. तो व मी याठिकाणीं गोष्टी बोलत बसलों होतों; इतक्यांत राजाची स्वारी देवीच्या दर्शनाक रितां निघाली; त्यावेळीं बरोबर सुमंतराव होता; त्यास पहातांच हा आ लेलागृहस्थ थोडा विस्मय पावल्या सारखा झाला; आणि त्यानें सुमंतरावा कडे खुण करून विचारिलें कीं, हे कोण गृहस्थ? मी ह्मटलें, सुमंतराव. तो ह्मणाला, आमच्या प्रतापचंद्र महाराजांचा आणि यांचा चेहरा अगदीं एक सारखा दिसतो. खचित प्रतापचंद्र हे. यांना पाहून सुमारें तीन चार वर्षे झालीं असतील; इतक्यांत थोडा फेर पडला आहे खरा. तरी पण मी निश्चयानें सांगतों कीं, प्रतापचंद्रच हे. इतकें समजल्यावर मणिदत्त

शेटीचे घरीं मनुष्य पाठवून आम्हीं शोध केला, तेव्हां तीनचार वर्षांत च सुमंतराव त्या घरीं येऊन राहिला आहे असें समजलें. यावरून तो प्रताप चंद्र खरा.

हिंम०—तरमग आतां माझ्या मनातील चिंता सर्व दूर झाली. थोड्याचदिवसांत सुमंतरावाचा सूड उगवितां येईल.

सर्ज०—कोणत्या प्रकारें सूड उगविण्याचा इरादा धरलास, सांग रेंपाहूं?

हिंम०—प्रतापचंद्र तुला थोड्याच दिवसांनी शत्रू होऊन राहील, किंवा तुला पदभ्रष्ट करील, यासाठीं त्याचें निवारण त्वरित करणें जरूर आहे; असें सांगून आज हेमचंद्राला उठवितों म्हणजे झालें.

सर्ज०—वा! चांगली युक्ती काढिलीस! बरें तुला मी असें विचारितों, हें जें तुझ्या मनांत सर्व वेड भरलें आहे तें कां म्हणून?

हिंम०—तरमग तुझें ह्मणणें काय? कीं आह्मीं हा वनवासच निरंतर करित असावें?

सर्ज०—तसें नाहीं मी ह्मणत. आतांची गोष्ट सोड पण ज्या माणिपलानें तुजवर पूर्ण विश्वास ठेविला, जो निरंतर तुझें हित चिंतीत गेला; ज्याच्या अन्नावर तूं आज एवढा वाढला आहेस; व ज्याच्या आश्रयानें तूं एवढ्या मोठ्या योग्यतेस चढलास; त्या माणिपालावर जय पालाच्या संगतीनें त्वां शस्त्र धरावेंस हें योग्य काय?

हिंम०—(जरा खजील होऊन) मित्रा, तूं ह्मणतोसतें सर्व खरें आहे, पण दुर्दैवानें जी गोष्ठ एकदां घडूनआली, ती पुन्हां सुधारतां येणें कठीण आहे. तेव्हां आतां जळत असलेला पाय पुढेंच ढकललेला पाहिजे.

सर्ज०—हा नीचांनो! हा दुष्टांनो! प्रीती म्हणून जी जगतांतील कांहीं वस्तू आहे, ती इश्वरानें तुम्हापाशीं तिळभरही ठेविलेली नाहीं. तुम्हांला न्याय नाहीं, कर्म नाहीं, धर्म नाहीं, ईश्वर नाहीं, कांहींच नाहीं. अरे ह्या अपराधा बद्दल ईश्वर तुह्मांला खाचित शासन केल्याशिवाय कधिंही सोडणार नाहीं.

हिंम०— मित्रा, असा राग तूं नकोस; मी सांगतों इकडे लक्ष दे.

सर्जे०— पण तु असें सांग का, जयपाळासच गादीवर बसवावें ही युक्ती तुला कोणी सांगितली?

हिंम०— जयपाळालाच गादीवर बसवावें, असा मणिपाल राजाच्या वडिलांचा हेतू होता.

सर्जे०— पण हें तुला कोणी सांगितलें.

हिंम०— चंद्र प्रभेच्या बापानें ह्मणजे आमच्या श्वशुरांनीं मरण कालीं तिला असें सांगून ठावल होतें कां, इरतऱ्हा करून जयपाळास गादी मिळावी. अशा विषयीं तूं खटपट कर. तिच्या सांगण्यानें मीं आज प्रस्तुत ह्या कामीं उद्युक्त झालों.

सर्जे०— बरा कबूल झालास. तेंच मला पाहिजे होतें. चंद्रप्रभा ह्मणजे चांडाळीण, व्यभिचारीण, दुष्ट, निर्दय अशी स्त्री आहे. तिच्यावर विश्वास ठेवून तूं राजकारस्थानांत हात घालतोस; तेव्हां तुझी अक्कल गेली तरी कोणिकडे?

हिंम०—(चकित होऊन) बरें, तिजविषयीं असा तला कोणता संशय लागला आहे.

इतकें म्हणतांच सर्जेरावानें आपल्या पेटींतून एक पत्र काढून त्याचे हातीं दिलें, तें उघडून हिंमतराव वाचूं लागला.—

प्रियकर श्री० जयपाळ महाराज

यांस.

आपली आज्ञा धारक चंद्रप्रभा हिची विज्ञप्ती ऐशी कीं, तुम्हांवर माझी मुळापासून अप्रतीम प्रीति आहे, ती खरी करून दाखविण्यास्तव आणि मजवर तुमचा विशेष लोभ जडावा यासाठीं, राज्याधिकारी तुह्मी व्हावें, अशा इच्छेनें व तुमच्या सांगण्यावरून नानासाहेबादि सरदारांस वश करून घेऊन बंड उपस्थित केलें. त्याप्रमाणें सर्व गोष्टी यथास्थित होऊन तुह्मी गादीचे अधिकारी झालां. मणिपाल राजाचें लें आपणास थोडें बहुत भय वाटत आहे, त्याबद्दल आतां फारशी काळजी करावयाचें

कारण नाहीं. तुमच्या प्रीत्यर्थ जें एवढें हल्ले व एवढें साहस मी केलें तें सर्व व्यर्थ; असें आतां माझी मला वाटूं लागलें आहे. तुम्ही गादीवर बसण्या पूर्वी या दासीवर जी प्रीति करीत होतां तीदेखील आतां दृष्टीस पडत नाहीं. एकांतांत असतां तुम्ही पूर्वी ज्या ज्या गोष्टी सांगत होतां त्यात्या सर्व स्वप्नवत् दिसूं लागल्या. अधिकार हातीं आल्यावर शकुरीं उन्मत्त होणें ठीक आहे; पण ही जी गरीब अबला आपली दासी हिच्याशीं तसें वागणें हें आपणास शोभत नाहीं. पूर्वी चार दोन दिवसांत एकदां तरी दर्शन देऊन मला आनंदवीत होतां; पण आतां गादीवर बसल्या पासून आपलें दर्शन दुर्लभ झालें आहे. मी पांच चार वेळ भेट घेण्याच्या इच्छेनें तुमच्या वाड्यामध्यें आल्यें, हें तुम्हांला समजलें असून भेट न होतां पुन्हां मला विन्मुख मागें यावें लागलें. असा निर्दयपणा करणें तुम्हांस ठीक वाटत असेल तरी पण तेणेंकरून माझ्या हृदयास छिद्रें पडल्या सारखीं झालीं आहेत. स्वकार्य साधण्या करितां बायकांस नादीं लावून फसविणें हें सूज्ञांस शोभत नाहीं. दर्शनाची उत्कंठा लागली आहे, ती पूर्ण करण्याविषयीं विनंती करीत आहें. भेटी अंतीं विशेष मजकूर श्रुत करीन हे विज्ञापना.

आ० दासी चंद्रप्रभा

हें पत्र वाचतांच हिंमत रावाच्या आंगाचा अगदीं तिळपापड होऊन तो मनांत ह्मणूं लागला, जिच्या मर्जी खातर आजपर्यंत अनेक साहसें केलीं, ती तर अगदीं चांडाळीण आहे. राज्य कारभारासारख्या मोठ्या महत्वाच्या गोष्टींत देखील ज्यानें लोकांपासून अलकवान ह्मणून घेतलें तिला या यत्किंचित कुलटा स्त्रीनें फसवावें काय? इच्या संगतीनें मी व्यर्थ माल राजद्रोही झालों.

अशा प्रकारें विचार करित असतां त्याची मुद्रा अतिशय संतप्त झाली, नेत्र आरक्त झाले, मुखांतून उष्ण श्वास निघूं लागले, हें पाहून सर्जेराव ह्मणाला,

सर्जे०—मित्रा, असा रागाच्या स्वाधीन होऊं नकोस विचारकर; आ.

णिगकृतकर्माचा पश्चात्ताप होऊन शुद्ध हो.एकंदरींत स्त्रियांवर विश्वास ठेवणें आणि त्या सांगतील तसें ऐकणें; हें सुशीस अयोग्य होय.

हिंम०—सर्व जन्म ज्याची सेवा इमानें आणि विश्वासानें केली; त्या मणिपालराजाचा विश्वास घात करावयास प्रवृत्त झालों. सर्व जन आतां मज सारखा कोणी कृतघ्न नाहीं, असें ह्मणूं लागतील आतां मला जगांत तोंड दाखविण्यासही जागा उरली नाहीं.

सर्जे०— गेली गोष्ट आतां फिरून येत नाहीं. पण आतां तरी तूं मनांतील सर्व विचार एकीकडे ठेवून शुद्ध अंतःकरणानें वागत जा त्यांत तुझें इश्वर कल्याण कराल.

हिंम०— आतां मणिपाल राजाकडे जाऊन व त्यांस सर्व वृतांत सांगून त्यांची क्षमा मागेन; आणि पूर्ववत् त्यांच्या कृपेस पात्र होईन मणिपाल महाराज महान दयाळू आहेत. ते सर्व माझे अपराध पोटीं घालतील; असें दिसतें.

सर्जे०— बाबा, तितकेंमात्र करूं नकोस. तुह्मांस पकडून देण्याविषयीं जाहीर नामे लागले आहेत व जिकडे तिकडे राजानें हेरही पाठविले आहेत. जो धरून देईल, त्यास दहाहजार रुपये इनाम ठेविलेलें आहे, तेंव्हां आतां जर तूं महाराजांकडे जाशील, तर तुजवर क्षमा न होतां जिवावरचा प्रसंग येईल.

हिंम०— तर मग आतां काय करावें हें तरी सांग; बरें? पण मित्रा हें पत्र तुझ्या हातीं कसें आलें.

सर्जे०— तें सांगतों ऐक, तुमच्या घरीं रमी ह्मणून जी दासी होती, ती आमच्या घरीं कधीं कधीं येत असे. हें पत्र घेऊन ती एक दिवस जयपाळाकडे जात होती. ती आमच्या घरीं कांहीं कामाकरितां आली. तिला पाहतांच तुमच्या घरची कांहीं हाकिगत तिच्याकडे विचारावी, अशा इच्छेनें तिला हांक मारिली; आणि कांहीं बोलत होतों, इतक्यांत तिच्या लुगड्याच्या निरींतून हें पत्र खालीं पडलें. तें कोणाचें; ह्मणून विचारूं लागलों; तों ती जास्त लपवा छपव करूं लागली; तेंव्हां तर मला जास्तच

च संशय आला; आणी तिच्याकडे तें मी आग्रहानें मागूं लागलों. शेवटीं हो य नाहीं ह्मणतां ह्मणतां अखेरीस तें घेतलेंच, आणि फोडून वाचून पाहूं लागलों, तर हा मजकूर. तेव्हां तर चंद्रप्रभेचा जो मला संताप आला, तो सांगतांच नये. बायकांवर सर्वथैव विश्वास ठेवणें हें पाजी पणाचें काम आहे; अशी माझी खात्री झाली राज्यक्रांती होण्याची खटपट तूं कां करीत होतास, हें मला तूं पूर्वींच कळविलें होतेंस; पण तीं कारणें मला मुळींच खरीं वाटत नव्हती. पत्र पाहिल्यावर खरें का रण कोणतें, हें मला पक्कें समजलें. नंतर रमी हें पत्र माझ्याजवळ मागूं लागली; तेव्हां मी तिला सांगितलें कीं, जयपाळाकडे पत्र पोंचविलें अ सें जाऊन चंद्रप्रभेला सांग शेवटीं माझ्या हातून पत्र मिळत नाहीं. अ सें पाहून रमी निराश होऊन चालती झाली. पुढें ही हकिगत तुला क ळवावी, असें माझ्या मनांत आलें; परंतु तुझ्या हातून अविचारानें जी गोष्ट घडून जावयाची ती तर घडलीच, आणि बंडांतही तूं सामील झा लास; तेव्हां आतां ह्या कामांत मुळींच बोलूं नये, असा निश्चय केला; परंतु अजूनही कपट पाशांत बांधला जाऊन तूं यातना भोगति आहेस, ह्मणूनच तुला ही गोष्ट सांगणें जरूर पडली.

हिंम०— तिच्या पातीव्रत्याबद्दल आजपर्यंत मला अगदीं संशय लागला नाहीं; ह्मणून मी फसलों गेलों. बरें, पण तुला मी असें विचार तों कीं, जयपाळ अशा कामाला कसा प्रवृत्त झाला?

सर्जे०— जयपाळाच्या हातून हें नीच कर्म घडलें, असें जरी दिसतें तरी अन्याय जयपाळाचा दिसत नाहीं; हें आतांच्याच पत्रावरून सिद्ध होतें. बायका केव्हां आणि कोणत्या प्रकारें साधूंची देखील मतो भ्रष्ट क रितील, याचा विश्वास नाहीं.

हिंम०— बरें, आतां मी पुढें कोणत्या रीतीनें व्यवस्था करावी ? म णिपाळ राजा तर आमचा विश्वास धरणारच नाहीं; आणि दुसरीकडे को ठें असलों तर कोणी आह्मांस पकडून देईल ही भीति; तेव्हां आतां क रावें तरी काय ?

सर्जे०— तूं ह्मणतोस तें अगदीं खरें आहे. तुह्मांला आतां कोणता ही मार्ग उरला नाहीं. दुसऱ्या एखाद्या राज्यांत जाऊन रहाल तर.

हिंम०— तीही आशा नाहीं. मणिपाल राजाचा ज्यापेक्षां मी विश्वासघात केला, त्यापेक्षां आतां आमचा कोणीही विश्वास धरणार नाहीं. बरें मित्रा, आतां मी जातों. वेशी बंद होण्याची वेळ आली आहे; तेव्हां लौकर निघालेंच पाहिजे.

सर्जे०— तूं पण आतां शेवटीं काय करणार ?

हिंम०— मला आतां अगदीं कांहीं सुचत नाहीं.

सर्जे०— बरें, तर आतां असें कर कीं, पहांटेस वेशी उघडल्या नंतर जाण्याचा बेत कर, ह्मणजे त्यावेळीं रस्त्यांतून गर्दी जास्त नसते, व कोणी ओळखण्याची भीतिही नाहीं. आणि तोंपर्यंत कांहीं युक्ति सुचली तर पाहूं. बरें, पण मला बोलण्याच्या नादांत कसा तो अगदीं विसर पडला. तुझ्या जेवणाखाणाची वाट काय ?

हिंम०— मला फारशी क्षुधा नाहीं.

सर्जे०— छेः ! पण तसा आळस कां ?

असें ह्मणून तो उठून घरांत गेला आणि खोलींतच त्याच्या जेवणाची तयारी करून पुन्हां बोलत बसला. बोलतां बोलतां कांहीं वेळानें सर्जेरावास युक्ति सुचून तो हिंमतरावास ह्मणाला, "मला एक तजवीज सुचली आहे; पण जर नानासाहेब आणि जयपाळ यांस सोडशील तर.

हिंम०— तसें करीन. ऐकूं कोणती तजवीज ती ?

सर्जे०— रत्नमालेच्या हातून तूं आपली सुटका करून घे.

हिंमतराव— ती कोणत्या रीतीनें ?

सर्जेराव— नानासाहेबाच्या जाचांतून काढून सुमंतरावाची जर गांठ घालून देण्याचें रत्नमालेजवळ कबूल करशील तर रत्नमाला सुमंतरावाकडून तुझें रक्षण करील.

हिंमतराव— होय, असें केलें तर हा आलेला प्रसंग टळण्याजोगा आहे.

सर्जेराव— झालें तर, हाच बेत. पुन्हां दुसरा कोणत्याही प्रकारचा विचार नको.

ही गोष्ट दोघांनाही पसंत पडून दोघांचींही मनें शांत झालीं.

## भाग १२

कोंबडा आरवण्याचे वेळेस गुहेंतील माणसें जागीं होऊन दरवाज्यांत येऊन बसलीं. त्यांनीं आपले डोळे रात्रीं गेलेल्या मनुष्याच्या वाटे कडे लाविले. चंद्र उगवून चार घटकेवर आला होता, अभ्र वगैरे नव्हतें, यामुळें चांदणें स्वच्छ पडलें होतें. झाडाखालीं मात्र कोठें काळोख दिसत होता. हिंमतरावाच्या येण्याच्या वाटेवर जरा कसची सावट दिसली कीं तो आला असा भास होऊन तीं सर्व मनुष्यें तिकडे पाहूं लागत, पण पुन्हा कोणी नाहीं असें पाहून निराश होत; असें होत असतां बऱ्याच अंतरावर त्यांस मनुष्याची आकृती दिसूं लागली. खरोखर तो हिंमतरावच होता. जसा तो जवळ येऊं लागला, तसा तसा तो स्पष्ट दिसूं लागला. तो येतो किंवा नाहीं, किंवा दुसरें कोणतें एखादें संकट उपस्थित झालें नसेल कशावरून अशा प्रकारची जी त्यांस काळजी लागून गेली होती, ती एकाएकी नाहींशी होऊन तीं सर्व मनुष्यें आनंदीत झालीं. इतक्यांत हिंमत राव अगदीं जवळ येऊन पोहोंचला. तेव्हां जयपाळ मोठ्यानें हांक मारून विचारूं लागला. "कां कसें काय? ठीक आहेना?,, हिंमतराव ह्मणाला, " मीं आंत येतों तरी.,, असें ह्मणून त्यानें आपल्या दांड्यानें कांटेरी झाडें एका बाजुस करून गुहेच्या दाराजवळ वाकून तो आंत शिरला. ह्यावेळीं चांगलें दिसूं लागलें होतें. चंद्राचें तेज कमी पडून पूर्व दिशा आरक्त झाली होती. अर्थात सूर्योदयाची वेळ अगदीं जवळ आली होती. तेव्हां गुहे मध्येंही बरेंच दिसूं लागलें. हिंमतरावाचा चेहरा बराच प्रफुल्लित दिसला. तेव्हां आपण संकटांतून पार पडण्याचा उपाय यास कांहीं तरी सांपडला असेल, असें सर्वांस वाटूं लागलें होतें. हिंमतराव मंडळींत येऊन बसल्यावर त्यास जयपाळ ह्मणाला, " तिकडील काय वर्तमान आहे, सर्जे रावाची गांठ पडली?,,

हिंम०— होय, गांठ पडून चार घटका बोलणें चालणें झालें; आणी आजपर्यंत चंद्र नगरांतील हकिगत जी आपणास अश्रुत होती, तीही सर्व समजली. मणिपाल राजा पट्टारूढ झाला, सुमंतराव मुख्य प्रधान झाले आणि वीरबाहू म्हणून कोणी एक सेनापती झाले; आणि आम्हांला जो धरून देईल; त्या प्रत्येक असामी बद्दल दहा दहा हजार रुपये बक्षिस ठरवून जाहिरनामे लाविलेले आहेत; हें तिकडील वर्तमान!

जय०—तरमग आतां आमची पुरीं शंभर वर्षें भरलीं म्हणावयाचीं. ह्या गुहेंत आजपर्यंत जरी आमचे दिवस सुखानें गेले, तरी ही जागा निर्भय नव्हे. एक दिवस नाहीं एक दिवस तरी आम्हांला कोणी तरी पकडून देईलच देईल. बरें, अशी कल्पना करा कीं, याठिकाणीं किंवा दुसऱ्या एखाद्या ठिकाणीं, जन्मही काढतां येईल; पण ह्या अज्ञात वासांत असण्या पेक्षां मरण फार बरें नाहीं काय?

हिंम०— पुन्हां पूर्व स्थितींत नाहीं, तरी चार चौघां प्रमाणें राहतां यावें अशा प्रकारचा एक विचार सर्जेरावानें सांगितला आहे; तो पसंत पडल्यास पहा.

जय०— काय तो ऐकूं यां? सांग बरें?

हिंम०— रत्नपूर नगरींतील विजय चंद्र राजाचा पुत्र प्रताप चंद्र कांहीं दिवसांपासून नाहींसा झाला आहे, ही गोष्ट तुह्मांला ऐकून ठाऊक असेलच?

जय०—होय, बरें मग पुढें?

हिंम०—सुमंतराव या नांवानें हल्लीं जो प्रसिद्धीस आला आहे, त्याचें च नांव प्रतापचंद्र.

जय०— काय, सुमंतराव हाच प्रतापचंद्र!

हिंम०— होय, तोच प्रतापचंद्र.

जय०— बरें, तुह्मांला ही माहिती कशी समजली?

हिंम०— सर्जेरावानें सांगितली. त्याच्या घरीं रत्नपूर नगरींतून एक व्यापारी आला होता; त्यानें सुमंतराव हाच प्रतापचंद्र असें सांगितलें.

तेव्हां तुह्मीं आतां दोघांनीं रत्नपुरीं गेलें पाहिजे.

जय०—बरें जातों, पण आह्मीं तिकडे जाऊन काय करावें ह्मणतां? तो मांडलिक राजा आहे. तें राज्य आमच्या वडिलांपासून आमच्या ताब्यांत आहे; आणि त्याजकडून आह्मांला करभारही मिळत असतो. प्रस्तुत माणिपाल गादीवर आहे ही हकिगत त्यास समजली तर — आणि समजलीच असेल. माणिपालाची कृपा संपादन करण्या करितां प्रस्तुत गादीवर असलेला हेमचंद्र आह्मांस धरून मणिपालाच्या हवालीं करील; आणि अर्थात आह्मांला फांसावर चढवितील! हा परिणाम तिकडे गेल्यापासून होणार!

हिंम—आधीं सांगतों ऐका, सुमंतराव प्रधान झाला असून मणिपाल अगदीं त्याच्या आज्ञेंत आहे, हें तुह्मीं हेमचंद्रास कळविलें पाहिजे.

जय० —बरें, मग पुढें?

हिंम०— तुमचें राज्य खालसा करण्याचा बेत सुमंतरावानें केला आहे; असें सांगून त्यास काळजींत पाडिलें पाहिजे; आणि असें सांगणें त्या दोघां भावांमध्यें वैमनस्य असल्यामुळें हेमचंद्रास खरेंही वाटेल; आणि लढाईची तयारी करून तो मणिपालावर उठेल.

जय०— हांय, असें कदाचित घडून आलें असें ह्मणा; तरी पण त्यापासून उपयोग तो काय होणार? रत्नपूर हें संस्थान लहान असून शिवाय हेमचंद्राच्या पदरीं सैन्यही थोडें आहे. तेव्हां मणिपालाचें शासन त्यांच्या हातून तें काय होणार आहे.

हिंम०— होय, तें सर्व खरें; परंतु तुर्त आह्मांला आश्रय तरी त्याठिकाणीं मिळेल, आणि सर्वांनीं मिळून हिंमत धरीली, आणि थोडेंसें सैन्यही वाढविलें, तर कदाचित माणिपालावर उठण्याजोगी सामर्थ्य तयारी ही होईल.

जय०— बरें तर आतां आह्मीं काय करावें, असें तूं ह्मणतोस?

हिंम०— तुह्मी आता वैराग्याच्या वेषानें रत्नपुरांत जाऊन पोंचावें; आणि हेमचंद्राची गांठ घेऊन त्याचें अनुकूल मत पडल्यास, पुन्हा

तुह्मी येऊन आह्मांस घेऊन जावें. बरें; अनुकूल मत पडलें नाहीं, तर आह्मी सर्वांनी पुन्हां दुसऱ्या एखाद्या उद्योगास लागावें.

जय०— तुह्मी जा ह्मणून सांगतां आहां, त्यापेक्षां जातों; पण ह्यांत तुमचें एखादें कपट तर नाहीं ना?

हिंम०— छेः! पण हा तुह्मांला अगोदर संशय कसा लागला? जी तुमची वाट, तीच आमची वाट. तुह्मांला सोडून आह्मी जाणार तरी कोणीकडे? आणि करणार तरी काय?

जय०— असें आहे तर तुझ्या ह्मणण्याप्रमाणें आह्मी करितों. कां नानासाहेब? तह्मी तयार आहां? अगदीं बोलत कां नाहीं?

नाना०— बोलणार काय आणि सांगणार काय, जी तुमची वाट. तीच आमची वाट. आह्मी तिकडून येईपर्यंत प्रधानजींनी या ठिकाणी राहून बायकांचें रक्षण करावें. आह्मांस आज रात्रींच निघण्याचा बेत केला पाहिजे; आणि आह्मांला रत्नपुरांत पोंचेपर्यंत कदाचित कोणी ओळखील ह्मणून दिवसाचें मुळींच चालतां नये, व मार्ग सोडून आड रस्त्यास राहिलें पाहिजे.

जय०— बरें, हें ठरलेंच तर?

नाना०— होय, आह्मांकडून ठरलें.

जय०— हिंमतराव तुमचें काय ह्मणणें आहे आणखी?

हिंम०—तुह्मी ह्मणतां तसेंच. दुसरें तिसरें कांहीं एक नाहीं.

जय०— बरें, उठा तर आतां, पुढच्या तयारीस लागा. याप्रमाणें बेत ठरल्यावर तीं सर्व मनुष्यें आपापल्या कामास लागलीं. आतां आपण सुमंतरावाकडची हकिगत लिहूं.

रत्नमालेची गांठ न पडल्यामुळें सुमंतराव सखेद होऊन चंद्रनगरा मध्यें निघून गेला; हें मागें कळविलेंच आहे. त्या दिवसापासून त्याची वृत्ति अगदीं उदास झाली होती; चोहोंकडे हेर पाठवून रत्नमालेचा शोध त्यानें चालविला होता. नानासाहेब व जयपाळ ह्यांनी रत्नपुरास निघून जाण्याचा बेत केला, त्या दिवशीं प्रहर रात्रीच्या सुमारास चंद्रनगरा म

ध्ये सुमंतराव जेवणखाण आटपून आपल्या महालांत लोडाशीं टेंकून पान खात बसला होता; त्यांतच तो कांहीं विचारांत गुंतून गेला आहे. असें दिसे. त्या दिवशीं उष्मा बराच होता, आणि समोरच्या खिडकींतून बारीक वारा येत होता; त्यामुळें त्याची काळजी जरा एके बाजूस होऊन किंचित त्या चा डोळा लागल्यासारखा झाला. आणि एक स्वप्न पडलें तें असेंकीं रत्न माला अरण्यांत एका झाडाखालीं तळमळत पडली आहे. सारा दिव स अनवाणी चालून श्रमल्यामुळें, व पायांस कांटे दगड लागून पाय फार ठणकत असल्यामुळें, ती फार विव्हळ होऊन शोक करिते आहे. तशांत अंधारी रात्र व चोहोंकडून हिंसक पशूंचें ओरडणें ऐकूं येत अस ल्यामुळें ती अगदीं भयाभित होऊन चोहोंकडे पहात आहे व आपणही तिला शोधण्याच्या इच्छेनें सर्व रान धुंडीत असतां तिचे ते करुणा स्वर कानीं पडले. ते ओळखून, रत्नमाले, मीं आलों. रत्नमाले मीं आलों. असें ह्मणत आपण तिच्याकडे धांवून जात आहों. हें स्वप्न जरी होतें तरी तो प्रकार अगदीं खरोखरच वाटून सुमंतराव एकाएकीं दचकून उठला; आ णि रत्नमाले, रत्नमाले, आलों. भिऊ नको. असे ह्मणून उठून धांवूं लाग ला. तेव्हां आपण रानांत नसून महालांतच आहें. अशी खात्री होऊन तो ढळढळां रडूं लागला. पडलें हें स्वप्न अशी जरी त्याची खात्री झाली, तरी यावेळीं रत्नमाला खरोखर अरण्यांत झाडा खालीं आहे; असें त्या स वाटून तो, त्या संकटांतून तिची मुक्तता करण्याविषयीं जलद निघून गेलें पाहिजे; असें ह्मणूं लागला. इतक्यांत महाराज, महाराज, असे श ब्द त्याच्या कानीं पडले. तेव्हां ते शब्द जिकडून आल्याचा त्यास भास झाला तिकडे ह्मणजे दरवाजाकडे तो पाहूं लागला; आणि ह्मणाला," कोण बाहेर, केदारवा,,. तो ह्मणाला," जी सरकार, होय, तोच मी केदा री. महाराज, शोधास गेलेल्या लोकांपैकीं ज्योति नुकताच बाहेर येऊन बसला आहे.,, सुमंतराव ह्मणाला" कोण ज्योतिबा आला." केदारी ह्म णाला," होय महाराज, कांहीं शोध लागला आहे, असेंही ह्मणत होता. हें कळविण्याकरीतां बराच वेळ मी ह्याठिकाणीं उभा आहे; पण महारा

ज कसच्या विचारांत होते; ह्मणून मी आपला उगीच उभा राहिलों.,, हे शब्द कानीं पडतांच आपला वेंधचार त्याच्या पाहण्यांत आला असाव.; असें समजून सुमंतराव जरा खजिल झाल्यासारखा झाला; पण तिकडे दुर्लक्ष करून मोठ्या उत्सुकतेनें ह्मणाला " जा जा लौकर, त्यास आंत घेऊन या.,,इतकें सांगतांच केदारी ज्योतिस घेऊन पुन्हा आंत आला. त्यास सुमंतराव ह्मणाले, " कां ज्योतिबा, बातमी आनंदाची आहे काय ? ,, ज्योतिबा ह्मणाला, " आनंदाची असें एव्हां खास ह्मणतां येत नाहीं; पण जो आज विलक्षण योग जमून आला, तेवढ्यावरून पुढचें चिन्ह बरें आहेसें वाटतें. ,, सुमंतराव ह्मणाला, " कोणता योग, सांगा पाहूं ? ज्योतिबा ह्मणाला; " आपली आज्ञा घेऊन निघाल्या दिवसापासून गांवोंगांव फिरून बारीक रीतीनें शोध केला; पण कांहीं तपास लागला नाहीं, तेव्हां निराश होत्साता कालरात्रीं पुन्हां घरीं आलों. रात्र फार झाली होती, दमून गेलों होतों, आणि भूकही फार लागली होती; यामुळें इकडे न येतां परस्पर घरीं गेलों. त्याबद्दल क्षमा असावी सरकार. सुमंतराव ह्मणाला, " तें असो. बरें, मग पुढें. ,, ज्योतिबा ह्मणाला. " आज पहांटेस उठून इकडेस घाईघाईनें येत होतों. इतक्यांत सर्जेरावाच्या वाड्यांतून एक बैरागी बाहेर पडला; आणि वेशीकडे जाण्यास निघाला. सर्जेरावाच्या वाड्यांतून आणि त्यावेळीं तो बाहेर आला, यावरून माझ्या मनांत थोडासा संशय उत्पन्न झाला; ह्मणून मी तिकडे न्यहाळून पाहूं लागलों. थोडक्याच वेळांत त्या बैराग्यानें मागें पुढें एक दोन वेळ पाहिलें, आणि मी जवळच्या आडगल्लींतून निघून पार गेलों; असें तो समजला; आणि त्वरेनें चालूं लागला. तेव्हां यांत कांहीं तरी काळेंबेरें आहे, अशी माझी खात्री झाली; आणि मीही त्याच्या मागोमाग निघालों. रात्र काळोखी होती; पण आकाश निरभ्र असल्यामुळें थोडासा प्रकाश दिसत होता. तेव्ह्यावरून तो शें दोनशें पावलें पुढें जरी चालत होता, तरी त्याची छाया माझ्या दृष्टीस पडे. कदाचित तो मागें पाहूं लागल्यास त्याच्या दृष्टीस पडूं नये. ह्मणून मी रस्त्याच्या एका बाजूनें चालत होतों याप्रमा

णें वेशींतून पलिकडे गेल्यावर सरकारवाड्यांतील पहारेकरी राणोजी मला भेटला. तो सरकारांस माहीत असेलच!

सुमं०— होय, आहे माहीत.

ज्योति०— त्याचा आजचा पहाऱ्याचा दिवस होता; ह्मणून तो राजवाड्यांत येण्याकरितां निघाला होता; इतक्यांत त्याची व माझी गांठ पडली. तेव्हां त्याला कांहीं जरूर सांगून आपल्या बरोबर बोलाविलें. व वाटेनें चालतां चालतां सर्व हकिकत कळविली आणि दोघेही त्वरेनें बुवांच्या पाठी मागून निघालों. इतक्यांत चंद्रोदय होण्याची वेळ झाल्या मुळें थोडथोडा प्रकाश दिसूं लागला. तेव्हां बुवांची चुकामुक होण्याची आतां काळजी नाहीं, व कदाचित ते आपणास पहातील, ह्या भीतीनें आह्मीं बरेच मागाहून चाललों. याप्रमाणे जातां जातां तीन चार कोश जमिनि चालून गेल्यावर बुवा मोठा मार्ग सोडून उजव्या हाताकडच्या एका बारीक पाय वाटेनें निघाले. ती वाट एखाद्या गांवाकडे जात नसून रानाकडे जाते, हें आह्मांस ठाउक होतें. त्या अरण्यांत एक गुहा आहे. त्या ठिकाणीं, पुष्कळ दिवसां पूर्वी एक बैरागी राहत असे. तिकडेच ही स्वारी जात असावी, असा आह्मीं तर्क केला; आणि बरेच आड रस्त्यानें निघालों. थोडक्याच वेळानें आह्मीं तर्क केला, तो अगदीं खरा असें दिसून आलें. बुवा जातां जातां अगदीं गुहेंत जाऊन पोंहचले. तेव्हां दोघेही आह्मी, गुहेच्या दरवाजासमोर एक झाड होतें त्यावर चढून बसलों. इतक्यांत चांगलें दिसूं लागलें बुवा एकटेच नसून आंत पांच सहा माणसें कांहीं तरी खलबत करताहेत, असें दिसून आलें. दोन घटका दिवसाच्या सुमारास तीं सर्व मनुष्यें एकामागून एक कांहीं कामाकरितां बाहेर पडलीं, तेव्हां त्यांस स्पष्ट ओळखतां येऊं लागलें. तीं कोण कोण मनुष्यें आहेत, हें सांगितल्यावर महाराजांस खचित आनंद होईल यांत संशय नाहीं.

सुमं०— तर आतां वेळ घेऊं नका, सांगा लौकर कोण कोणतीं!

ज्योति०— महाराजांना जिचा एवढा ध्यास लागून गेला आहे, जिच्या वियोगानें अन्नपाणी नकोसें झालें आहे, जिच्या भेटीची रात्रंदि

वस काळजी लागली आहे, ती रत्नमाला त्याठिकाणीं आहे.

सुमं०---- काय रत्नमाला! आणि तिला तुह्मीं प्रत्यक्ष पाहिलेंत!

जोति०---- होय सरकार. ती जर त्याठिकाणीं एकटीच असती तर धांवत जाऊन तिला खांद्यावरून इथपर्यंत आणून महाराजां समोर उभी केली असती; आणि महाराजांस आनंदविल्याबद्दल धन्यता मानिली असती.

सुमं०---- बरें, पण ती सुखी आहेना!

ज्योति०---- होय महाराज. ती सुखी आहे. पण आपल्या विरहानें थोडीशी कृश झाली आहे; असें दिसतें. तिचें मन अगदीं व्यग्र होऊन ती उदासीन दिसते. तिनें आपल्या बरोबरीच्या मंडळीशीं बोलणें चालणें अगदीं कमी केलें आहेसें दिसतें. ती सर्वांकडे अगदीं तिरस्कारानें पहाते; आणि एकेबाजूस बसून असते. तिच्या मुखावरचें हास्य मुळींच नाहींसें होऊन तें फिकट दिसतें. इतकें जरी आहे तरी तिच्या खाण्या पिण्याचे अगर कोणत्याही गोष्टीचे हाल झालेले आहेत, असें दिसत नाहीं.

सुमं०---- बरें, आणखी त्या ठिकाणीं कोण कोण आहेत, त्यांस तुह्मीं ओळखतां काय!

ज्योति०---- होय महाराज. जयपाळ राजे आहेत, हिंमतराव आहेत, नाना साहेब आहेत, चंद्रप्रभा बाई, मालती बाई व तिची दासी रुक्मी; ही सर्व मंडळी त्याठिकाणी आहे.

सुमं०---- बरें, ही बातमी तुह्मीं सकाळींच कां येऊन कळविली नाहीं!

ज्योति०---- तसें करतों असतों तर त्या काळांच्या दृष्टीस पडून आमचे तुकडे तुकडेच झाले असते! आह्मी सगळ्या दिवसांत झाडावरून खालीं उतरलों नाहीं.

सुमं०---- बरें, तुह्मी त्याठिकाणाहून इकडे येण्यास केव्हांसे निघालां आहां!

ज्योति---- सुमारें दोन घटका रात्रीस चांगला काळोख पडल्यावर मी त्या ठिकाणाहून निघालों.

सुमं०— बरें, अजून पर्यंत त्याठिकाणीं ती सर्व मंडळी आहेना?

ज्योति०— आहे सरकार.

सुमं०— तर आतांच याठिकाणाहून तयारी करून निघाल्यास त्या सर्वांस गांठतां येईल?

ज्योति०— होय सरकार. तेथून कदाचित ती मंडळी निघून जाईल, तर त्या पाळतीवर राणोजीस ठेविलें आहे.

सुमं०— तर मग आतां त्वरा करून उपयोगीं नाहीं. काळोखी रात्र असल्यामुळें कदाचित आमच्या लोकांतून त्यांस निघून जातां येईल; आणि सर्व बेत फसेल.

ज्योति०— होय सरकार असा संभव दिसतो खरा, आणि मोठ्या पहांटेस राणोजीने याठिकाणीं येऊन पोंचावें अशी मी तजवीज करून ठेविली आहे. तेव्हां अशी घाई करण्याचें कारण नाहीं.

सुमं०— बरें आहे तर. राणोजी आल्यावर मग कायती तजवीज करितां येईल. बरें, आतां तुह्मी रात्रीचे याठिकाणींच असा. बरें, पण तुमच्या जेवणाची काय वाट? तुह्मीं साऱ्यादिवसाचे उपाशी आहां. केदारबास हाक मारा बरें.

ज्योति०— ( केदारीस घेऊन येतो ) हे केदारबा आले सरकार.

सुमं०— केदारबा!

केदार०— जी.

सुमं०— घरांतील कोण कोण मनुष्यें जागीं आहेत, पाहून याजा बरें.

केदा०— कोणी जागें नाहीं सरकार, बाबासाहेब, आईसाहेब, सगुणाबाई हीं सर्व जणें केव्हांच निजलीं.

सुमं०— बरें तर, त्यांस आतां उठवूं नका हा वृत्तांत सकाळींच त्यांस कळवितां येईल. तोंपर्यंत तुह्मी स्वयंपाक घरांत जाऊन आचाऱ्यांस सांगून ज्योतिबाच्या जेवणाची तयारी करा; जा लौकर कसे.

केदा०— जी सरकार, हा निघालों.

ज्योतिबा व केदारबा निघून गेल्यावर उदईक कोणत्या प्रकारें बेत करावयाचा, ह्याबद्दल सुमंतराव पलंगावर पडून विचार करूं लागला.

"राणोजी पहांटेस निघून येईल,, असें ज्योतिबानें सांगितलें होतें. तेव्हां त्याची गांठ घेण्याविषयीं तो फार उत्सुक झाला कांहींवेळ निद्रा घ्यावी, ह्मणून तो बिछान्यावर जाऊन पडला, पण त्याला नीज पडेना! किंचित डोळा लागावा, पुन्हां जागें व्हावें, आणि पुन्हां या कुशीवरून त्या कुशीवर फिरावें; असा प्रकार चालला होता. इतक्यात कोंबड्याचें आरवणें त्याच्या कानीं पडलें. तेव्हां तो तसाच उठून बाहेर आला; आणि ह्मणाला, कोण आहे पहाऱ्यावर !

केदार०— जी सरकार, मी आहें.

सुमं०— बरें, ज्योतिबा कुठें आहेत?

केदा०— तो येथेंच देवडीवर निजला आहे सरकार.

सुमं०— निजूं दे तर त्याला. बरें केदारबा, राणोजी इतक्यांत यावा, तो अजून कां बरें आला नाहीं?

केदा०— इतक्यांत यावा, असें ज्योतिबाचें ही सांगणें होतें.

सुमं०— बरें, तुमचा जोडीवाला दुसरा कोण आहे?

केदा०— सुभाना आहे.

सुमं०— त्याला उठवा, आणि तुमचा पहारा संभाळण्यास सांगा, व तुह्मीं रिसाल्यांत जा; आणि रिसालदारास माझा असा निरोप कळवा कीं, दोनशें स्वार कामगिरीवर पाठविण्याची जरूर आहे. आतांच आले पाहिजेत, असें सांगा, समजलेत?

केदा०— होय सरकार.

इतकें सांगून सुमंतराव पुन्हां पलंगावर जाऊन पडला. थोडा वेळ झाला नाहीं तोंच राणोजी आल्याची वर्दी सुभान्यानें येऊन दिली. त्यास आंत आणावयास सांगून सुमंतराव उठून बसला. इतक्यांत राणोजीनें आंत येऊन सुमंतरावास मुजरा केला; आणि जवळच्या कोनांत तो उभा राहिला; त्यास सुमंतराव ह्मणाला, कां कशी काय तिकडील खबर आहे?

राणो०— सरकार, तिकडील हकिगत ठीक आहे. पण सरकारांनीं जरा त्वरा केली पाहिजे. तरच तीं सर्व मनुष्यें हस्तगत होतील. त्यांचा जागा सोडून कोणी कडे जाण्याचा बेत आहे असें दिसतें.

सुमं०— ( जरा अधिर होऊन ) काय ह्मणतां राणोजी, निघून जाण्याचा बेत आहे? हें तुह्मीं कशावरून ह्मणतां?

राणो०— मध्यान्ह रात्र उलटून गेली तरी देखील तीं माणसें निद्रा न घेतां कांहीं विचार करीत बसलीं होतीं. बैराग्याच्या सोंगाच्या जटा वगैरे सामान तयार करून पुढें आणिलें होतें. जसें काय तें सर्व संग परित्याग करून आतांच बैरागी होणार; असें दिसत होतें.

सुमं०— बरें तर, डेवडीवर केदारबा आले किंवा काय? जाऊन चौकशी करा जा?

राणो०— ( चौकशी करून ) नाहीं सरकार. अद्याप केदारबा आले नाहींत.

सुमं०— जा तर तुह्मी सरकार वाड्यांत. आणि महाराजांस असें कळवा, हिंमतराव जयपाळ व नानासाहेब यांचा शोध लागला आहे. तऱ्हां दोनशें स्वारांसह मी तिकडे जात आहें. निघा तर कसे?

राणो०— हुकूम सरकार. ( जातो )

सुमं०— ( पुन्हां हांक मारतो ) राणोजी, पुन्हां इकडे या सांगतों. महाराज जागृत आहेत किंवा काय ही पहारेकऱ्याकडे चौकशी करा. निद्रीस्त असतीलतर उठवूं नका. हें काम करून जलद पुन्हां माघारे या. तों पर्यंत मीही पोषाक करून तयार रहातों समजलेत?

राणो०— मागच्या पायीं मागें येतों सरकार.

राणोजी निघून गेल्यावर सुमंतराव आपल्या तयारीस लागला.

### भाग १३ वा

राणोजी चंद्रनगरांत येऊन पोंचण्याच्या सुमारास एक बैरागी आणि तीन स्त्रिया चंद्रनगराकडे जाणाऱ्या रस्त्यानें चालल्या असतां अकस्मात मागें खाड खाड घोड्याच्या टापा वाजताहेत, असें त्यांस ऐकूं

आलें; ह्मणून त्यांनीं मागें पाहिलें; तों स्पष्ट घोडेस्वार दिसूं लागले. ते अगदीं यांच्या जवळ आल्यावर त्यांतील एक जण दुसऱ्यास ह्मणाला, "गड्या हें काय प्रकरण आहे? ह्या कोणाच्या तरी मुली ह्या बैराग्या बरोबर पळून जात आहेत, अगर हा बैरागी त्यांस पळवून नेत आहे असें वाटतें,, दुसरा ह्मणाला, " विचारून तरी पहा त्यांना,, तेव्हां पहिला ह्मणाला, " ए बैराग्या, या मुलींना कोणीकडे चालविलें आहेस सांग ? हें ऐकतांच हिंमतरावाची अगदीं गाळण होऊन चुकली, आणि उत्तर द्यावें किंवा न द्यावें हाच तो विचार करूं लागला. तेव्हां त्यांतील प्रमुख, त्याची मुद्रा भयग्रस्त पाहून त्या स्वारांस ह्मणाला, " ह्यांस घेऊन चला मागें,, या प्रमाणे त्याच्या तोंडांतून अक्षरें निघतांच सर्व स्वारांनीं आपापले घोडे फिरविले; आणि त्या सर्वांस मध्यें घालून चालूं लागले. ह्या घोडे स्वारांतील प्रमुखाचें नांव कृष्णराय असें होतें हा एक लहानसा जहागीरदार होता.

तेथून सुमारें दोन कोस, दक्षिणेच्या अंगास देव गांव या नांवाचें एक खेडें होतें. कृष्णराय हा तेथील रहाणारा. देवगांव आणि त्याचे आजुबाजूंचे बारा गांव, कृष्णरायाच्या आज्यानें लढाईंत कांहीं पराक्रम दाखविल्यावरून चंद्रनगरच्या राजाकडून त्यास इनामत सुटलेले होते; ते अद्यापिही त्याच्या वंशजाकडे ह्मणजे कृष्णरायाकडे चालत होते. कृष्णरायानें आपल्या पदरीं पंचवीस घोडे स्वार आणि पन्नास शिपाई बाळागलेले होते. राजावरचें संकट निवारण होऊन तो पुन्हां गादीवर बसला आहे, अशी बातमी समजल्यामुळें आज कृष्णराय हा तिकडे जाण्याकरितां निघाला होता; पण मध्येंच यांची गांठ पडून तो मागें परतला

देव गांवाच्या बाहेर कृष्णरायानें एक सुंदर बाग तयार करून त्याचें नांव हिराबाग ठेविलें होतें; आणि त्यांत एक बंगला बांधिला होता. तेंच कृष्णरायाचें विलासाचें व हवा खाण्याचें स्थान होतें; ह्मणून तो आपल्या वाड्याकडे न जातां बागेकडे निघाला. सूर्योदया पूर्वी दोनघटका ती सर्व मंडळी बागेंत येऊन पोहोंचली. तेव्हां कृष्णराय घोड्यावरून उ

तरला; आणि बागेच्या संरक्षणार्थ असलेल्या लोकांस हाक मारून ह्मणाला, " या चौघांसही नेऊन निरनिराळया खोल्यांत अडकवून ठेवा, आणि बाहेरून दारास कुलपें लावून ध्या. हें ऐकतांच तीं चौघेंही अगदीं चप पल्या सारखीं झालीं. ह्या तिघी तर अबलाच, पण हिंमतराव हिंमतवान् असून तोही अगदीं भांबावून गेला. शेवटीं कृष्णरायाच्या चाकरांनीं आज्ञे प्रमाणें त्या चौघांस चार खोल्यांत कोंडून बाहेरून कुलपें लावून वेतलीं. इतकें झाल्यावर कृष्णरायानें पुन्हां आठचार दिवसांनीं चंद्र नगरास जाण्याचा बेत करूं, असें सांगून स्वारांस घरीं जाण्याविषयीं आज्ञा दिलीं; आणी सूर्योदय होण्यास दोन घटकेचा अवकाश होता; ह्मणून आपल्या रंग महालांत जाऊन पलंगावर स्वस्थ पडला.

कृष्णराय हा मनस्वी विषयासक्त होता. त्याच्या ताब्यांत असलेल्या दहा बारा खेड्यांतील ज्या ज्या तरुण स्त्रिया द्रव्याशेनें अगर कोणत्याही रीतीनें वश होण्याजोग्या होत्या; त्या मोठ्या प्रयत्नानेंही उपभोगार्थ आणण्याचा त्याचा क्रम चालू होता. किती एकांस जबरीनें, कितीएकांस द्रव्य देऊन, कितीएकांस भय दाखवून किंवा दुसऱ्या अनेक तऱ्हेनें फसवून तो आपली कामेच्छा तृप्त करून घेत असे. ह्या त्याच्या अविचाराला त्रासून कितिएक संभावित लोक त्याच्या हद्दींतून बाहेर निघून गेले होते.

आज नवीन तीन सुंदर आणि तरुण स्त्रिया हातीं लागल्या असून त्यांच्याशीं कोणत्या प्रकारें चैन मारावयाची, हाच कृष्णरायाचा विचार चालला होता. इतक्यांत त्यास खिडकींतून सूर्य किरण दिसूं लागले. तेंव्हां तो लगबगीनें उठून ह्यांच्या खाण्यापिण्याची व्यवस्था नीट ठेवा आणि खबरदारी बाळगा, असें चाकरास सांगून घरीं निघून गेला. असो; आतां ह्यावेळीं सुमंतरावाकडे काय हकिगत चालली आहे ती वाचकांस कळविणें जरूर आहे.

हिंमत रावादिकांस पकडण्या करितां सुमंतराव दोनशें स्वारांसह गुहेकडे येऊन पोहोंचला; आणि सभोंवता वेढा देऊन कांहीं लो

कांगह आपण गुहेंत गेला; पण त्याठिकाणीं विलक्षण प्रकार दृष्टीस पडला. हिंमतरावादि मंडळी आंत कोणी नगून शीर व धड वेगळें झालेलें, अशी एक स्त्री मारून टाकलेली दृष्टीस पडली. तिला पाहतांच सर्वांच्या आंगावर कांटा उभा राहिला. पुढें जाऊन नीट न्याहाळून पहातात तों तें प्रेत चंद्रप्रभेचें आहे, अशी त्यांची खात्री झाली. हा प्रकार काय आहे, हें त्यांस मुळींच समजेना. सुमंतराव तर अगदीं उदास होऊन रत्नमालेची काय स्थिती झाली असावी; याबद्दल विचार करीत राहिला, त्याचें देहभान नाहींसें झालें, नेत्रांतून टपटपां अश्रु गळूं लागले; याप्रमाणें सुमंतरावाची स्थिती पाहून इतरांसही वाईट वाटलें. कांहीं वेळ गेल्यावर शेवटीं निराश होत्साते चंद्रप्रभेचा दहन विधी करावयास कांहीं लोकांस सांगून ते सर्व जण चंद्रनगरास निघून गेले.

सर्जेरावाच्या वाड्यांतून आणि बैरागी बाहेर पडला, असें ज्योतिबा म्हणाला होता. तेव्हां कदाचित तिकडे शोध लागेल अशा इराद्यानें सुमंत रावानें सर्जेरावाच्या वाड्यांत जाऊन चौकशी केली पण अखेरीस कांहींच तपास लागला नाहीं.

रत्नमालेचा वियोग सुमंत रावास दुःसह जरी होता, तरी शोध लागण्याची आशा जर नसती, तर तशा स्थितींतच त्यानें कांहीं दिवस घालविले असते; पण ज्योतिबाच्या सांगण्यावरून त्यास आज आपण रत्नमालेच्या वियोगापासून मुक्त होऊं, अशी आशा उत्पन्न झाली; पण शेवटीं गुहे कडे गेल्यावर रत्नमालेची गांठ न पडल्यामुळें तो अगदीं भ्रमिष्ठा सारखा होऊन गेला. त्याचे डोळे खोल गेले, आंगावर अगदीं फिकटपणा आला, सर्व वस्तूंचा त्यास तिरस्कार येऊं लागला, जेवणही त्यास अगदीं गोड लागेना, वाढलेल्या पदार्थांतून त्यानें एखादा पदार्थ खावा, व एखादा टाकावा, आणि तेवढयावरच असावें; अशी त्याची स्थिती झाली. हा प्रकार मणिदत्ताच्या घरांतील माणसांच्या लक्षांत आल्यावर त्यांस पराकाष्ठेचें दुःख झालें. थोडक्याच वेळांत ही बातमी सर्व शहरांत पसरून लोक हळहळूं लागले. आपल्या साह्यकर्त्याची व नवीन

दिवाणाची वाईट स्थिती ऐकून राजास अतिशय वाईट वाटलें; आणि त्यानें रत्नमालेच्या शोधाकरितां चोहोंकडे गुप्त हेर पाठविले; व आपण ही कांहीं तरी यत्न करून पहावा, अशा इच्छेनें तो सुमंतरावाच्या घरीं निघून आला. नंतर आगतस्वागत होऊन सुमंतरावाच्या गोष्टी निघाल्या, तेव्हां मणिदत्तशेट ह्मणाला, " महाराज, सुमंतरावाची अगदीं विलक्षण प्रकृती झाली आहे. याचा असाच जर कांहीं दिवस क्रम चालला, तर हा अगदीं पक्का वेडा होणार. चार गोष्टी सांगून त्यास शुद्धीवर आण ण्याची मी व कित्येकांनीं पुष्कळ खटपट केली; पण ती सर्व व्यर्थ गेली. तो नित्य सकाळीं मोठ्या पहांटेस उठून बागेंत निघून जातो. व एखाद्या झाडाखालीं उगीच बसून राहतो. घटकेंत हंसतो, घटकेंत डोळ्यांतून पा णी काढितो, घटकेंत कांहीं संबंध नाहीं अशा प्रकारचें बोलणें बोलत अ सतो, घटकेंत सुस्कारा सोडतो, दोन प्रहरच्यावेळीं घरीं येतो, पण त्या चें जेवणाकडे लक्ष असत नाहीं. खोलीमध्यें शिरून सर्व खिडक्या व दारें लावून घेतो; व अंधारांत एकटाच बसतो. पुढें काय करावें हें आ ह्मांस अगदीं सुचेनासें होऊन गेलें आहे.

राजा०— बरें, तो यावेळीं कोणीकडे असेल ?

मणिद०— मी नुक्ताच तिकडून आलों. तो एका आंब्याच्या झाडा खालीं बसलेला आहे. सगुणा व दुसरीं एक दोन चाकर माणसें त्याच्या संरक्षणार्थ ठेविलेलीं आहेत.

राजा०— आतां तुह्मी व मी तिकडे जाऊन कांहीं यत्न करून पाहूं.

मणि०— बरें आहे.

इतकें झाल्यावर ते दोघेही बागेंत निघून गेले. पण यांस पहातांच सुमंतराव बसलेल्या जाग्यावरून उठून दुसरीकडे जाण्यास निघाला. ते व्हां आपली गांठ सुमंतरावास नको आहे, अशी कल्पना करून ते पुन्हां मागें फिरले. पुढें सुमंतराव शुद्धीवर येण्याविषयीं काय काय उपाय करा वे याबद्दल त्यांनीं पुष्कळ वाटाघाट केली; पण उपयोगी पडेल अशी

कोणतीही युक्ति सांपडली नाहीं. शेवटीं आपल्या पदरचीं विश्वासूक असीं दहा माणसें सुमंतरावाच्या रक्षणार्थ ठेवून राजा निघून गेला असो. आतां रत्नमाला कोणत्या स्थितींत आहे तें वाचकांस कळवूं.

कृष्णरायानें जीं चार माणसें पकडून ठेविलीं आहेत, तीं कोण? हें आमच्या वाचकांनीं जाणलेंच असेल. हिमतराव, रत्नमाला, मालती आणि तिची दासी हींच तीं चौघेंजणें होत. ह्या चौघांस कोंडून ठेविल्यावर हिमतराव, मालती व दासी या तिघांबद्दल विशेष कांहीं सांगण्यासारखें घडलें नाहीं. मिळेल तसलें अन्न खाऊन आयुष्यांतील दिवस कमी करीत तीं मोठ्या दुःखानें कारागृहांत होतीं. आतां रत्नमालेविषयीं काय प्रकार घडला, तो लिहूं.

एकाएकीं भयंकर प्रसंग आल्यामुळें रत्नमाला अगदीं घाबरून गेली. पुढें काय करावें हें तिला सुचेना. ती एकदां बसे, पुन्हां उठे, चोहोंकडे फिरे, आपणास कोणी तरी सोडविण्यास येईल ह्मणून दाराकडे पहात राही, पुन्हां निराश होऊन जमिनीवर पडे, केव्हां विचार करीत बसे, आणि केव्हां रडत बसे; याप्रमाणें प्रकार चालला होता. इतक्यांत कुलूप वाजल्याचा आवाज तिच्या कानीं पडला. तों दार उघडून एक वृद्ध बाई आंत आली. तिला पहातांच रत्नमालेला गहिंवर येऊन ती रडूं लागली. तेव्हां ह्मातारी ह्मणाली,

ह्मातारी— पोरी आतां कां रडतेस? तुझें दैव चांगलें ह्मणूनच कृष्णरायाची आणि तुझी गांठ पडली. तो तुला कांहीं कमी पडूं देणार नाहीं. तुझ्या खाण्यापिण्याची व्यवस्था ठेवण्याविषयीं त्यानें मला सांगितलें आहे. कांहीं काळजी करूं नकोस. माझ्या मुलीप्रमाणें तुझा सांभाळ करीन.

रत्नमाला— तुह्मांला पाहून ह्यांतून सुटका होण्याची मला देखील थोडीशी आशा लागली आहे. तुह्मी जगांत पुष्कळ दिवस काढल्यामुळें दुसऱ्याचें दुःख पाहून तुमच्या पोटांत कळवळा उत्पन्न झाल्याविना रहाणार नाहीं. मला वरी कांहीं कमी आहे असें नाहीं. तर या काळाच्या

हातून आमची गर्वाची सुटका होईल अशी कांहीं तरी तजवीज काढा ?

झातारी— तुझें याठिकाणींच जर कल्याण होण्याजोगें असेल तर सुटका होऊन त्यांत विशेष तरी तुला काय फायदा ? आणि याठिकाणा हून सुटका होण्याची आशा तर मुळींच दिसत नाहीं. कृष्णरायाचा दरा रा ह्या लोकांस फार आहे. तेव्हां तुमची दया जरी कोणाला आली, तरी सुटका होणार नाहींच. आतां या खोलींत जर तूं कंटाळली असशील त र तुझें मन रमेल अशा ठिकाणीं मी तुला नेऊन सोडितें. असें ह्मणून झातारीनें रत्नमालेस दिवाणखान्यांत पोंचवून पुन्हां बाहेरून कुलूप ला वून घेतलें; आणि हिंमतराव, मालती व रुक्मी या प्रत्येकांच्या खोलींत जाऊन त्यांच्याशीं कांहीं बोलून ती निघून गेली.

कृष्णराय झातारीची वाट पहातच बसला होता. इतक्यांत ती जा ऊन पोंहोंचली. तेव्हां तो विचारूं लागला.

कृष्ण०— कसें काय तिकडील वर्तमान आहे?

झाता०— चारी खोल्या उघडून पाहिल्या, त्यांत एक तर तो बै रागी. आतां ह्या तिघींपैकीं एक दासी असावी असें वाटतें. बाकी दो घी सुंदर असून तरुण आहेत. त्यांतून एक इतकी सुंदर आहे कीं, सा ऱ्या जन्मांत एकदां देखील अशी बायको पाहिली नसशील. तिला मी खोलींतून काढून तुझ्या रंग महालांत नेऊन ठेविली आहे.

कृष्ण०— फार चांगलें केलेंस तूं, पण त्यांचीं घरें कोणीकडे, त्या कोणाच्या मुली, वगैरे चौकशी केलीस काय?

झाता०— होय, त्यांनीं असें सांगितलें कीं आह्मी विलास नगरांती ल एका सावकाराच्या मुली आहों. तिसरी जी आह्मां बरोबर आहे ती आमची दासी. आह्मी आपल्या मामाच्या घरीं जात होतों. आमच्या बरोबर पुष्कळ मनुष्यें व गाड्या मेणे वगैरे सरंजाम होता. पण चोरांनीं लुटल्यामुळें कांहीं राहिलें नाहीं. आह्मी तिघी मात्र जिवंत राहिलों. पुढें आह्मांस सध्यां बरोबर असलेला बैरागी भेटला. तो आमच्या मामाच्या ओळखीचा आहे. तेव्हां त्याजबरोबर पुढें निघालों.

कृष्ण०— तें कसेंही असो, त्यांची भिती बाळगण्याचें कारण दिसत नाहीं. आतां जेवण झाल्यावर तिकडे जाणार आहें. तूंही आतां जा. पण संध्याकाळीं माझी गांठ घे. जर ती कदाचित् मला वश झाली नाहीं, तर मग तुला कळवीन. असें ह्मणून कृष्णराय स्नान करण्याकरितां निघून गेला.

इकडे रत्नमालेला ज्या दिवाणखान्यांत ठेविलें होतें, तो फार सुशोभित होता. भिंतीवर देव दैत्यांचीं चांगल्या कारागिरांकडून सुंदर चित्रें काढविलेलीं होतीं. सर्व दिवाणखानाभर गालिच्याची बैठक घातलेली असून दारासमोरच्या भिंतीशीं लोडें व तक्के मांडून ठेविले होते; व दुसऱ्या तीन बाजूंनीं खुर्च्या मांडून ठेविल्या होत्या. मध्यें पलंग होता. वर छत लाविलेलें असून मध्यें एक झुंबर व सभोंवतीं हांड्या लाविलेल्या होत्या. राजाच्या दिवाणखान्याप्रमाणें जरी याची शोभा नव्हती तरी, सामान्य रीतीनें ही जागा सुशोभीत होती, असें ह्मणण्यास चिंता नाहीं. पण रत्नमालेचें मन त्याठिकाणीं रमेना! तिच्या खाण्यापिण्याचा बेत चांगला ठेविलेला होता; पण तिला अन्नही गोड लागेना! ती एका कोनांत गालिच्यावर पडून राहिली होती.

संध्याकाळच्या प्रहर दिवसास कोणी कुलूप काढीत असल्याचा तिला आवाज ऐकूं आला. इतक्यांत ती पदर सांवरून व खालीं मान घालून दाराकडे पहात एका कोनांत उभी राहिली. इतक्यांत कृष्णरायानें आंत येऊन दारास कडी लावून घेतली, आणि रत्नमालेच्या अगदीं जवळ जाऊन ह्मणाला,

कृष्ण०— सुंदरी, पहा मदनबाणांनीं मी अतिशय व्यथित होऊन तुला शरण आलों आहें. आणि या पिडलेल्या शरणागताचें रक्षण करणें हें तुझ्या हातीं आहे. हें ऐकतांच रत्नमालेचा क्रोधाग्नी अगदीं भडकूं लागला. तिचे डोळे पाण्यानें भरून आले; व सर्वांग थरथरां कांपूं लागलें; त्या आवेशांत ती ह्मणाली,

रत्न०— चांडाळा! दुष्टा! पापमूर्ते! काय भाषण करीत आहेस हें!

तुझ्या जिभेचे तुकडे तुकडे कां बरें झाले नाहींत ? ह्या जगांत तूं पशूव त् निर्माण झाला आहेस.

रत्नमालेची क्रोधयुक्त मुद्रा पाहून कृष्णराय अगदीं भयाभीत होत्सा ता तिच्या पासून कांहीं पावलें मागें सरला. त्याचे मनोराज्यांतील विचा र एकदम नाहींसे झाले; आणि हिचा राग निवाल्यावर दुसऱ्यावेळीं फि रून यत्न करावा, असें मनांत आणून पूर्ववत दारास कुलूप लावून घरीं निघून गेला. तेव्हा इकडे रत्नमाला थोडीशी शांत झाली. तिला असें वा टूं लागलें कीं, आपण दुसऱ्याच्या बंदीत असून कठोरपणानें जें मी त्याच्याशीं वर्तन ठेविलें; तें चांगलें केलें नाहीं. गोडी गुलाबीनेंच कांहीं तरी युक्ति लढवून या काळाच्या हातून सुटका करून घेतली पाहिजे. माझ्या प्राणप्रियाला जर कोणत्या तरी रितीनें ही हकिगत कळती अ सती तर येथून माझी सुटका होण्यास विलंब लागला नसता; परंतु मा झें दैव इतकें कोठें चांगलें आहे. याप्रमाणें विलाप करीतच ती जमी नीवर पडली.

इकडे कृष्णरायास रात्रभर नीज पडली नाहीं. केव्हां उजाडेल, आणि केव्हां आपण बागेकडे जाऊं, असें त्यास झालें होतें. एकेक पळ त्यास युगाप्र माणें वाटूं लागलें. इतक्यांत कोंबड्याचें आरवणें त्यास ऐकूं आलें; तेव्हां तो लागलाच उठून मुख मार्जनादि विधी आटपून बागेकडे जावयास निघाला.

शोकानें व्याप्त होत्साती रत्नमाला पडली असतां तशांतच तिचा कां हा वेळ डोळा लागला होता, इतक्यांत दाराची कडी वाजल्यामुळें ती जा गी होऊन उठून उभी राहिली. कृष्णराय तिच्या अगदीं जवळ जाऊन ह्मणाला, " प्रिये, अजूनही उदास कां तूं? तू अगदीं काळजी करूं नको स? मीं तुला कांहीं कमी पडूं देणार नाहीं.

रत्न०— मला कोणत्याही वस्तूची इच्छा नाहीं. कृपा करून मला घरीं जर पोंचवाल तर तुमचे मी फार उपकार मानीन. तुह्मीं ज्या बुद्धीनें आह्मांला इकडे आणिलें आहे, ती दुष्ट वासना टाकून द्या. ह्यांतच तुम चें ईश्वर कल्याण करील?

कृष्ण०—प्रिये, माझी वाईट इच्छा नाहीं. तुझें चांगलें करावें अशी माझी मनापासून इच्छा आहे. तुझी गांठ पडली हेंच माझें ईश्वरानें कल्याण केलें असें मी समजतों. कदाचित तूं हट्ट धरून बसशील तर त्यांत तुझें अकल्याण आहे, असें समज.

असें ह्मणुन तो तिच्या खांद्यावर हात टाकावयास गेला. इतक्यांत ती रागाच्या आवेशानें लाल होऊन चटकन् मागें सरली; आणि ह्मणाली,

रत्न०—माझ्या आंगाला हात लावशील तर तुझ्या पुढें मी प्राण अर्पण करीन! हे शब्द ऐकतांच कृष्णराय अगदीं खजील झाला; पण तो प्रकार बाहेर न दाखवीतां ह्मणाला,

कृष्ण०— पहा सुंदरी, विचार कर, मनांतील वेड अगदीं सोडून दे. माझ्या मनास संताप आल्यानें तुझें कल्याण होईल असें तूं समजूं नकोस, ह्याबद्दल विचार कर, आतां मी निघून जातों.

असें ह्मणून कृष्णराय पुन्हां कुलूप लावून चालता झाला. तो गेला असें पाहून रत्नमाला पुन्हां भिंतीशीं टेंकून आपल्याशीं बोलूं लागली कीं या दुष्टाच्या हातांत सांपडल्यामुळें काय काय हाल भोगावे लागत आहेत? ईश्वरा, असें मीं कोणतें पाप केलें होतें? माझ्या विषयीं तुला करुणा मुळींच येत नाहीं काय? या एकांत स्थळांत आणि अशा संकटांत हे दिवस कसे घालवावे? अशा प्रकारच्या विचारांत ती अगदीं गर्क होऊन गेली.

इकडे कृष्णरायासही चैन पडेनासारखें झालें. ह्मातारीच्या तोंडानें रत्नमालेची प्रशंसा ऐकून तो अगदीं वेडावून गेला होता. पुढें प्रत्यक्ष तिला पाहिल्यावर त्याचें तन मन अगदीं तिजवर गुंतून राहिलें. तो जरी भारी विषयासक्त होता, तरी रत्नमालेचें अप्रतीम सौंदर्य पाहून मालती व रुक्मी ह्यांचा त्यास अगदीं विसर पडला.

दुसरे दिवशीं संध्याकाळीं कृष्णराय पुन्हा रत्नमालेच्या खोलींत आला, आणि हंसत ह्मणाला, “ प्रिये पहा, तूं उगीच संकटांत पडली आहेस. तुझ्या मनांत जें वेड भरलें आहे; तें अगदीं सोडून दे. जर तूं माझ्या

सांगण्याचा अनादर करशील, तर तुला विपत्ती भोगावी लागेल;,, रत्नमाला म्हणाली, "तें तर मी समजूनच आहें; पण तसें झालें तरी चिंता नाहीं. जें जें प्राक्तनामध्यें लिहिलें असेल तें तें भोगलें पाहिजे. तरी तुह्माला हात जोडून माझें पुनः पुन्हां असें सांगणें आहे कीं, तुह्मीं आपल्या मनांतील पापवासना सोडून द्यावी ह्यांतच तुमचें ईश्वर कल्याण करील.,, कृष्णराय ह्मणाला, "असल्या वेदांतानें माझें मन कधींच वळावयाचें नाहीं. तुझें चांगलें व्हावें, अशा इच्छेनें सामोपचाराच्या पुष्कळ गोष्टी मीं तुला सांगितल्या, जर न ऐकशील तर खचित तुझें मीं हाल केल्या शिवाय सोडणार नाहीं.,, रत्नमाला ह्मणाली, " पण मला तुह्मीं एवढें सांगा. हा जो विनाकारण माझा तुह्मीं छळ करितां आहां तो काय ह्मणून? ह्या कृतकर्मा बद्दल परमेश्वरापाशीं जबाब द्यावा लागेल! हें तुह्मीं कांहींच का लक्षांत आणीत नाहीं? ,, कृष्णराय ह्मणाला, " हा योग जमून यावा अशी ईश्वराचीच प्रेरणा होती; ह्मणूनच तूं माझ्या हातीं सापडलीस!

ह्याप्रमाणें त्याचें बोलणें चाललें होतें. इतक्यांत बाहेरून कोणी कडी वाजवीत आहे, असें त्यास ऐकूं आलें. तेव्हां त्यानें पुढें जाऊन कडी काढिली; तों पहिल्या दिवशींची ह्मातारी आंत आली. तेव्हां चार उपदेशपर गोष्टी हिला सांगून पहा, असें ह्मणून कृष्णराय बाहेर निघून गेला. तो गेल्यावर ह्मातारी दारास कडी लावून रत्नमाले जवळ येऊन बसली. कांहीं वेळ तरी त्या दुष्टाच्या हातांतून सुटलें, असें मानून रत्नमाला थोडीशी आनंदित झाली; आणि ह्मातारीकडे वळून ह्मणाली,

रत्न०— कां तुह्मांलाही माझी मुळींच दया येत नाहीं ना ?

ह्मातारी०— अग पोरी, ह्यांत दया कशाची ? तुझ्याएवढी जेव्हां मी होत्यें; तेव्हां जर अशा एखाद्याची गांठ पडली असती तर आज अशा दरिद्रांत मुळींच दिवस काढावे लागते नसते. ह्या तिच्या बोलण्यावरून तिची स्थिती कोणत्या प्रकारची आहे, हें रत्नमालेच्या कांहींसें लक्षांत येऊन चुकलें; आणि आपली सुटका होण्यास कांहीं थोडीशी ला

लुच दाखविली तर हीच आपल्या उपयोगी पडेल असें वाटून ती म्ह णाली,

रत्न०— आजीबाई, तुमच्या घरीं माणसें कोण कोण आहेत?

म्हाता०— ( वाईट तोंड करून ) बाई कांहीं दिवसांपूर्वी आमच्या घरांत कुटुंबांत पांच दहा मनुष्यें होतीं. पण आतां मी व माझा एक मुलगा हीं दोनच असामी राहिलों आहों. मी लहान असतांना आमच्या घरांतून माझे लाड कांहीं कमी होत नव्हते; पण माझ्या दुर्दैवानें मला दुसऱ्या एका चांडाळाचा नाद लागून मी फसलें गेल्यें. ज्याचा नाद लागला तो फारच निर्दय होता. त्यानें माझ्या आंगावर जें कांहीं खुडूक बुडूक होतें, तें सर्व एक दिवशीं एक, एक दिवशीं एक, अशीं कांहीं कांहीं कारणें सांगून सर्व हिरावून नेलें. ही गोष्ट जेव्हां घरांत समजली; तेव्हां त्यांनीं अन्नूकरितां आपला जीव दिला. नंतर आमच्या सर्व कुटुंबाचे हाल होऊं लागले. आमच्या घरांतून शहाणें कांहीं कमी नव्हते. त्यांस चंद्रनगरांत शंभर रुपयांची चाकरी होती. ते असेपर्यंत आमच्या सर्व कुटुंबास कोणत्याही गोष्टीची उणीव पडली नाहीं; पण त्यांच्या पाठी मागें सर्वांची अन्नानगत झाली. अशा विपत्तींतच सगळीं माणसें माझ्या डोळ्यां देखत मरून गेलीं. आतां मी व माझा एक मुलगा हीं दोघेंज णें मात्र जिवंत आहों. ती मी अन्नासाठीं याचा कुंटणपणा करित्यें; आ णखी काय सांगूं !

रत्नमाला— तुमचा मुलगा काय करीत असतो ?

म्हातारी— तो अजून लहानच आहे. पण आमचें सोळा विश्वे द रिद्र असल्यामुळें त्याला शाळेंत पाठविणें माझ्याकडून झालें नाहीं; म्हणू न तो अगदीं अक्षरशून्य निघाला. तो कृष्णरायाच्या येथेंच कांहीं बा रीक सारीक कामें करण्याकरितां राहिला आहे. पण उपयोग काय ? त्याला आणि मला जें कांहीं मिळतें तेवढ्यानें ओली कोरडी भाकर देखी ल आम्हांला पोटभर मिळत नाहीं.

रत्नमाला— बरें, आजीबाई तुमचें कल्याण जर होण्याजोगें असलें,

तर तुह्मी मी सांगेन तसें ऐकाल काय ?

ज्ञाता ०— (कांहींवेळ विचार करून) हुँ ऐकेन तर काय झालें? पण इथें जवळ पास कोणी नाहींना?

असें ह्मणून ती उठली आणि दार उघडून बाहेर कोणी नाहींसें पाहून पुन्हां आंत येऊन रत्न मालेजवळ बसली; आणि ह्मणाली,

ज्ञाता ०— बाई, हलकें बोल. तूं माझें कल्याण कोणत्या रीतीनें करणार? आणि मी तुझें काय ऐकिलें पाहिजे?

या तिच्या भाषणानें रत्नमालेला थोडासा धीर आला, आणि ती ह्मणाली,

रत्न०— (हंसत) आमी बाई, तुमचें जन्माचें दारिद्र नाहींसें करावें असें माझ्या हातीं आहे. मी एका बड्या सरदाराची मुलगी असून माझें माहेर मोठें संपत्तिमान आहे, व मी ज्या घरीं पडणार आहें, तेंही घराणें मोठें श्रीमान् आहे.

ज्ञाता ०— (मनांत) तर आपण सावकाराच्या मुली वगैरे जो हकिगत ते दिवशीं त्या खोलींतील मुलीनें मला सांगितली, ती खोटी वाटते. खरा प्रकार सांगितल्यास ह्यापेक्षां कांहीं विलक्षण संकट आपणावर उपस्थित होईल; असें तिला वाटलें असावें. बरें तें कसेंही कां सांगेना (उघड) तुझें अझून लग्न नाहीं झालें वाटतें? बरें तर मग मला आतां असें सांग कीं, तुझें माहेर कुठें?

रत्न०— चंद्रनगरास. माझीं आई बापें मरून फार दिवस झाले. त्यांच्या पोटीं मुलगा नसून आह्मी दोघीही मुली जन्मलों. तेव्हां आमच्या बाबानीं देहांत समयीं त्यांच्याजवळ जी विपूल संपत्ति होती ती आह्मां दोन्हीं मुलींस सारखी वांटून दिली. ती इतकी आहे कीं, तुमच्या सारखीं दहा कुटुंबें त्यावर हजारों वर्षें निर्वाह करतील. माझ्या माहेरास आतां कोणीच नाहीं, असें ह्मणण्यास चिंता नाहीं. तेव्हां ती मी सर्व संपत्ति तुमच्या हवालीं करून तुह्मांला आईच्या ठिकाणीं व तुमच्या मुलास भावाच्या ठिकाणीं मानीन. ह्या रत्नमालेच्या सांगण्यानें ज्ञातारीस किति

आनंद झाला असेल; ह्याची कल्पना वाचकांनीच करावी. आपण वृद्ध, मुलगा लहान, असें असून गेले दिवस हे चांगले, आणि पुढें येणारे वाइट, अशी जिची खात्री होती, तिस एकाएकीं मोठें वैभव प्राप्त होणार, अशी आशा दिसतांच ती म्हातारी आनंद समुद्रांत पोहावयास लागून मोठ्या उत्सुकतेने ह्मणाली,

म्हा०— मुली, पण मी तुझें काय काम केलें पाहिजे?

रत्न०— सुटका! माझी या दुष्टाच्या हातून सुटका केली पाहिजे!

म्हाता०— ( हंसून ) बरें, पण मग तूं माझें आई प्रमाणें आणि माझ्या मुलाचें भावाप्रमाणें पालन करशीलना?

रत्न०— होय, मीं ईश्वरास स्मरून सांगत्यें कीं, माझ्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत तुह्मांला मीं कधींही अंतर देणार नाहीं.

म्हाता०— पण पहा; विचार कर. तूं ह्मणतेस त्याप्रमाणें जर घडलें नाहीं, तर माझ्या विपत्तीस अंत नाहींसा होईल. आज मला जी ओली कोरडी भाकर मिळते आहे; तीही नाहींशी होऊन शिवाय कृष्णरायाचा मजवर अतिशय कोप होईल. ह्मणून सांगत्यें, जर तूं ह्मणत्येस त्याप्रमाणें केलें नाहींस तर मला गावोगांव अन्नान्न करीत फिरावें लागेल!

रत्न०— तुमचा असा मी कधींही विश्वासघात करणार नाहीं. हें तुह्मीं अगदीं खचित समजा.

म्हाता०— तर मग आतां हें खचित झालें ना?

रत्न०— होय होय, खचित खचित.

म्हाता०— बरें तर, आतां मला पूर्वी एवढें सांग कीं, तुला माळ वालण्याचा ज्यानें निश्चय केला आहे, तो कोण?

रत्न०— ते मोठ्या कुळांत जन्मास आले आहेत. पण सुर्त चंद्रनगरच्या मणिपाल राजाचे मुख्य प्रधान आहेत. त्यांचें नांव सुभंतराव.

म्हाता०— हें नांव माझ्या ओळखीचें आहेसें वाटतें. ते दिवशीं कृष्णरायाच्याच वाड्यांत कोणी बोलत बसले होते. त्यावेळीं ह्मणत होते कीं सुमंतरावानें महान पराक्रम केला, आणि पुढें त्याला मणिपाल राजा

नें प्रधानाची जागा दिली. तूं ह्मणतेस ते गुणवंतराव हेच काय?

रत्न०— होय, तेच. माझ्यापेक्षां हजारोंपट ते कोंवळया अंतःकरणाचे आणि चांगल्या स्वभावाचे आहेत. तुह्मीं माझी ह्या काळाच्या हातुन सुटका केली असें त्यांस समजलें ह्मणजे तुमचे किती उपकार मानितील ह्मणून सांगूं?

ह्माता० — ( हंसत ) पण सांगशील ना तूं. मी तुझें बरें करण्याविषयीं ह्मटलें ह्मणून?

रत्न०— होय, सांगेन. तेथपर्यंत एकदां पोहोंचलों ह्मणजे मग तुह्मांला अनुभव येईल.

ह्माता०— बरें तर, आतां मी जात्यें. आणि उद्यां रात्रीं किंवा परवां रात्रीं मध्यान्ह उलटून जाण्याच्या सुमाराला येथून निघून जाण्याची तयारी केली पाहिजे. मी मुलाला घेऊन येईन. तूंही तयारींत रहा. तों पर्यंत कांहीं तरी निमित्य सांगून कृष्णराय इकडे न येईल अशी तजवीज करीन; आणि मीही मध्यें एक दोनदां इकडे येऊन जाईन.

रत्न०— पण आपण ह्मणतां याप्रमाणें घडेलना?

ह्मातां०— होय, तूं कांहीं काळजी करूं नकोस. मी जात्यें आतां. असें ह्मणून ह्मातारी दारास कुलूपें लावून आपल्या घरीं निघून गेली.

ह्यावेळीं ह्या दोघांचीही मनें किती आनंदित झालीं असतील; ह्याविषयीं वाचकांस सहज कल्पना होण्याजोगी आहे. मनुष्याच्या समळ्या जन्मांत इतपत आनंदाचे दिवस थोडेच येतात. हा सर्वांस अनुभव आहे,

भाग १४ वा.

मनुष्याच्या वृत्तीचा असा कांहीं स्वाभाविक गुण असतो कीं, त्यावर एखादें संकट उपस्थित होऊन तशा स्थितींत त्यानें जरी कांहीं दिवस काढिले असले, तरी तो त्यांतून मुक्त झाला ह्मणजे मागील दुःख सर्व विसरून जाऊन त्यास पराकाष्ठेचा आनंद होतो. पूर्वसंकेताप्रमाणें रत्नमाला कारागृहांतून निघून चंद्रनगरास जाणाऱ्या रस्त्यास लागल्यावर त्या तिघांसही मागील स्थितीचें विस्मरण होऊन आपलें आतां पुढें चांगले

दिवस येतील अशी आशा उत्पन्न होऊन त्यांस पराकाष्ठेचा आनंद झाला. त्या आनंदांत चालण्याची संवय नव्हती, आणि घोर अंधःकार पडला होता, तरी ती उजाडण्या पूर्वी चंद्रनगरास येऊन पोहोंचली.

लहानपणापासून रत्नमालेनें ज्याठिकाणीं दिवस घालविले होते; व ज्याचा कांहीं दिवस वियोग झाला होता; त्याशहरांत ती येऊन पोहोंचली; तेव्हां तिला अतिशय आनंद झाला. रत्नमाला आल्याची बातमी थोडक्याच वेळांत सर्व शहरभर होऊन रत्नमालेच्या; कितिएक मैत्रिणी धांवत येऊन रस्त्यांतच तिला कडकडून भेटल्या; आणि हें आनंदकारक वर्तमान सगुणा बाईस कळविण्याकरितां त्यांतील दोघी धांवत माणिदत्ताच्या घरीं निघून गेल्या.

रत्नमालेच्या मैत्रिणींनीं " तुमचा वाडा व सामानसुमान सरकारांतून जप्त होऊन दारास कुलपें लाविलेलीं आहेत. ,, असें वर्तमान रत्न मालेस सांगून आपल्या घरीं येण्याविषयीं त्या आग्रह करूं लागल्या. तेव्हां रत्नमाला आतां आपण कोणीकडे जावें ह्याविचारांत पडली. इतक्यांत सगुणा धांवत आपल्या कडे येत आहे, असें तिच्या दृष्टीस पडलें. सुमंतरावाची स्थिती पाहून सगुणीस पराकाष्ठेचें वाईट वाटत होतें. आतां रत्नमाला आल्यामुळें सुमंतराव शुद्धी वर येऊन सर्व काळजी निवारण होईल; ह्या आनंदांत ती अगदीं निमग्न होऊन तिनें मोठ्या प्रेमानें रत्नमालेला दृढालिंगन दिलें आणि तिचा हात धरून तिला आपल्या घराकडे घेऊन चालली.

रत्नमाला आली हें कळतांच माणिदत्त व त्याची स्त्री लिलावती पुढें दरवाजांत येऊन तिची वाट पहात उभीं राहिलीं होतीं. इतक्यांत रत्नमाला ही जाऊन पोहोंचली. आपलें दुःख निवारण करण्या करितां ही कोणीएक देवीच स्वर्गा वरून खालीं उतरली, असें त्यांस वाटलें. रत्नमाला येऊन एक दोन घटका झाल्या नाहींत तोंच मोठ मोठे सरदार, व्यापारी, श्रीमान, संभावीत, अधिकारी वगैरे आणि सुमंतरावाचे नवीन मित्र व दुसरी कितीएक मंडळी माणिदत्ताच्या वाड्यांत येऊन

पोहोंचली. त्यामुळें तें घर गजबजल्यासारखें होऊन केवळ आनंद भुव नच दिसूं लागलें. इतक्यांत मणिपाल राजाही कांहीं लोकांसह त्या ठिकाणीं येऊन पोहोंचला. तेव्हां मणिदत्तशेटींनीं सर्वांचें आगत स्वा गत केल्यावर सर्वांनीं रत्नमाला आल्या बद्दल आनंद प्रदर्शित केला. मणिपाल राजानें सुमंतरावास आनंददायक असें वर्तमान सांगून त्या स बोलावून आणण्याचें काम सगुणेस सांगितलें तेव्हां ती मोठ्या आ नंदानें धांवत तिकडे जाण्यास निघाली.

सुमंतरावास भ्रम उत्पन्न झाला असें आम्हीं मागील भागांत सांगितलें आहे. ही गोष्ट सर्वांशीं खरी होती असें नाहीं. तरी सुमंतरावास कोणा शीं बोलणें आवडत नव्हतें सर्वांचाच बहुधा त्याला तिरस्कार येत असे. तेव्हां असा मनुष्य निरंतर एकांतांत व एकटा असे, व त्यास अन्नही गोड लागत नसे; ह्यांत फारसें आश्चर्य मानण्याचें कारण नाहीं. अशा मनुष्या ची स्वाभाविक वृत्ति ह्या तऱ्हेनेंच असावयाची. लोकांस मात्र त्यास भ्रम उत्पन्न झाला असें वाटत असतें.

रत्नमाला आली त्यावेळीं तो जाईच्या मंडपा खालीं कांहीं विचार करीत बसला होता. इतक्यांत सगुणा आपल्याकडे धांवत येत आहे, अ सें त्याच्या दृष्टीस पडलें तेव्हां तो उठून पूर्ववत् लांब जाऊं लागला. त्या मुळें ती पुन्हां मागें फिरली; आणि झालेला प्रकार तिनें राजास कळवि ला. तेव्हां रत्नमालेलाच तिकडे पाठवून सुमंतरावाला बोलावून आणावें, असें ठरवून राजानें रत्नमालेस तिकडे जाण्यास सांगितलें.

आपल्या प्राणप्रियाची केव्हां गांठ पडेल, असें तिला झालें होतें; पण राजानें जा असें सांगतांच तिनें लज्जेनें खालीं मान घातली, आणि मुकाट्यानें उभी राहिली तेव्हां राजा ह्मणाला, " मुली आतां लाजतेस कां? तुझे आह्मां सर्वांवर अत्यंत उपकार आहेत. तूं जर लौकर आली न सतीस तर सुमंतरावाची धडगत नव्हती. सुमंतरावसारखे सुशील आणि गुणी मनुष्य वारंवार निपजत नाहींत. त्याच्या एकट्याच्या जिवितावर ह्या सर्व लोकांचें कल्याण अकल्याण अवलंबून आहे; असें ह्मणण्यास चि

ता नाहीं. तेव्हां आतां तूं तिकडे जाऊन हा सर्व मंडळी ह्याठिकाणीं असतांच सुमंतरावाला याठिकाणीं आणशील अशी आह्मां सर्वांना आशा आहे. आतां विलंब लावूं नकोस. घटकाभर लाजणें एका बाजूस ठेव,, याप्रमाणें राजानें सांगितल्यावर रत्नमाला बागेकडे जावयास निघाली.

सुमंतरावाच्या दृष्टीस रत्नमाला पडतांच त्याचे सर्व विचार एके बाजूस राहून तो आश्चर्ययुक्त होत्साता टक लावून तिच्याकडे पाहूंलागला आणि आपल्याशीं ह्मणाला, " मना आतां संशय घेऊं नकोस. खाचित रत्न मालाही! पण मी स्वप्नांत तर नाहींना आहें? छेः पण हें स्वप्न नव्हे. मि बागेमध्यें असून उभा आहें नाहीं का? तर एकूण माझी सर्व विपात्ति संप ली ह्मणावयची! नेत्रांनों, घ्या एकदां आपलें पारणें फिटवून. प्रिये ये पुढें, तुला एकदां दृढालिंगन देऊं दे. ( आलिंगन द्यावयास पुढें सरतो )

रत्न०—(एकिकडे होऊन ) हें काय पण; प्राण प्रिया, कोणी पाहिलें तर ह्मणेल काय? वाड्यामध्यें मोठ मोठे संभावित गृहस्थ आणि राजावि राज माणिपाल महाराजही आलेले आहेत. तव्हां त्यांच्या हा प्रकार दृष्टी स पडण्याचा संभव आहे.

सुमं०— पण सुंदरी, मी तुला पहात आहें हें स्वप्नांत तर नव्हेना?

रत्न०— प्राण प्रिया, हें स्वप्न नव्हे. खरोखरच ही अभागि रत्नमा ला ह्याठिकाणी येऊन उभी राहिली आहे! तुमच्या दुःखाचें मूळ जी रत्नमाला तीच ही!

सुमं०— दुःखाचें मूळ, असें ह्मणूं नकोस. माझ्या सुखाचें मूळ तूं च आहेस. बरें वाड्यांत लोक जमले आहेत, व महाराजही आले आ हेत, असें ह्मणत्येस ते कशा करितां?

रत्न०— मी आल्यें, याच आनंदानें तुमच्या भेटी विषयीं सर्व उत्सु क होऊन वाट पहात आहेत.

सुमं०— या सर्वांस माझ्याकरितां एवढे कष्ट भोगावे लागत आहेत ना! महाराजही किती माझ्याबद्दल काळजी करीत आहेत ह्मणून सांगूं? बरें, प्राण प्रिये, किल्यावरून जी तूं माझ्या दृष्टी आड झालीस, तेव्हां पा

सून तुह्मी सर्व जणें गुहेंत कशीं पोंचलां, चंद्रप्रभेचा घात कोणीं केला व तेथपासून तूं आजवर होतीस कोणीकडे? हें सांग?

रत्न०— तो मी आपणाला सर्व वृत्तांत मग सांगेन. पण तुमच्या भेटीची इच्छा धरून जे कितीवेळ वाट पहात आहेत; त्यांस भेटून त्यां चें समाधान लौकर करा, अशी माझी विनंति आहे.

सुमं०— बरें आहे तर. तूं कांहीं वेळानें माझ्या पाठीमागून यांवस हा मी निघालों वाड्यांत.

सुमंतराव घरीं गेल्यावर सर्वांस पराकाष्ठेचा आनंद झाला. नंतर कां हींवेळ इकडे तिकडे सुमंतरावा बद्दल सुख दुःखाच्या गोष्टी होऊन सर्व लोक आपापल्या घरीं निघुन गेले.

आतां कृष्णरायाच्या तडाक्यांतून रत्नमालेची मोकळीक झाल्यावर दे व गांवांमध्यें मागें काय वर्तमान घडलें, तें वाचकांस कळवितों.

एक दोन दिवसांत रत्नमालेची समजूत करित्यें, तो पर्यंत आपण इ कडे येऊं नये, ती तुह्मांला फार भिते असें आजीबाईनें कृष्णरावाला सां गितलें होतें; पण दोन दिवस झाले तरी देखील ह्मातारी शुभ वर्तमान क ळविण्या करीतां आली नाहीं, तेव्हां तिच्या शोधाकरीतां कृष्णरायानें एक मनुष्य पाठविला; पण ती गावांतच नाहीं असें त्यानें येऊन कळावि लें. पुढें त्यानें तिच्या मुलाची घरांत चौकशी केली; पण तोही कालरा त्री आपल्या मावशीबाईच्या घरीं गेला आहे; असें घरांतील बायकांनीं कळविलें. तेव्हां तर तो फारच चिंताग्रस्त होत्साता धांवत बागेकडे निघून गेला; पण त्याठिकाणीं रत्नमाला नाहीं, असें त्याच्या दृष्टीस पडलें. ते व्हां तो अतीशय भयाभित झाला. हीं आणलेलीं मनुष्यें कोणाचीं कोण असावीत, हें त्यास पक्कें समजलें नव्हतें, व जें समजलें होतें त्यावर त्याचा विश्वास नव्हता; तेव्हां आतां पक्का शोध लावण्याकरीतां बैरागी व दोन बायका ह्यांस त्यानें आपल्याकडे आणण्याविषयीं चाकरांस हुकूम केला.

इकडे हिंमतरावानें बैराग्याच्या वेषास कंठाळून तो नुकताच टाकून दिला

होता; आणि तेथेंच खुंटीवर दोन फाटकीं तुटकीं वस्त्रें पडलीं होतीं; त्यांतू न एक नेसला होता, व एक पांघरून भुईवर पडला होता. अशा स्थितीं त तो असतां त्यास कृष्णरायाकडे नेण्यास चाकरानें दार उघडिलें; पण पहातां तों आंत बैरागी नसून त्याच्या ऐवजीं दुसरा कोणी आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें. तेव्हां तोही अगदीं चकित झाल्यासारखा होऊन त्यानें भीत भीत त्या तिघांस कृष्णरावापुढें नेऊन उभें केलें. हिंमतराव व कृष्णराव ह्यांनीं एकमेकांकडे पहातांच एकमेकांस ओळखिलें; तेव्हां कृष्णराव अगदीं आश्चर्य भरित झाला ! हें काय वर्तमान आहे, हें त्यास मुळींच समजेना ! हिंमतराव वगैरे मंडळीस पकडून देण्याविषयीं जाहिराती लाविल्या होत्या; त्याप्रमाणें आपण जर ही मूर्ति कैद करून चंद्रनगरास पोंचती केली असती, तर इनाम पदरांत पडून शिवाय सरकारची आपल्यावर बहाल मर्जी होती असती; पण ती वेळ निघून जाऊन आतां आपल्यावर काय प्रकरण उपस्थित होईल, ह्याबद्दल त्यास मोठी धास्ती पडली. शेवटीं ह्या तीन बायका कोण आहेत; हें समजण्याकरितां त्यानें हिंमतरावाजवळ चौकशी केली. तेव्हां त्यानें सर्व वर्तमान खरें सांगितलें. आतां तर कृष्णरावाची अगदीं पांचावर धारण बसली. त्या तिवगींस पुन्हां कोंडून ठेवण्यास चाकरांस सांगून आपण महालांत जाऊन पलंगावर विचार करीत पडला. पुढें काय करावें हें त्यास सुचेना ! रत्नमाला बहुधा चंद्रनगरास जाऊन पोहोंचली असावी खचित; अशी त्याची खात्री झाली. तेव्हां आतां आपलीं लौकरच शंभर वर्षें पुरीं भरलीं; असें त्यास वाटलें. आपणास पकडून नेण्याकरितां कदाचित चंद्रनगराहून स्वार रवाना झाले असतील, किंवा ते अगदीं जवळही आले असतील, अशा अनेक कल्पना त्याच्या मनांत येऊन तो अगदीं भांबावून गेला. पुढें आपणास आतां याठिकाणाहून लौकर कोठें तरी निघून जाणें जरूर आहे, असें त्यास वाटलें; आणि त्यानें चाकराकडून घोडा तयार करवून देवगांवाहून तो बाहेर जाण्यास निघाला. वाटेनें चालतां चालतां त्यास एक तरणोपायाची कल्पना सुचली ती अशी कीं, "आनंदस्वामीस शरण गे

त्यावर ते कृपा करून यांतून आपणास मुक्त करितील, असें त्यास वाटलें; आणि तिकडे जावें, असा निश्चय करून तो आनंदगांवीं जाण्यास निघाला.

इकडे आनंदस्वामींची स्थिती अद्यापिही पूर्ववत् भरभराटीची होती, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. हें आतां याठिकाणीं सांगण्याचें कारण असें कीं, आमच्या आनंदस्वामीसारखीं ढोंगें या जगता तलावर कुठें कुठें निरंतर उत्पन्न होत असतात; पण त्या ढोंगाची परिस्फुटता लौकरच होऊन लोक चांगले शुद्धीवर येतात. साधूंचे ठिकाणीं गुण कोणकोणते असले पाहिजेत, याचें आमच्या पुराणांतून पुष्कळ ठिकाणीं वर्णन केलेलें आहे. व हल्लीं दोन चार शतकांत जे खरे साधू होऊन गेले, त्यांनींही लोकांनां खऱ्या खोट्याची परीक्षा व्हावी, एतदर्थ कविता रूपानें खऱ्या खोट्याचें उत्कृष्ठ रीतीनें वर्णन केलेलें आहे; पण लोक तिकडे लक्ष न देतां सोंगाचाही सन्मान करितात. ढोंगी चतुर असला तर खऱ्या साधूप्रमाणें आपली कृति हुबेहूब उतरतो. असें असलें तर कांहीं कालपर्यंत त्याचें स्वरूप उघडकीस येत नाहीं; पण शेवटीं जगांत त्याबद्दल फार विचार होऊन त्याचा खोटेपणा लोकांच्या लक्षांत येऊन चुकतो; आणि ते त्याचा नाद अगदीं सोडून देतात. प्रस्तुतकालीं उत्कर्ष होऊन शेवटीं विटंबना पावलेल्या आमच्या डोळ्यासमोर पांच चार व्यक्ति आहेत. प्राचीन काळापासून आमच्या पूर्वजांनीं साधूंचें खरें स्वरूप दाखविण्याचा यत्न केलेला दृष्टीस पडतो. यावरून साधूचें सोंग आणून ठकविण्याचा लोकांत फार दिवसापासून वहिवाट आहे असें वाटतें. व तो प्रकार आजलाही आढळतो. यावरून पुढें हीं साधूचीं सोंगें आणणारें लोक निपजतील असें दिसतें. यासाठींच आनंदस्वामीची हकिगत आह्मी आपल्या कादंबरींत दिली आहे. यापासून साधूची मूर्ति दृष्टीस पडली ह्मणजे त्याबद्दल थोडा बहुत तरी लोक विचार करितील, अशी आह्मांस आशा आहे. आमच्या कादंबरींतील पात्र आनंदस्वामी हें निखालस ढोंग आहे. अशी आमच्या वाचकांची खात्री झाली असेलच. पण त्यांकडून

जो एक अद्भुत चमत्कार घडल्याबद्दल पूर्वी सांगितलें आहे, तो प्रकार कसा; याबद्दल कितिएकांस संशय लागेल, ह्मणून यावेळीं त्यांतील तथ्य कळविणें जरूर आहे. कारण तें सांगण्याचा प्रसंग पुढें येण्याचा संभव नाहीं.

नळ त्याविनें पिडलेला मनुष्य तिर्थ घेतांच बरा झाला. तो प्रकार असा, कोणी तरी श्रीमान् लोक आपल्याकडे आले ह्मणजे त्या वेळीं त शीं सोंगें आणण्या करितां स्वामीनीं तसे लोक शिकवून तयार केलेले होते

जेवणाचा वेळ टळून सुमारें चार घटका झाल्या असतील, अशावेळीं कृष्णराय आनंद स्थळामध्यें येऊन पोंचले; पण त्यावेळीं स्वामी अंतर्गृहांत होते तव्हां कृष्णरायानें आपलें कांहीं जरूरीचें काम आहे, यासाठीं आपली भेट आतांच झाली पाहिजे, असा एका द्वार रक्षकाजवळ स्वामीस निरोप पाठविला. तव्हां स्वामीनी कृष्णरायास आंत येण्याची परवानगी दिली.

पुढें तो आंत गेल्यावर त्यानें स्वामीजवळ आपली इत्थंभूत हाकिगत सांगितली; आणि शेवटीं ह्मणाला, " जर महाराजांकडून माझें रक्षण होईल, तर श्रीच्या खर्चा करितां सर्व जहागीर मी इनामत करून देईन. हें ऐकतांच स्वामी घोटाळ्यांत पडल्यासारखे झाले. जर लाग साधला तर जन्माचें कल्याण होण्यासारखें आहे, असें त्यांस वाटलें. पण तो कसा साधावा, याबद्दल ते विचार करून शेवटीं ह्मणाले,

स्वामी०— कृष्णराय तुह्मीं खरोखर ईश्वराजवळ महान् अन्याय केला आहे. पर स्त्रियांकडे पाप दृष्टी ठेवणें हा मोठा अन्याय आहे. यांतून तुह्मांस आपल्या अद्भुत शक्तीनें पार पाडण्यास श्रीचा आज्ञांवर क्षोभ होईल.

कृष्ण०— तर मग महाराजांच्या पायांजवळ विष खाऊन मरणें भाग आहे, दुसरा उपायच नाहीं.

स्वामी०— तर मग आतां कसें बरें करावें?

कृष्ण०— माझे सर्व अन्याय पोटीं घालण्याबद्दल महाराजांनीं श्री

जवळ रदबदली करावी.

स्वामी०— तें कांहीं होण्याजोगें नाहीं. श्रीजवळ अपराध माफ करवीं होणार नाहीं त्याबद्दल दंड भोगविलाच पाहिजे, अशी श्रीची आह्मांस ताकीद आहे. तेव्हां याबद्दल तिकडे आह्मांस गोष्टही बोलतां नये.

कृष्ण०— तर मग स्वतः महाराजांनीच याबद्दल तोड काढणें जरूर आहे.

स्वामी०— बरें तर मी आपल्या अद्भुत शक्तीचा उपयोग न करितां दुसरीच एक तजवीज तुह्मांस सांगतों; ती ऐकत असाल तर पहा.

कृष्ण०— ( आनंदित होऊन ) महाराज सांगतील तें ऐकण्यास मनकडून तयारी आहे.

स्वामी— तर मग असें करा, हिंमतराव, मालती व दासी ह्या तिघांच्या अन्नामध्यें कांहीं तरी कैफी पदार्थ घालून त्यांस पेटींत घालून पुरून टाका. ह्याप्रमाणें तो एक बंदोबस्त झाला, ह्मणजे रत्नमालेबरोबर मी विवाह केला होता व कांहीं दिवस माझ्याजवळ राहून शेवटीं ती पळून घरीं गेली, तेव्हां तिला आपल्या स्वाधीन करावी, असा चंद्रनगरच्या राजाजवळ अर्ज द्या. ह्मणजे तुमचे सर्व हेतू साध्य होतील.

कृष्ण०— पण तिच्याशीं मी लग्न लाविलें, ही गोष्ट सरकारांत खरी ठरावी कशी?

स्वामी०— त्या कामांत एक माझी व एक दोन तुमचे पुरोहित किंवा दुसरे कोणतेही वजनदार साक्ष द्या. व तुमचें दोघांचें लग्न लागलेलें अमुक दिवशीं अमुक ठिकाणीं आपण पाहिलें; असें त्यांनी सांगावे.

कृष्ण०—ही महाराजांनीं युक्ति चांगली काढिली. महाराजांच्या एका साक्षीनेंच सर्व आपलें काम होईल! पण दुसरेही दोन तिन साक्षी मी तयार करून ठेवितों, तरी आतां एक अडचण पुढें दिसते आहे ती अशी —कालरात्रीं रत्नमाला चंद्रनगराकडे जाण्यास निघाली आहे, ती आज सकाळींच तिकडे जाऊन पोंचली असेल तेव्हां तिनें जर हिंमतरावादिकांस सोडविण्या करितां सुमंतरावा जवळ रदबदली करू

न स्वार पाठविले असतील, तर त्यांनीं या वेळीं येऊन नागेसमोंवता वेढा दिला असेल, अगर लवकरच देतील. तेव्हां आतां येथून जाऊन हिंमतरावादिकांस पुरून टाकण्याची तजविज व्हावी कशी?

हें ऐकतांच स्वामी घोटाळ्यांत पडल्या सारखे होऊन विचार करूं लागले. शेवटीं त्यांनीं असें ठरविलें कीं, हिंमतराव बडा अपराधी आहे, तेव्हां राजाकडून त्याच्या अपराधाची माफी करवून नंतर सुमंतरा व देवगांवांकडे स्वार रवाना करील. आणि असें होण्यास सहजच दोन तीन दिवस लागतील. आतां असें न होतां जर स्वार रवाना झाले असले, तर ही ब्याद पकडली जाऊन यास गुळावर चढवितील आणि असें झालें तर आपला दुर्लौकिक होण्याचा मुळींच संभव नाहीं मात्र आपला फायदा बुडेल, इत्यादि विचार करून शेवटीं स्वामी ह्मणाले,

स्वामी —कृष्णराव, जगांत कुठें काय चाललें आहे, हें आह्मी जाणत असतों, हें तुह्मांस ठाऊक असेलच?

कृष्ण०—होय, अशा गोष्टी माझ्या कानावर पुष्कळ आल्या आहेत.

स्वामी०—आणखी ही एक गोष्ट ऐका तर. अद्याप पर्यंत तुह्मांस पकडण्याकरितां चंद्रनगराहून कोणी निघाले नाहींत.

कृष्ण०—पण त्यांचा लवकरच निघण्याचा विचार आहे कीं काय?

स्वामी०—आहे, पण तो बेत एक दोन दिवस रहित करितां येईल.

कृष्ण०—स्वामिंच्या कृपेनें आतां मात्र मी निष्काळजी झालों.

स्वामी०—बरें आहे तर, चला तुह्मी आतां लौकर, त्या उद्योगास लागा; आणि लग्न लागलेली जागा, दिवस व वेळ ठरवून ती एका विश्वासू चाकराच्या हातून आह्मास कळवा.

कृष्ण०— महाराजांच्या आज्ञेप्रमाणें करितों

याप्रमाणें संभाषण झाल्यावर कृष्णराय त्वरेनें आपल्या बागेंत आला, आणि त्यानें आपल्या चाकरांस असें सांगितलें कीं, "अन्नांतून दोन दोन तोळ्याच्या बिया त्या तिघांस आतांच चारा. कैफ आला ह्मणजे तीन पेट्यांत घालून जरूर त्यांस पुरून टाकावयाचे आहे. मी घरीं जाऊन

लवकर जेऊन येतों, असें सांगून कृष्णराय घरीं निघून गेला. सगळ्या दिवसाचा उपाशीं होता तरी ही त्यास जेवण गोड लागेना. सारासरी कांहीं खाऊन तो पुन्हा लगबगीनें बागेकडे येऊन पोहोंचला. तेव्हां त्यास एका चाकरानें येऊन कळविलें कीं, महाराज तिन्हीं मनुष्यें डोळे झांकून बेशुद्ध पडलीं आहेत; त्यांची हालचाल अगदीं कमी झाली आहे. इतकें ऐकतांच तो अगदीं हर्ष भरित होऊन त्यानें प्रत्येक खोलींत जाऊन पाहिलें, तेव्हां तीं मनुष्यें अगदीं बेफाम पडलीं होतीं. नंतर त्यानें पेट्या खोलींत आणावयास सांगून आपल्या समक्ष त्या प्रत्येकास पेटींत घालून त्या बंद करून बाहेरं आणिल्या. व बागेंत जवळच तीन खड्डे तयार केलेले होते, त्यांत त्या तिन्हीं पेट्या घालून चाकरांस माती लोटावयास सांगितलें. याप्रमाणें खड्डे भरून झाल्यावर कृष्णराय आनंदित होऊन साक्षीच्या तयारीस लागला. पण या कामांत साक्षी देण्यास कितिएक लोक तर अगदीं नाकबूल झाले. तरी एक दोन असामी कांहीं पैसा रोकड मिळाल्यामुळें व कांहीं पुढें देण्याचें कृष्णरायानें वचन दिल्यामुळें कबूल झाले. याप्रमाणें तयारी करून तो सरकारांत अर्ज करण्याकरितां चंद्रनगराकडे जाण्याच्या तयारीस लागला.

## भाग १९ वा

एके दिवशीं प्रहर रात्रीच्या सुमारास रत्नमाला महालांत लोड जवळ करतलावर हनुवटी टेंकून बसलेली होती. तिचा आपल्याशींच कांहीं विचार चाललेला होता; तरी ती मधून मधून दरवाजाकडे पहात असे. इतक्यांत दरवाजांतून कोणी येत आहे, असा तिला भास झाला; ह्मणून ती चटकन उठून उभी राहीली. तों सगुणा वर येत आहे, असें तिच्या दृष्टीस पडलें, तेव्हां ती किंचीत ओशाळल्या सारखी झाली. हा प्रकार सगुणीच्या लक्षांत येऊन ती ह्मणाली,

सगु०— कशी फशीवली ग तुला वहिनी! तूं समजलीस कीं दादाच आला. पण तो नुक्ताच कचेरीहून आला आहे. त्याचें जेवणखाण व्हायाला अजून दोन घटका पाहिजेत. बरें, तें असो. पण काल तूं जें सांगितलेंस

तें खोटें नव्हे! थोडे दिवस त्यानें रत्नपूरचें राज्यही केलेलें आहे. त्याचें मुळचें नांव तूं मला सांगितलें नाहींस, पण तें ही मी त्याला विचारून घेतलें. त्याचें नांव प्रतापचंद्र. समजलीस?

रत्न०— पण ही गोष्ट तुं इतक्यांत त्यांच्या जवळ काढूं नकोस, ह्मणून तुला सांगितलें होतें ना?

सगु०— वहिनी, तें सगळें खरें. पण ज्याच्या भयानें दादा आपलें नांव चोरून गुप्त राहिला आहे; त्यापासून पुन्हा जर उपद्रव होण्या जोगा असेल, तर एव्हांपासून सावध रहातां यावें, एवढ्यासाठींच मी त्या जवळ गोष्ट काढिली.

रत्न०— मग तिकडून काय ह्मणणें पडलें.

सगु०— दादा ह्मणाला, आतां त्याबद्दल भीती बाळगण्याचें कारण मुळींच उरलें नाहीं. प्रस्तूत आपल्या हातीं अधिकार मोठा असल्या मुळें पाहिजे तितकें सैन्य आपल्या ताब्यांत आहे. पाहिजे झाल्यास हेमचंद्राचा पराभव करून राज्य पुन्हा मिळविण्यासही कांहीं उशीर लागणार नाहीं. कांहीं दिवसां पुर्वीं जर मी याठिकाणीं आहें असें त्यास समजलें असतें, तर मात्र मोठी पंचाईत होती.

रत्न०— तर मग काय? ही निरंतर दुसऱ्याची सेवाच करून रहावें असें मनांत आहेसें वाटतें. तो दुष्ट नानासाहेब व जयपाळ जोंपर्यंत जिवंत आहेत तों पर्यंत काय काय प्रकरणें उपस्थित होतील ह्याचा अगदीं भरंवसा दिसत नाहीं. लौकरच रत्नपुरावर स्वारी होईल तर ते दोघेही हातीं लागण्या चा संभव आहे. बरें, तें असो. आज मी कांहीं महत्वाचें काम सांगितलेलें आहे; त्याबद्दल काय झालें हें समजत नाहीं.

सगु०— तें कोणतें काम; मला तर सांगशील कीं नाहीं?

रत्न०— मग सांगेन, पण एकदां खालीं जाऊन जेवणखाण आटपलें कीं नाहीं हें पाहून ये बरें.

सगु०— कितीपण तुला घाई ही! जेवण आटपल्यावर दादा त्याठिणीं एक पळभरही बसणार नाहीं. हा आलाच वाटतें. ( सुमंतराव ये

तो. व रत्नमाला उठून उभी राहते. )

सगु०— तुझी केव्हां पासून वहिनी वाट पाहत आहे. मी आतां तु ला बोलावण्याकरितां येणार होतें; इतक्यांत तूंच आलीस, हें एक बरें झालें. काल आह्मां बोलत होतों, त्या संबंधींच आतां बोलणें चाललें होतें. नाना साहेब व जयपाळ रत्नपुराकडे निघून गेले आहेत. ते कांहीं तरी प्रकर ण उपस्थित करितील. यासाठीं रत्नपुरावर लौकरच स्वारी करावी, अ सें वहिनीचें ह्मणणें आहे.

सुमं०— त्याबद्दल काळजी करण्याचें अगदीं कारण नाहीं. त्या तिघांच्याही हातून प्रस्तुत आमचें कोणत्याही रीतीनें पारिपत्य होण्याचा संभव नाहीं. आज महाराजांजवळ त्यांबद्दल गोष्ट निघाली होती.

रत्न०— हिंमतरावांबद्दल महाराजांचें काय ह्मणणें पडलें?

सुमं०—ती एक आतां आनंदाची वार्ता सांगतों. हिंमतराव बंडवाल्यांपैकीं मुख्य आहे. त्याला त्याच्या गुन्ह्यांतून मुक्त करण्याविषयीं महाराजांच्या मनांत नव्हतें, पण माझ्या आग्रहामुळें त्यांनीं शेवटीं एकदां कबूल केलें, आ णि हिंमतरावाची जी मिळकत सरकारांत जप्त झालेली आहे, त्याचा अर्धा भाग हिंमतरावास, व अर्धा तुझा हिस्सा, व शिवाय एक गांव महाराजां नीं आजीबाईस देण्याचें कबूल केलें आहे. आजीबाईचे आह्मां सर्वांवर उ पकार आहेत. असें त्यांचेंही ह्मणणें पडलें.

रत्न०— तर मग देवगांवांमध्यें त्यांचा कारागृहांतून मोकळीक क रण्याकरितां लौकर कोणी तरी पाठविणें जरूर आहे.

सुमं०— आतांच तिकडे स्वार पाठविलेले आहेत. कृष्णरावासही कै द करून आणण्याविषयीं त्यांस हुकूम केलेला आहे.

रत्न०— तर सर्व प्रकारची काळजी निवारण झालीच ह्मणावयाची.

सुमं०— परमेश्वर कृपेनें सर्व कांहीं यथास्थित होईल. बरें असो. आतां मला चंद्रप्रभेबद्दल काय वर्तमान घडलें तें सांग?

रत्न०— त्या गोष्टीची आठवण झाली ह्मणजे अद्यापि माझ्या अं गावर कांटा उभा राहतो. आईबाप लहानपणींच मरण पावल्यामुळें त्यां

च्या ठिकाणीं लहानपणापासून मला आकाच होती. आणि मीही तिचा केवळ आईप्रमाणे मान राखीत असें. आपलें बरें वाईट जें कांहीं व्हाव याचें तें तिच्या हातीं असून माझें बरें तेंच ती करील; अशी माझी खा त्री होती.

मजवर लहानपणापासून नानासाहेब प्रीति करीत असे, माझाही त्यावर लोभ असे. पुढें मी जसजशी मोठी होत चाललें, तसतशी मजव रची त्याची प्रीति वाढत चालली. माझ्याशीं लग्न लावावें, असें त्याच्या मनांत फार दिवसांपासून असावें असें वाटतें. हा त्याचा मनोदय आलि कडेच आकाच्या तोंडून मला समजला. तेव्हांपासून नानासाहेबांचा म ला त्रास येऊं लागला. मला थोडें समजूं लागल्यावर आका व्यभिचारि णी आहे; असें कळून आलें. तिनें आपली दुष्टवासना तृप्त करून घेण्या करितां आजपर्यंत जे जे माझे हाल केले, ते सांगूनही सरणार नाहींत. नानासाहेबाला अनुकूल करून घेण्याकरितां माझें त्याच्याशीं लग्न लाव ण्याचा तिनें ठराव केला. त्या गोष्टीस मी कबूल नव्हतें; हेंच माझ्या अ नेक विपत्तिचें मूळ होय !

मध्यान्ह रात्र उलटून गेली होती, रातीचा कीर्र आवाज कानीं येत होता, झाडावर मधून मधून पक्षी आपले पंख फडफडावित होते, झाडां खालीं वाळलेला पाचोळा पुष्कळ सांचलेला असल्यामुळें त्यांतून एखादें लहान सहान जनावर इकडून तिकडे गेलें कीं सर्र सर्र आवाज होत हो ता, कोल्हे वगैरे रानजनावरांचें ओरडणें ऐकूं येत होतें; अशा भयंकरवे ळीं जयपाळ व नानासाहेब रत्नपुरास निघून गेल्यावर हिंमतरावांची मु द्रा अति उग्र दिसूं लागली. जयपाळास आकानें एक पूर्वी पत्र पाठविलें होतें, तें,ते बैराग्याच्या वेषानें चंद्रनगरास आले होते, तेव्हां त्यांच्या हातीं आलें. त्यावरून ती व्यभिचारिणी आहे अशी त्यांची खात्री झाली. राखेमध्यें एखादी आगीची ठिणगी असावी व वाऱ्यानें वरील राख उडून गेली ह्मणजे ती ठिणगी जशी चमकूं लागते, त्याप्रमाणें जयपाळ व नानासाहेब गेल्यावर हिंमतरावाचा क्रोधाग्नी चमकूं लागला. त्यांनीं डो

ळे अगदीं लाल केले, आणि एकदम म्यानांतून सटकन तरवार बाहेर काढली. त्यावेळीं हा काय प्रकार आहे हें आह्मां चौघांनाहीं अगदीं सम जलें नाहीं. यामुळें कांहीं तरी विपरीत कल्पना यांनीं मनांत आणिली आहे, असें समजून सर्वांचे हात पाय लटलटां कांपूं लागले! आंगावरून घामाच्या धारा वाहूं लागल्या! तोंडांतून एकही शब्द उमटेना! अशी सर्वांची स्थिती झाली! हिंमतरावांनीं तें पत्र काढून आक्काच्या पुढें टाकिलें आणि ह्मणाले. "हें वाचून पहा. हें अक्षर तुझ्या हातचें आहे कीं नाहीं हें सां ग?,, तें पत्र पहातांच आक्का अगदीं स्तब्ध झाली. तिला मृत्यु आतां आपल्या पुढें मूर्तिमंत उभा आहे असें वाटूं लागलें. ती शोक स्वरानें वि लाप करून हिंमतरावास जिवदान देण्याविषयीं विनंती करूं लागली! हिं मतराव ह्मणाले, " चांडाळणी, भोग आतां आपल्या कर्माचें प्रायश्चित! तूं आपली दुष्ट वासना तृप्त करून घेण्याकरितां किती एकांस पश्चात्तापांत पाडिलेंस! मी आज राजाच्या अवकृपेस पात्र होऊन जो अरण्यांतून हिं डतों आहें, हें तुझ्या संगतीचें फळ! हें आणखी अजूनही पुढें किती दिवस भोगावें लागेल कोण जाणें? पण दुष्टे, तुला आतांच बक्षीस देतों! ,, असें ह्मणून हिंमतरावांनीं तरवार पुढें सरसावली. तेव्हां मी पुढें सरून का ळाप्रमाणें क्रुद्ध झालेल्या हिंमतरावाचे पुष्कळ आर्जव केलें; पायां पडल्यें; पदर पसरला; तेव्हां ते शेवटीं मला इतकें मात्र ह्मणाले कीं ही नष्ट मर णासच योग्य आहे. तेव्हां हिजबद्दल तूं किती रदबदली केलीस, तरीही मी ऐकणार नाहीं. असें ह्मणून त्यांनीं—अगाई! अजून ती आठवण झाली ह्मणजे आंगावर शहारे येतात— आक्काचें शीर धडापासून वेगळें केलें !! आक्कानें जो माझा अनेक प्रकारें छळ केला होता, तो त्यावेळीं अगदीं वि सरून जाऊन मी अतिशय शोक केला. मालती व रुक्मी यांनीं माझी पु ष्कळ प्रकारें समजूत केली; पण माझें दुःख कमी होईना! शेवटीं हिंमत राव मला ह्मणाले, "चल मजबरोबर! तुझ्या प्राण प्रियाची तुला गांठ घा लून देतों.

हे शब्द कानीं पडतांच माझें दुःख जरा कमी होऊन तशा भयंकर

रात्रीच्या वेळींच आह्मीं तिघीही चंद्रनगरास येण्याकरितां निघालों. राजाच्या भीतिमुळें उजाडण्यापूर्वीच आह्मां तिघींनाही चंद्रनगरामध्यें सोडून देऊन आपण कोणीकडे तरी निघून जावें असें हिंमतरावांच्या मनांत होतें. हा अभिप्राय त्यांकडून समजल्यावर मी त्यांस अभय वचन दिलें. त्यांनीं केलेले उपकार आपल्या कानावर घातले ह्मणजे त्यांच्या मुक्ततेबद्दल राजाकडे तुह्मी रदबदली कराल अशी माझी खात्री होती. हिंमतरावांसही माझ्या सांगण्यावरून थोडा धीर दिसूं लागला.

याप्रमाणें गोष्टी बोलत आह्मीं मार्ग क्रमित असतां अकस्मांत त्या दुष्टाच्या हातीं सांपडलों, हें आपणालां पूर्वीं सांगितलेंच आहे.

सुमं०— प्रिये, ही तुझी कथा ऐकून अंगावर कांटा उभार होतो. तुला किती तरी संकटें भोगावीं लागलीं! ह्याबद्दल मला फार दुःख वाटतें. अस्तु. अगे इकडे पहा सगुणीला बोलतां बोलतां मघांच झोंप लागली वाटतें. तिच्या बाल स्वभावा प्रमाणें सारा दिवस इकडून तिकडे तिकडून इकडे कांहीं तरी तिचें उपद्व्याप चाललेले असतात याप्रमाणें आमच्या गोष्टी ऐकण्याविषयीं तिला उत्कंठा असतांही ती केव्हांच निजली. तूं ही नीज, मी जातो. असें ह्मणून सुमंतराव आपल्या महालांत निघून गेला.

पुढें एके दिवशीं राजा सभे मध्यें एका खटल्याबद्दल विचार करीत बसला असतां कृष्णराय दरवाजावर आला असून तो आंत येण्याची परवानगी मागत आहे, असें राजास भालदारानें येऊन कळविलें, तेव्हां राजा अगदीं विस्मय पावल्यासारखा झाला. सुमंतरावानें सांगितल्या प्रमाणें जर कृष्णराय अपराधि आहेतर तो याठिकाणीं निःशंक येईल, अशी त्याची खात्री होईना. तेव्हां खरा प्रकार काय असावा. हाच तो विचार करूं लागला. पण त्याचा कांहींच तर्क चालेना. शेवटीं त्यांस आंत आण असें राजानें भालदारास सांगितलें. त्याप्रमाणें तो आल्यावर त्यास राजा ह्मणाला" कृष्णराय आज इकडे कोणीकडे आपण? कृष्णरायानें आपला एक अर्ज आहे, असें सांगून खिशांतून काढून पुढें ठेविला

ती उघडून राजा वाचून पाहूं लागला, त्यांतील मजकूर येणें प्रमाणें होता.

कांहीं दिवसांपूर्वी देव गांवांमध्यें एका ह्मातारीच्या घरीं रत्नमाला या नांवाची एक स्त्री येऊन राहिलेली होती. तिनें आपल्याशीं माझें लग्न लागावें असा ह्मातारीच्याद्वारें मला आपला निश्चय कळविला. ती गोष्ट संमत होऊन मी तिच्याशीं लग्न लाविलें; पण लग्नानंतर ती कांहीं दिवस माझे घरीं राहून त्याच ह्मातारी बरोबर कोणीकडे पळून गेली. पुढें शोधा अंतीं ती चंद्र नगरांत मणिदत्त शेटीच्या घरीं आहे असें समजलें. तेव्हां सरकारांनीं मेहरबानी करून तिला माझ्या स्वाधीन करावी, असें माझें ह्मणणें आहे.,,

ह्या अर्ज वाचून पहातांच राजा अगदीं चकित झाल्यासारखा झाला. रत्नमालेच्या येण्यानें जो त्यास एका प्रकारें आनंद झाला होता, तो एकदम नाहींसा होऊन त्याची मुद्रा अगदीं चिंताग्रस्त दिसूं लागली. हा प्रकार सभेच्या लक्षांत येऊन कृष्णरायाचा त्यांस अतिशय राग येऊन चुकला. महाराजांचें चित्त उद्विग्न करणारा असा ह्या अर्जांत मजकूर तरी काय असावा, ह्याबद्दल ते विचार करूं लागले. राजानें फिरून अर्ज वाचून पाहून कृष्णरायास विचारीलें, " तुह्मी ह्मणतां ही गोष्ट खरी असल्याबद्दल तुमचे कोणी साक्ष आहेत काय? ,, कृष्णराय ह्मणाला,

कृष्ण०— आहेत. ही गोष्ट पुष्कळांस ठाऊक आहे.

राजा०— त्यांतून पांच चार सचोटीचे आणि वजनदार अशा गृहस्थांचीं नावें सांगा पाहूं!

कृष्ण०— आनंदनगर येथील प्रसिद्ध साधू आनंदस्वामी, हे त्या लग्न समारंभामध्यें होते. याशिवाय अण्णाशास्त्री, आमचे उपाध्ये बुवा; श्रीपादभटजी, —

राजा०— पुरेत आणखी कारण लागल्यास पुढें तुह्मांस कळविण्यांत येईल. तुह्मीं आतां जीं दोन तीन नावें घेतलींत हे उद्यांच इकडे येऊन दाखल व्हावेत, अशी कांहीं तजवीज आहे काय?

कृष्ण०— महाराजांची आज्ञा होईल तर उद्यांच त्यास याठिकाणीं

आणून हजर करीन.

राजा०— बरें आहे तर उद्यांच तुमच्या अर्जाबद्दल चौकशी कर ण्यांत येईल.

याप्रमाणें राजाज्ञा झाल्यावर कृष्णराय तेथून निघून गेला. स्वामी खेरीज ज्यांचीं राजाजवळ त्यानें नावें सांगितलींहोतीं ते दोन तीन व दुसरे पांच चार साक्षी त्यानें देवगांवाहून येतेवेळींच आपल्या बरोबर आणिले होते. तेव्हां आनंद स्वामीकडे मात्र त्यानें तातडतो ब मनुष्य पाठविला.

कृष्णराय निघून गेल्यावर सभेंतील मुख्य मुख्य सरदार लोकांनीं हें काय प्रकरण आहे, हें कळविण्या विषयीं राजास आग्रह केला. तेव्हां अर्जांतील मजकूर कळवून राजा ह्मणाला, ह्यांतील तथ्य काय आहे हें समजत नाहीं. कृष्णरायाच्या सांगण्यावरून ही गोष्ट खरी असावी असें दिसतें आनंदस्वामीची साक्ष अगदीं महत्वाची समजली पाहिजे. स्वामीबद्दल जरी मला फारसा अनुभव नाहीं तरी ते महान साधू आहेत; अशी त्यांची किर्ति पुष्कळांच्या तोंडून ऐकिली आहे. तेव्हां ही गोष्ट बहुधा खोटी असावी असें दिसत नाहीं. स्त्रियांचें चरित्र अगम्य आहे असें जें ह्मटलें आहे तें खरें आहे. रत्नमाला सुशील मुलगी असावी, अशी आजपर्यंत आमची समजूत होती. आतां ही वार्ता जेव्हां सुमंतरावास समजेल, तेव्हां तो आपला प्राण ही ठेवणार नाहीं असें वाटतें. वीरबाहू ह्मणला, " महाराज, आपण रत्नमाले विषयीं एव्हांच संशय घेऊं नये. आपलें मन कांहींसें भोळसर आहे; ह्मणून कृष्णराय, आनंदस्वामी इत्यादिकांवर महाराजांचा विश्वास आहे. याप्रमाणे संभाषण चाललें होतें. इतक्यांत सुमंतराव सभेमध्यें येताहेत असें त्यांच्या दृष्टीस पडलें; तेव्हां त्यांनीं आपलें बोलणें बंद केलें. सुमंतराव आल्यावर त्यानें नित्याप्रमाणें लवून महाराजांस मुजरा केला; आणि आपल्या आसनावर जाऊन बसला; तेव्हां सर्व सभा कांहीं तरी चिंतेंत असावी असें त्यानें अनुमान केलें. आपण येण्यांबरोबर बोलणें बंद करून जेव्हां ही मंडळी तटस्थ राहिली आहे, तेव्हां चिंतेचें कारण आपणा ब

द्दलच कांहीं तरी असावें; असें त्यास वाटलें. कांहींवेळ निघून गेला तरी एकही शब्द न बोलता सर्व खालीं माना घालून बसले आहेत, असें पाहून सुमंतराव ह्मणाला, " सर्वांच्या काळजीचें कारण मीच आहें असें वाटतें. तर आतां उगीच उशीर न लावितां काय प्रकार आहे तो मला कळवावा. माझें हृदय इंद्राच्या वज्रापेक्षांही कठीण होऊन त्यावर जितके घाय बसती ल, तितके सोसण्यास योग्य झालेलें आहे. तेव्हां आतां सांगण्यास विलंब नको. ऐकूंदेच काय तें एकदां मला.,, यावर वीरबाहु ह्मणाला " महाराज ह्यांत कांहीं विशेष आहे असा अर्थ नाहीं. त्यांतून आज नाहीं तर उद्यां तरी ही गोष्ट दिवाणजीस समजावणें भाग आहे. तेव्हां महाराजांनीं सांगण्यास आतां अगदीं अनमान करूं नये.,, याप्रमाणें वीरबाहूचें अनुमोदन पडल्यावर राजानें कृष्णरायाचा अर्ज सुमंत रावाच्या हातीं दिला. तो वाचून पाहून सुमंतराव राजास ह्मणाला, "महाराज, ह्यांत कांहीं इतकें काळजी करण्याचें कारण नाहीं. रत्नमाला, हिंमतराव, मालती, व रुक्मि, ही चौघेंही कृष्णरायाच्या कैदेंत होतीं, हें महाराजांस ठाऊक आहेच. रत्नमालेचे जे त्यानें अनेक प्रकारें हाल केले, त्याबद्दल महाराजांकडून त्यास शासन न मिळतां रत्नमालेची प्राप्ती व्हावी एतदर्थ हा कृष्णरायाचा यत्न आहे, पण चौकशी अंतीं ही गोष्ट कधींही खरी ठरणार नाहीं.असा मला पक्का भरंवसा आहे. याप्रमाणें सुमंत रावाचें धैर्ययुक्त भाषण ऐकतांच मणिपालादिकांस थोडासा धीर आला. नंतर कांहींवेळ संभाषण होऊन सभा विसर्जन झाली.

इकडे रत्नमाला, मणिदत्ताच्या माडीवर एक सुंदर आरसे महाल तयार केला होता, त्यांतून वाड्यानजीक असलेल्या बागेचा देखावा खिडकींतून पहात बसली होती. इतक्यांत जिन्यावर पावलें वाजलेलीं तिला ऐकूं आलीं; तेव्हां ती तिकडे पाहूं लागली, तों सगुणा आंत आली. ह्या वेळीं सगुणीचें मन व्यग्र होऊन गेलेलें होतें. चेहरा अगदीं उदास दिसत होता. अशी तिची स्थिती पाहून रत्नमाला ह्मणाली, " तूं अशी उदास कां बरें?,, सगुणी डोळ्यांत आसवें आणून ह्मणाली, " वहिनी, तु

ला कांहीं शोक कारक हकिगत सांगण्याचें माझ्या दैवीं आलें आहे.,, हे तिचे शद्ब ऐकतांच रत्नमालेच्या तोंडचें पाणी पळालें. ती ह्मणाली," काय असेल तें सांग? मग तें कांहींही असो. ऐकण्या बरोबर जरी माझा प्राण जाण्याजोगा असेल तरीही आतां विलंब लावूं नको; सांग एकदां बरें.,, सगुणी ह्मणाली" देव गांवां मध्यें कृष्णरायाच्या तिकडे जे स्वार पाठविले होते, ते विन्मुख पुन्हां मागें आले. हिंमतराव वगैरे कोणीच मंडळी तिकडे नाहीं.,,

रत्न०— काय ह्मणतां सगुणा बाई! हिंमतराव वगैरे मंडळी त्याठिकाणीं नाहीं? तर मग मी आपली मुक्तता करून घेतली; आणि त्यांबद्दल निष्काळजी राहिल्यें; असें नाहीं झालें. हिंमतरावजींनीं जे मजवर उपकार केले, त्या उपकाराची फेडही माझ्या हातून झाली नाहीं. त्यांना मीं जें वचन दिलें कीं मी तुमची मुक्तता करीन ह्मणून; तें व्यर्थ गेलेंना? त्यांची काय बरें वाट झाली असावी? ज्यांनीं मजबरोबर सुख दुःखानें दिवस काढिले. व मला काळाच्या हातून सोडविलें. त्यांची मी कांहींच काळजी घेतली नाहीं, असें नाहीं का आतां ठरणार? हायहाय! त्यांची काय बरें व्यवस्था झाली असावी! बरें सगुणा बाई, कृष्णरायाला तरी त्यांनीं पकडून आणिलें काय?

सगु०— त्याला कसचें पकडून आणतात. तो चंद्रनगरांत राजाकडे अर्ज करण्या करितां पूर्वींच आला आहे, असें समजतें.

रत्न०— काय ह्मणतां? राजाकडे अर्ज; आणि तो कोणत्या प्रकारचा?

सगु०— हें बाई त्यापेक्षांही दुःख कारक वर्तमान आहे तूं त्याच्या बरोबर लग्न लाविलेलें असून तूं त्याला सोडून इकडे निघून आलीस, तुला आपल्या स्वाधीन करून द्यावें, असा त्यांत मजकूर आहे.

रत्न०— बरें, यावर महाराजांचें काय ह्मणणें आहे?

सगु०— उद्यां चौकशी सुरू करणार, असें ह्मणतात. ह्या कामांत आनंदस्वामी व दुसरे कांहीं साक्षीदार आहेत.

रत्न०— हाय हायरे दैवा! तूं विपरीत झालेंस ह्मणजे संकटावर

संकटें उपस्थित होऊन त्याखालीं मनुष्य हावलदिल होऊन चुकतो! आनंदस्वामी देखील मजवर खोटी साक्ष देण्याला तयार आहेत ना? छेः ! पण ही गोष्ट कशी बरें संभवेल? आकाच्या व दुसऱ्या कित्येकांच्या तोंडून ते महान साधू आहेत, असें मी ऐकिलें आहे. ते जर खोटें बोलतील तर जगांत मुळींच सत्य राहिलें नाहीं, असें नाहीं का होणार? मग सर्व जग हें दुष्ट नष्ट आणि चांडाळ आहे, असें ह्मटलें पाहिजे? परमेश्वराची भीति कोणीच का मानीत नाहीं? मग हें जग चाललें आहे तरी कसें?

सगु०— वहिनी, आतां तूं दुःख किती करीत राहशील? ईश्वर खरें खोटें सर्व पहात आहे. त्याच्या कृपेनें सर्व संकट निवारण होईल !

इतक्यांत सगुणा बाईला हांक मारीत एक दासी वर आली व तिनें आईसाहेब तुह्मांला बोलावित आहेत; असें सांगितलें. तिला येत्यें असें सांगून पुन्हां सगुणा ह्मणाली, "वहिनी, दादा आल्यावर त्याबद्दल सर्व तजवीज करितां येईल. आई हाक मारते आहे. तिकडे जाऊन मी लौकरच येत्यें.

इतकें सांगून सगुणा निघून गेली, पण रत्नमालेचा शोक कांहीं केल्या कमी होईना! स्वामीची साक्ष पडल्यावर आपणांला कृष्णरायाच्या खचित स्वाधीन व्हावें लागेल असें तिला वाटलें. प्राण प्रियांना, जर करितां ही गोष्ट समजेल, तर त्यांची काय स्थिती होईल! मी व्यभिचारिणी आहें, अशी जर का त्यांची खात्री झाली, तर ते माझा खरोखर अंगिकार करणार नाहींत! तेव्हां आतां आपण विष खाऊन मरावें, हें फार बरें, असा तिनें मनाचा धडा केला. आणि एक दासी बरोबर घेऊन रोजच्या प्रमाणें देवीच्या दर्शना करितां निघाली. देवळांत जाऊन पोहोंचल्यावर प्रदक्षणा व नमस्कार घालून देवीस हात जोडून ह्मणाली, "जगदंबिके, तूं सर्व साक्षी अहेस. माझें वांकडें पाऊल पडलें नाहीं; हें ह्मणजे मी सांगितलें पाहिजे असें नाहीं. तरी माझ्या दुर्दैवामुळें व तुझ्या क्षोभामुळे जो हा प्रसंग आला आहे. तो टाळण्या करितां विष खाऊन मरावें, अशी मीं

तजवीज केली आहे, पुढील जन्मीं तरी मला इच्छिलेला पती मिळावा असें माझें तुझ्याजवळ मागणें आहे.,,याप्रमाणें विनंती करून पुन्हां तिनें देवीस नमस्कार केला; व सभामंडपांत येऊन त्याठिकाणीं दासीस उभी करून देवळाजवळच एक औषधी जिनसाचें दुकान होतें, त्याठिकाणीं गेली. ही स्त्री कोण हें त्या दुकानदारास पक्कें ठाऊक होतें; तेव्हां तो हिला पहातांच अतिशय विस्मय पावून ह्मणाला, " बाईसाहेब, काय पाहिजे आहे? ,, रत्नमाला ह्मणाली, "ही एक मोहोर घ्या, आणि मला विषाची पुडी चट्कन काढून द्या कशी? हें ऐकतांच दुकानदार अगदीं बोटाळल्यासारखा झाला. बायका ह्या फार अविचारी असतात; तेव्हां ही आपणाकरितांच मागत नसेल कशावरून? असें त्यास वाटलें. तेव्हां आपल्यायेथें तें मुळींच मिळत नाहीं असें सांगण्याचा त्यानें निश्चय केला; पण पुन्हां आपल्याशींच ह्मणाला, " जर हिला मी नाहीं ह्मणेन तर ही दुसऱ्या एखाद्या दुकानांतून विकत घेऊन खाणार नाहीं असें कशावरून समजावें? तेव्हां हिला विषा ऐवजीं दुसरा कांहीं पदार्थ देऊन तूर्त ही वेळ मारून न्यावी. मग पुढें कदाचित हिचा बेत फिरेल. नाहींच फिरला तर तिचें दैवच समजावयाचें. याप्रसंगीं ही मोहोर ठेवून घ्यावी. दुसऱ्या वेळीं हिची केव्हां तरी परत देतां येईल. याप्रमाणें निश्चय करून त्यानें दुसरीच एक कसची चार चिमट्या पूड काढून, एक पुडी करून तिच्या हातीं दिली. ती घेऊन रत्नमाला पुन्हां देवळांत जाऊन दासीबरोबर घरीं निघून गेली.

आतां रत्नमालेला विष खावें किंवा न खावें हाच मोठा विचार पडला. जीव हा सर्वांस मोठा प्यारा आहे. त्यापेक्षां प्रिय अशी दुसरी वस्तू जगांत कोणतीच नाहीं. ह्याचीं उदाहरणें शेंकडो आहेत. मनुष्य किती जरी जिवास कंटाळला असला. तरी त्याची आशा ह्मणून सुटत नाहीं. रत्नमालेच्या हातांत विषाची पुडी येण्याबरोबर जो तिला पूर्वी आनंद झाला होता, तो आतां अगदीं नाहींसा झाला. ती ह्मणाली, स्वामी सारख्याची साक्ष पडल्यास तत्काल त्याच्या स्वाधीन मला करितील. यांत संशय नाहीं. पण तसा प्रसंग पडल्यास ही पुडी जवळ

बाळगावी ह्मणजे झालें. तोंपर्यंत ह्या वस्तूचा उपयोग करणें कांहीं ठीक नाहीं. स्वामी अगदीं खोटी साक्ष देतील, हा निश्चय करावा. बरें, त्यांनें दिलीच तर ती खोटीच ठरण्याविषयीं परमेश्वराची कृपा झाली, तर काय उशीर आहे; तो दिनाचा साहकारी आहे, तेव्हां त्याच्यावर भरंवसा ठेऊन स्वस्थ बसावें हें बरें, असा निश्चय करून ती स्वस्थ राहिली. रात्रीं जेवणखाण आटपल्यावर सुमंतराव निश्चःशा तीच्या भेटी करितां महालांत जात असे. पण आपणास पहातांच कृष्णरायाच्या अर्जाबद्दल विचार तिच्या मनांत येऊन ती फार शोक करील, ह्याकरितां आज तिच्या महालांत जाऊं नये असा त्यानें बेत केला.

इकडे नित्याप्रमाणें रत्नमाला सुमंतरावाची वाट पहात राहिली होती. पण फार वेळ झाला तरी देखील तो येत नाहीं. असें पाहून तिचें मन फिरून उदास झालें. कदाचित आपल्याबद्दल आपल्या प्रियकराला खाचीत संशय लागला असावा, अशी तिची खात्री झाली. तेव्हां ती नेत्रांतून अश्रू गाळून विलाप करूं लागली.

शेवटीं विष खाऊन मरून जाणें ठीक आहे, असें वाटून तिनें विषाची पुडी हातीं घेतली; आणि तिच्याकडे पाहून ह्मणाली, "ह्या अनिश्वर मृत्यूलोकांमध्यें सुखानें दिवस जावे. अशी जी आजपर्यंत मला आशा होती ती आतां अगदीं नाहींशी झाली. यासाठीं परलोकास जाण्याकरितां तूं मला साह्य हो. आतां मी जिवंत राहिल्यें तर माझ्या विपत्तीला पार नाहींसा होणार आहे. याठिकाणीं मला साह्य करणारें कोणीच नाहीं. हे विषा, सर्वजण तुला पाहून भितात; तुला पाहून सर्वांचें हृदय चरकतें, यासाठीं तुझी आठवण देखील कोणाला नको आहे, पण आतां तूं माझें केवढें बरें हित करणार आहेस. दुष्ट लोकांचे चित्तामध्यें जें ईश्वरानें विष भरून ठेविलें आहे, त्या योगें मनुष्याला जेवढ्या वेदना भोगाव्या लागतात; त्यांचा शंभरावा हिस्साही तुझ्यामुळें भोगावा लागत नाहीं. दुष्टांचें अंतःकरण हें विषरूपच आहे. तें मनुष्यांला एकदम न मारितां वारंवार पीडा करितें. आणि तुझ्यापासून फार अल्प वेळ पिडा भोगावी लागते; तेव्हां तुझें स

वन कार बरें. असें ह्मणून तिनें शेवटीं ती विषाची पुड परमेश्वराचें स्मर ण करून तोंडांत टाकिली, आणि मरणाची वाट पहात बिछान्यावर प डून राहिली. घटका, दोन घटका, चार घटका गेल्या तरी तिला मरण येईना! तेव्हां ती ह्मणूं लागली, हें आहे तरी काय? ह्याचा गुण कि ती वेळानें येणार? हें प्रहर दोन प्रहरांनीं प्राण घेणारें आहे असें वाटतें दुकान दारास तरी विचारिलें पाहिजे होतें. पैसा दोन पैसे दिले, ह्मणजे जें विष मिळतें त्यानेंही चटकन् प्राण जातो असें सांगतात; पण मी एक मो होर दिली असूनही त्यानें एखादें जालीम विष मला दिलें नाहीं; हा केव ढा चमत्कार आहे बरें! कित्येक दुकानदार लोक ठकबाजी करितात, हें प्र सिध्द आहे; पण जी जिवास कंटाळून मरणास तयार झालेली, तिच्या ज वळ देखील हे लोक लबाडी करितात; तेव्हां आतां ह्यांना ह्मणावें तरी काय ? मनुष्याची सोडा, पण परमेश्वराची देखील भीति जगांत कोणा लाच का वाटत नाहीं ! किंवा पुण्य आणि पाप ह्यांला कोणीच का मान देत नाहींत !! सर्व लोक लबाड आणि ठग आहेत ! असेंच का ह्मणाव याचें. सर्वांनीच सत्य सोडलें तर.—आणि कदाचित् वस्तुमात्रांनींही आ पलें सत्य सोडिलें नाहीं, असें कशावरून ह्मणावें ? ह्या विषानेंही आ पलें सत्य सोडलें असावें. ह्यानें आपल्या आंगचा गुण टाकून दिला. ह्याप्रमाणें विचार चालले असतां कांहीं वेळानें तिला झोंप लागली. दु सरे दिवशीं सकाळीं जागी झाल्यावर दुकानदारानें कपट केलें असावें अ सें तिच्या मनांत येऊन चुकलें. त्यानें विष ह्मणून दुसरीच कांहीं वस्तू आपणास देऊन ठकविलें अशी तिची खात्री झाली.

इकडे कृष्णरायाचा निरोप पोंचून आनंदस्वामी चंद्रनगरांत येण्याकरि तां निघाले. त्यांच्या स्वारीचा थाट एखाद्या राजाप्रमाणें दिसत होता. ते पालखींत बसलेले असून रुप्याच्या व सोन्याच्या दांडीनें त्यावर भक्त चवऱ्या वारीत होते, भालदार पुढें ललकारीत होते. शिंगें, हलकारे, नौब दी, डंका वगैरे वाद्यें वाजत होतीं. कितिएक लोक तालमृदंगादि वाद्यें वाजवून भजन करीत चालले होते. नक्षत्रांमध्यें जसा चंद्रमा शोभतो, त

से त्या भक्तमंडळामध्यें आनंदस्वामी शोभत होते. याप्रमाणें स्वामीची स्वारी मोठ्या थाटानें चंद्रनगरांत येऊन पोहोंचली. आज राजवाड्यांत कृष्णरायाच्या फिर्यादीची चौकशी होणार असून त्यांत स्वामीची साक्ष आहे, ही बातमी सर्वत्र पसरल्यामुळें ती मौज पहाण्याकरितां हजारों लोक कचेरीमध्यें जमले. मागाहून मोठमोठे अधिकारी मानकरी वगैरे लोक आपापल्या आसनावर जाऊन बसले. रत्नमालेला राजाकडून बोलावणें झालें असल्यामुळें तीही अनेक स्त्रियांसह कचेरीमध्यें हजर होऊन बायकांस बसण्याकरितां एक निराळी जागा होती, त्यांत जाऊन बसली. कांहीं वेळानें लवाजम्यासह मणिपाल राजाही येऊन पोहोंचला. तेव्हां सर्व लोक उठून उभे राहिले. नंतर सर्वांचे मुजरे घेऊन राजा सिंहासनारुढ झाला.

याप्रमाणें दरबार भरून कांहीं वेळ झाल्यावर राजानें कृष्णरायास हाक मारून त्याची जबानी लिहून घेतली ती येणें प्रमाणें.—

" मी परमेश्वरास स्मरून सांगतों कीं, देवगांवांतील माझ्या बागेमध्यें गेल्या मार्गशीर्ष शुद्ध सप्तमीच्या दिवशीं रत्नमाले बरोबर माझें लग्न झालें. नंतर आठचार दिवस ती त्याठिकाणीं असून नंतर एका म्हातारीच्या साह्यानें देवगावांहून फरारी झाली ,, यावर राजा म्हणाला, ज्या म्हातारीच्या साह्यानें ती पळून गेली असें म्हणतां, ती म्हातारी सध्या याठिकाणी आहे. तेव्हां तुमच्या लग्नाबद्दल तिला माहीती आहे काय?

कृष्ण०— आहे; पण ती इकडे पळून आलेली असल्यामुळें आतां खरें सांगेल, अशी आम्हांस तिची खात्री नाहीं. याकरितां आतां तिची साक्ष अगदीं निरुपयोगी आहे. नंतर राजानें स्वामिची जबानी घेतली ती येणेंप्रमाणें.—

मी श्रीस स्मरून सांगतों कीं, गेल्या मार्ग शिर्ष शुद्ध सप्तमीच्या दिवशीं कृष्णरायाच्या आमंत्रणावरून आमची स्वारी लग्न समारंभा करितां देव गांवांस गेली होती. ज्येष्ट शुद्ध सप्तमीच्या दिवशीं कृष्णराय व रत्नमाला यांचें लग्न बागेमध्यें लागलेलें आपण पाहिलें आहे, ह्य

प्रमाणें जबानी झाल्यावर राजा, सुमंतराव, मणिदत्त शेट वगैरे लोकांचीं तोंडें अगदीं खरकन् उतरल्या सारखीं झालीं. सुमंतरावाच्या मनांत पुढें कांहीं बोलावयाचें होतें पण तो राजाच्या सांगण्याची वाट पाहूं लागला. इकडे स्वामीचे शद्ब रत्नमालेच्या हृदयास सर्प दंशाप्र माणें लागले. आणि ती तत्काल बेशुद्ध होऊन जमीनीवर पडली. ते व्हां लिलावती, सगुणा व रत्नमालेच्या दुसऱ्या मैत्रिणी तिला सावध करूं लागल्या. त्यांनीं तिच्या डोळ्यांला पाणी लाविलें, आणि पंख्यानें वारा घालूं लागल्या; तेव्हां ती शुद्धीवर येऊन उठून बसली.

हा प्रकार चालला होता इतक्यांत वाड्याबाहेर कांहीं घोडे स्वारांची टोळी येऊन पोंचली. तेव्हां सर्व लोकांचें लक्ष तिकडे लागलें. इतक्यां त त्या घोडे स्वारांपैकीं एक मुख्य होता, तो उतरून कचेरी मध्यें आला; आ णि राजास मुजरा करून ह्मणाला, "महाराज, बंडवाल्यां पैकीं हिंमतरा व व त्याचे दुसरे दोन सगे अशा तिघांस पकडून आणिलें आहे. आज्ञा अ सेल तर आतांच आंत घेऊन येतों. हे शद्ब ऐकतांच राजास फार आनंद झाला; आणि त्यानें त्यांस आंत आणण्या विषयीं त्या घोडे स्वारांस हुकू म केला. हिंमतरावाचें नांव ऐकण्या बरोबर कृष्णराय आणि स्वामी यां चीं तोंडें खरकन् उतरलीं. तेअगदीं भयाभित होऊन गेले. अशी त्यांची स्थिती पहातांच सर्व सभा अगदीं आश्चर्य चकित झाली. इतक्यांत त्या घोडे स्वारांनीं त्या तिघांही अपराध्यांस राजापुढें आणून उभे केले. ते व्हां राजानें त्या तिघांस बसण्याविषयीं सांगितलें.

हिंमतराव फाशीं जाण्यास योग्य असा अपराधी असून त्याचा महा राज सत्कार करितात; हें पाहून सर्व सभा विस्मय पावली. हिंमतरा वास पहातांच स्वामी व कृष्णराय हे एकमेकांच्या तोंडाकडे पहात राहिले. राजानें दाखविलेल्या आसनावर हिंमतराव बसल्या नंतर रा जानें कृष्णरायाच्या अर्जा बद्दल सर्व मजकूर हिंमतरावास कळवू न शेवटीं ह्मणाला, "या प्रकरणांत तुह्मांला कांहीं माहिती आहे काय?,, हिंमतराव ह्मणाला, "महाराज, रत्नमाले सारखी सुशील स्त्री ह्या ज

गांत एकही सांपडणार नाहीं. त्या बिचारीचे ( कृष्णरायाकडे बोट करून ) ह्या अधमानें हाल हाल केले आहेत. शेवटीं ती एका ह्यातारीच्या कृपेनें ह्याच्या बंधांतून मोकळी झाली. ( स्वामीकडे बोट करून ) हा गृहस्थ अगदीं चांडाळ आहे. महाराजांवर जें मागें बंड उपस्थित झालें होतें, तें होण्यास मूळ कारण बहुतेकांशीं हीच स्वारी होय. ह्या माझ्या सांगण्याबद्दल महाराजांस संशय येईल, तर दुसऱ्यावेळीं एकांतीं तो सर्व प्रकार उघड करून सांगेन साधूचें सोंग घेऊन जो दुसऱ्यास ठकवितो, त्यासारखा दुष्ट कोणी नाहीं; असें थोरांचें ह्मणणें आहे, तें अगदीं यथार्थ आहे. महाराज, हा गृहस्थ पक्का ठग आहे.,, यावर राजा ह्मणाला, " बरें तुह्मी ह्मणतां याला आणखी कांहीं पुरावा सांपडेल?,, हिंमतराव . आपल्या सोबत्यां कडे बोट करून ह्मणाला, " यांस सर्व हकिगत माहीत आहे. आणि देवगांवामध्यें चौकशी केल्यास लग्नाबद्दल सांगणारा एकही मनुष्य मिळणार नाहीं. या गुलामानें बागेमध्यें लग्न लाविलें ह्मणून सांगितलें, याचें कारण तेंच होय. ,, यावर राजा हिंमतरावाच्या सोबत्यांस ह्मणाला, "हिंमतराव सांगतात याप्रमाणें खरी गोष्ट आहे काय? त्या दोघांनींही " खराप्रकार असाच आहे महाराज, ,,असें सांगितलें. यावर कृष्णराय व स्वामी यांस उद्देशून राजा ह्मणाला, " तुमचें काय ह्मणणें आहे यावर? ,, या राजाच्या प्रश्नास उत्तर न मिळतां त्या दोघांनींही खालीं मान घातली. तेव्हां सर्व सभा सदांची व राजाची ह्यांच्या अपराधाबद्दल खात्री झाली. राजानें सेवकांस बिड्या आणावयास सांगून त्या आपल्या डोळ्यां देखत त्यांच्या पायांत ठोकविल्या व त्यांस कारागृहांत पाठवून दिलें आणि कृष्णरायाच्या दुसऱ्या साक्षी दारांस हांकमारा ह्मणून सांगितलें. पण ते सांपडतात कशाला! स्वामीची स्थिति पाहून त्यांनीं पूर्वीच पोबारा केला; असो.

स्वामीस परमेश्वरा समान मानणारे असे त्या सभेंत कितिएक लोक होते. त्यांस आपल्या वेडेपणाबद्दल फार वाईट वाटलें. आणि ही व्यक्ति अति नष्ट आहे, अशी त्यांची खात्री झाली.

व्याघ्राच्या हातून धेनुची सुटका व्हावी त्याप्रमाणें कृष्णरायाच्या हातून रत्नमालेची सुटका झाली. याबद्दल सर्व सभेस पराकाष्ठेचा आनंद झाला. राजा, सुमंत राव, व रत्नमाला वगैरे लोकांस किती आनंद झाला असेल. ह्याची कल्पना वाचकांनींच करावी. आनंद स्वामीच्या आनंद भुवनाचें दुःख भुवन होऊन राजवाडा हेंच ह्यावेळीं आनंद भुवन दिसूं लागलें. हिंमतराव व त्याच्या मित्रांस आपल्या येथेंच भोजनांस रहाण्याविषयीं राजानें कळविलें. याप्रमाणें कृष्णरायाच्या अर्जीचा निकाल होऊन सर्व सभा विसर्जन झाली.

भाग १६ वा

कृष्णरायानें हिंमत रावादिकांस पेटींत घालून पुरून टाकिलें, असें असून हिंमतराव याठिकाणीं पुन्हा जिवंत होऊन आला कसा? हें जाणण्याची वाचकांस अतीशय उत्कंठा लागून गेली असेल; तेव्हां ती हकिकत मी पूर्वी लिहितों.

हिंमतरावादिकांच्या रखवाली करितां कृष्णरायानें जे लोक ठेविले होते, ते फार दयाळू होते. धोतऱ्याच्या बिया चारून ह्यांस जिवंत पुरून टाकणें, हें कर्म निखालस राक्षसी आहे; असें त्यांस वाटूं लागलें. तेव्हां ह्यांतून यांची मुक्तता कोणत्या रीतीनें करितां येईल, याबद्दल ते विचार करूं लागले; पण त्यांस कोणताही विचार सुचेना. पुढें हिंमतरावास त्यांनीं सर्व हकिगत कळविली, आणि ह्मणाले, "आह्मांवर कोणत्याही प्रकारें टपका न येतां तुमचें कोणत्या प्रकारें संरक्षण करितां येईल, ह्याबद्दल एखादी युक्ति लढवून आह्मांस सांगा ,,

हिंम०— आह्मांस जिवदान देण्याचें जर तुह्मीं मनावर घेत असाल तर कोणतीही युक्ति काढणें हें काम फार सोपें आहे. तुमचे आह्मांवर फार उपकार आहेत, ह्याबद्दल फार सांगण्याची जरूर नाहीं. जर कदाचित आह्मी चांगल्या स्थितींत पोहोंचलों, तर तुमचे हे उपकार कधीं फेडल्या वांचून रहाणार नाहीं. तुमच्या धन्याची तुह्मांवर गैरमर्जी न होतां आमची मुक्तता तुह्मांस करितां येईल ती तजवीज अशी.—

अन्नांतून कांही पदार्थ चारला आहे असें तुह्मी धन्यास कळवा. ते आल्यानंतर आह्मी कांहीं हालचाल न करितां अगदीं स्वस्थ पडून राहूं. नंतर त्यांच्या सांगण्याप्रमाणें आह्मांस तुह्मी पेटींत घालून पुरून टाका, व ते जातांच पुन्हा पेट्या बाहेर काढून आमची मुक्तता करा; ह्मणजे आह्मी कोठें तरी लांब, तुमच्या धन्यास शोध न लागेल; अशा ठिकाणीं निघून जाऊं. ही गोष्ट कृष्णरायाच्या चाकरांनीं मान्य केली. तेव्हां हिंमतरावास आनंद होऊन त्यानें मालती व रुक्मी ह्यांस ही हकिगत कळविली. तेव्हां त्याही आनंदीत होऊन त्यांनीं ईश्वराचे व त्यांचे आभार मानिले. आणि मालतीजवळ एक बोचकें होतें, त्यांत तिनें आपले सर्व दागिनें ठेविले होते. त्यांतील एक भारी किंमतीचा जडावाचा दागिना काढून तिनें कृष्णरायाच्या चाकरांस दिला. तो पहातांच त्यांचे डोळे अगदीं दिपून गेले. कारण, सगळ्या जन्मांत तेवढा बहुमोल दागिना त्यांच्या दृष्टीस ही पडला नव्हता; असो.

थोड्या वेळानें कृष्णराय येत आहे; असें एका चाकरानें आपल्या सोबत्यास येऊन कळविलें. तेव्हां त्या चाकरांनीं त्या तिघांस खोल्यांत अडकवून अगदीं स्वस्थ रहाण्यास सांगितलें. पुढें कृष्णराय आल्यावर पूर्वी सांगितल्याप्रमाणें व्यवस्था करून तो निघून गेला. इतक्या अवकाशांत देखील तीं माणसें पेटींत गुदमरून मरण पावलीं असतीं. पण पेट्या अर्धवट फुटक्या असून त्यांस कांहीं छिद्रें होतीं. ह्यांस बाहेर काढण्यास अवकाश लागल्यास त्यांना इजा पोंचूं नये ह्मणून त्या चाकरांनीं त्या छिद्रांतून वारा आंत यावा अशा पेट्या पुरल्या होत्या. सूर्यास्त होऊन अंधार पडत चालला होता; यामुळें हें कपट कृष्णरायाच्या लक्षांत येण्याजोगें नव्हतें; अस्तू.

कृष्णराय निघून गेल्यावर त्या चाकरांनीं जलदी करून त्यांस बाहेर काढिलें. व त्यांतील एक असामी त्यांच्या बरोबर जाऊन उजाडण्यापूर्वी त्यांस दहा बारा कोश जमीन दूर पोंचवून पुन्हां मागें आला.

याप्रमाणें ह्या त्रिवर्गाची सुटका झाल्यावर दोन प्रहरीं तीं एका लहा

नशा शहरांत जाऊन पोंचलीं. व पुढें जेवणखाण आटपल्यावर जयपाळ राज रत्नपुरास आहेत, तेव्हां तिकडे जाणें अवश्य आहे, असें हिंमतरावा नें मालतीस सांगितलें व ती गोष्ट तिच्या पथ्यावर पडली. पुढें आप णास रत्नपुरापर्यंत निर्भयपणें कसें जातां येईल, याबद्दल त्यांनीं विचार चालविला. तेव्हां हिंमतराव ह्मणाला, " येथून रत्नपूर पंचवीस तीस कोश लांब आहे. तेव्हां चाललों आह्मीं अशा रीतीनें त्याठिकाणीं सुरक्षि त पोंचतां येणार नाहीं. कारण, चंद्रनगराहून आमच्या शोधाकरितां चहूं कडे लोक रवाना झालेले आहेत. तेव्हां तुह्मी हा बायकांचा वेष टाकून पुरुषांचा वेष घ्यावा. व तिघांकरितां तीन घोडे खरेदी करावे ह्मणजे रा तबेरात त्वरित रत्नपुरास जातां येईल ,, ही गोष्ट सर्वांस पसंत पडून त्याप्रमाणें निश्चय ठरल्यावर मालतीनें आपल्या जवळचे दोन अडीच ह जार किंमतीचे दोन दागिनें हिंमतरावाजवळ मोडावयास दिले, आणि त्याचे तीन घोडे व तीन पोषाख व दुसरें कांहीं जरूरीचें सामान त्यास आणावयास सांगितलें. पुढें संध्याकाळपर्यंत हिंमतरावानें सर्व जिनसांची खरेदी केली. व रात्रीं जेवणखाण आटपून घोड्यावर स्वार होऊन तीं सर्व माणसें तेथून निघालीं. त्यादिवशीं रात्रीं आठ कोश मजल मारून तीं एके ठिकाणीं वस्तीस राहिलीं. व तेथून दुसरे दिवशीं प्रातः काळीं फिरून निघालीं. याप्रमाणें चालत असतां चार घटके दिवसाच्या सुमारास त्यांस मागें कांहीं गलबला ऐकूं आला. ह्मणून मागें पहातात तों शेंपन्नास घोडेस्वार आपल्याकडे येत आहेत; अ सें त्यांच्या दृष्टीस पडलें. तेव्हां त्यांची भयानें अगदीं गाळण झाली. व तीं इकडे तिकडे पाहूं लागलीं. तोंच हिंमतरावानें आपलें स्वरूप त्या घो डेस्वारांच्या लक्षांत येऊं नये. ह्मणून घोड्यावर टांच मारून घोडे उडवि ण्याविषयीं मालती व रुक्मी यांस खुण केली. त्याबरोबर त्या तिघांनींही भरधांव घोडे सोडले. हा प्रकार मागें असलेल्या घोडेस्वारांनी पहातांच ह्यांत काहीं तरी काळें बेरें आहे, असें त्यांस वाटलें. आणि त्यांणीं आ पले घोडे भरधांव सोडून त्यातिघांसही गांठिलें. तेव्हां त्यांनीं हिंमतरावास

ओळखून त्या सर्वांस ते आपल्या धन्याकडे घेऊन गेले. हा धनी चंद्रनगर च्या राजाचा एक सरदार असून आजला शिकार करण्या करितां निघा ला होता. तो आपल्या घोडेस्वारांस ह्मणाला, " गड्यांनो, त्या शिकारी पे क्षां ही शिकार आज बरी साधली. या हिंमतरावानें पूर्वी अधिकारावर अ सतां, आह्मांस बराच त्रास दिला आहे. आज तें उसनें फेडून घेण्याची ई श्वरानें संधी आणिली आहे. तेव्हां आतां ह्या तिघांसही कैद करून पुन्हां मागें फिरा. याप्रमाणें आज्ञा होतांच त्यांस कैद करून ते चंद्रनगराकडे फि रले. पुढें कृष्णरायाच्या अर्जाची चौकशी होत असतां हे तिघे अपराधी त्या लोकांनीं राजापुढें नेऊन उभे केले हें मागें आलेंच आहे.

एके दिवशीं सूर्यास्त होऊन सुमारें चार घटका रात्र झाली आहे. कि ती एक व्यापारी लोक आपापलीं दुकानें बंद करून घरीं जात आहेत. कित्येक दुकानें बंद करीत आहेत .कित्येक सरकारी नोकर लोक सारा दिवस श्रमून गेल्यामुळें घरांत येऊन वाऱ्यावर पडलेले आहेत. कि त्येक लोक जेवणा खाणाच्या गडबडींत आहेत. अशावेळीं आग लाग ली, आग लागली, धांवा, धांवा, असे शब्द सुमंत रावाच्या कानीं आ ले. ह्मणून तो पुढें रस्त्यांत येऊन पाहूं लागला, तों कित्येक लोक पळत आहेत; असें त्याच्या दृष्टीस पडलें. तेव्हां त्यांतील एकास त्यानें विचारि लें कीं " आग लागली कोठें!,, एकानें "चिटणीसाच्या वाड्यास,, असें धां वतच उत्तर दिलें. नंतर सुमंतराव लगबगीनें पोषाक करून कांहीं लो कांसह राजास ही बातमी कळविण्यासाठीं आणि मदत मागण्यासाठीं रा जवाड्याकडे निघाला. इकडे मणिपाल राजा गच्चीवरून फिरत असतां त्या च्यां दृष्टीस ती आग पडली. तेव्हां कांहीं असामीस वाड्याच्या संरक्ष णार्थ ठेवून बाकी कांहीं शिपाई लोकांसह तो तिकडे जाण्यास निघाला.

राजा खालच्या चौकांत जाऊन पोहोंचतो, तों सुमंतरावही त्याठिका णीं पोहोंचला. मग ते दोघेही मोठ्या त्वरेनें चिटणीसाच्या वाड्याजव ळ गेले; तों त्याठिकाणीं हजारों लोक जमून आगविझविण्याच्या खटप टींत आहेत; असें त्यांच्या दृष्टीस पडलें. इतक्यांत " बंद झालें आहे.

सांभाळा,, हेंच शब्द सर्वांच्या तोंडून निघूं लागले..

अशा समयीं जिकडे तिकडे हाहाकार उडाला! काय झालें हें कोणास कांहींच समजेना. सर्व लोक उघडें सापडेल त्या घरांत शिरून बायकांस मुलांसह दार बंद करून आंत राहिले.

राजा व सुमंतराव हे जागच्या जागीं अगदीं स्तब्ध झाले. खरी बातमी काय आहे. हाच त्यांस मोठा विचार पडला. इतक्यांत सरकार वाड्याकडे बंडवाल्यांनीं खजिना लुटला. अशी वदंता निघाली. तेव्हां हें खाचित बंड आहे, असें ठरवून वाड्याच्या संरक्षणाकरितां सर्व शिपाई लोकांसह राजा व सुमंतराव मागें परतले, आणि खजिन्याकडे आले; पण तिकडे कोणी बंड वाले नसून ही उगीच अफवा उठली, असें त्यांस दिसून आलें. शेवटीं काय होईल तें होवो. सर्वांनीं आपापल्या मनुष्यांचें संरक्षण मात्र करावें. अशी ताकीद करण्याकरितां शिपाई लोकांस राजानें रस्तोरस्तीं पाठविलें, व कांहीं शिपाई राजवाड्याच्या व सुमंतरावाच्या वाड्यांत संरक्षणार्थ पाठवावे. आणि कांहीं शिपाई लोक तटावरच्या दरवाजावर संरक्षणार्थ ठेवावे. अशी राजानें वीरबाहुस सुचना पाठविली, आणि राजा व सुमंतराव आपल्याजागीं निघून गेले.

थोडा वेळ गेला नाहीं तों खरोखरच बंड सुरू झालें. खजिन्यावरच्या लोकांवर हल्ला करून सर्व खजिना बंड वाल्यानीं लुटला व रस्त्यांत जे जे लोक सांपडले, त्यांची त्यांनीं कत्तल केली. त्यांत रात्रीची वेळ असल्यामुळें बंडवाल्यापैकींच कित्येक मरून पडले.

ह्या बंडांतील लोक एकंदर थोडे होते. आणि त्यांत कितीएक मरून गेले. तेव्हां बाकी जे शिल्लक राहिले त्या लोकांनीं आपल्या हातीं जें काय लागलें असेल तें घेऊन पळून जावें, असा बेत केला; पण तटाच्या दरवाजावर कडेकोट बंदोबस्त होता; ह्मणून त्यांस बाहेर जातां आलें नाहीं. बंडवाल्यांची आणि त्या लोकांची दरवाजांत बरीच चकमकी झडली व त्यांत किती एक बंडवाले मरून पडले. तेव्हां जे कांहीं थोडे शिल्लक होते, ते चंद्रनगरांत जिकडे तिकडे लपून राहिले.

प्रातःकाल होतांच सर्व सरदार लोक राजवाड्यांत जमले. आणि राजाचें संमत घेऊन जे परकी मनुष्य सांपडतील त्यांस पकडून आणावे, असा हुकूम करून हजारों लष्करी शिपाई बंडवाल्यांच्या शोधार्थ पाठविले. दिवस उगवून घटका झाली, तरी देखील लोकांच्या मनांतील भीति कमी होईना! ह्मणून त्यांनीं आपापल्या घरांचे दरवाजेही उघडले नाहींत. कितो एकांच्या घरांतील पुरुष मंडळी बाहेर गेली होती; ती पुन्हां घरांत न आल्यामुळें त्यांचा आकांत चालला होता.

चार घटके दिवसाच्या सुमारास शेंकडों बंडवाल्यांस शिपाई लोकांनीं पकडून आणून कारागृहांत ठेविलें. तेव्हां तें कारागृह सर्व भरून जाऊन आंत शिपाई लोकांस उभें रहाण्यास देखील जागा नाहीं सारखी झाली. तेव्हां एक रिकामा वाडा पाहून त्यांत कैदी लोकांस ठेवण्याची त्यांनीं तजवीजकेली.

याप्रमाणें जिकडे तिकडे शांतता झाल्यावर लोकांनीं निर्भय आपआपले उद्योग सुरू करावे, अशाविषयीं राजानें दांडोरा पिटविला. आणि सर्व सरदार लोक आपापल्या घरीं निघून गेले.

संध्याकाळच्या वेळीं बंडवाल्यांची चौकशी करण्याकरितां सर्व सरदार लोक पुन्हा राजवाड्यांत जमून त्यांची सभा झाली. मणिपाल राजाही त्या सभेस आला. कांहीं वेळ विचार होऊन शेवटीं सर्वानुमतें असें ठरलें कीं, प्रारंभीं एका बंडवाल्यास पुढें आणून व त्याला अभय देऊन खरी हकिगत त्याजपासून विचारून घ्यावी; व त्यास सोडून द्यावें. बंडवाल्यांपैकीं जे अधिकारी असतील त्यांस पुढें विशेष चौकशी करण्याकरितां मोठ्या बंदोबस्तानें तूर्त तुरुंगांत ठेवावें. व इतरांस ताबडतोब फांसावर चढवावें. हा ठराव कायम होऊन तुरुंगाजवळ एक सरदाराचा वाडा होता त्यांत सर्व चौकशी करण्याचा निश्चय होऊन सर्व लोक तिकडे निघून गेले.

नियमीत ठिकाणीं सर्व एकत्र जमल्यावर बंडवाल्यांपैकीं एक मनुष्य त्यांनीं पुढें आणविला व त्यास अशी समजूत दिली कीं, जर तूं या प्रकरणाविषयींची खरी हकिगत सांगशील, तर मेहेर नजर होऊन महाराज

तुला गुन्हा माफ करितील; तर असेल ती खरी खरी हकिगत सांग ?

हे शब्द कानीं पडतांच त्या बंडवाल्यास जिवदान मिळाल्याबद्दल संतोष होऊन त्यानें सर्व हकिगत सांगण्याचें कबूल केलें. तो ह्मणाला, " या बंडापैकीं मुख्य अधिकारी रत्नपुराधिपती हेमचंद्र राजे होत. ह्या नगरांतील माजी सेनापती नानासाहेब व महाराजांचे सावत्र बंधु जयपाळ यांणीं हें बंड उपस्थित करण्याविषयीं राजास मसलत दिली.

हेमचंद्र महाराज कांहीं निवडक लोक बरोबर घेऊन काल सायंकाळींच चंद्रनगराजवळ येऊन उतरले. व मागाहून सेनापतींनीं सर्व सैन्यासह आपणास येऊन मिळावें अशी तजवीज ठेविलेली होती. पण सर्व सैन्य घेऊन देखील चंद्रनगराधिपाबरोबर समोर लढाई करितां येणार नाहीं; असा निश्चय करून बरोबरच्या सर्व लोकांसह हेमचंद्र महाराजांनीं गुप्त रीतीनें ह्या नगरामध्यें प्रवेश केला. रात्रीं जी अकस्मात आग लागली, ती याच लोकांनीं लाविली. तसें करण्यांत यांचा हेतु असा होता कीं, त्या गडबडीमध्यें बंदोबस्त कमी राहील; आणि तसें झालें ह्मणजे प्रधान व राजे ह्यांचा सहज रीतीनें घात करितां येईल. पण कालच्या रात्रीं त्या दोन्हीं ठिकाणीं कडक बंदोबस्त असल्यामुळें त्यांचे बेत निष्फळ झाले. तेव्हां पहांटेच्या वेळा पुन्हा मार्गें निघून जाण्याचा बेत करून सर्व लोक निघाले, पण तटावर व दरवाजावरही कडेकोट बंदोबस्त होता; यामुळें बाहेर जाणें घडलें नाहीं. अर्थात सर्व लोक आज पकडले गेले आहेत. ,,

तो मनुष्य ही हकिगत सांगत असतां सर्व आश्चर्य भरीतझाले. शेवटीं मणिपाल राजानें त्यास विचारिलें; " तुमचे महाराज हेमचंद्र, जयपाळ व नानासाहेब हे प्रस्तुत कोणी कडे आहेत.,, तो ह्मणाला, "हे तिघेही पकडले जाऊन निराश होत्सातें तुरंगामध्यें पडले आहेत.,, हें ऐकतांच सर्वांस अतिशय आनंद झाला. आणि पुन्हा कांहींवेळ विचार होऊन सर्वांनुमतें असें ठरलें कीं, ह्या तिघां शिवाय इतर सर्व लोक निरपराधी आहेत. तेव्हां त्यासर्वांस सोडून देऊन ह्यातिघांस मात्र पायांत बिड्या घालून कडेकोट

बंदोबस्तांत ठेवावें. याप्रमाणें ठरल्यावर तें सर्व मंडळ तुरुंगाकडे निघून गेलें. आणि सर्व लोकांस मुक्त करून फक्त त्या तिघांस ओळखून बंदोबस्तांत ठेविलें, आणि आपण बरोबर निघून गेले.

याप्रमाणें बंड होऊन जयपाळ वगैरे अपराधी लोक हातीं लागल्यावर त्यांबद्दल लौकर चौकशी होणें जरूर आहे, असें मानकरी लोकांनीं राजास कळविलें; आणि त्या पूर्वींही कैदेंत असलेल्या स्वामी वगैरे अपराधी लोकांस न्याय मिळावयाचा होता. तेव्हां राजानें लोकांच्या ह्मणण्यास रुकार देऊन अमुक दिवशीं ह्याबद्दल चौकशी करावयाची, असें जाहिरनामें लाविले. त्या सर्व अपराधी लोकांचीं नांवें जाहिरातींत दाखल करून त्यांजवर जर आणखी कोणाच्या फिर्यादी असल्या तर फार जरूर झाल्या पाहिजेत, असें कळविलें होतें. अपराधी लोकांपैकीं अमुक एका वर अपराध लागू होत नाहीं, असें जर कोणास वाटत असेल तर त्यांनींही जरूर अर्ज करावे; अशी जाहिरातींत सूचना होती. पुष्कळ लोकांचा समावेश व्हावा, अशी एक त्या दिवसा करीतां नवीन जागा तयार केलेली होती. चौकशीच्या दिवशीं जिकडे तिकडे लोकांस मोठा उत्साह झाला होता. ह्याखटल्याचा निकाल काय होतो हें पाहण्याकरीतां नियामित दिवशीं पुष्कळ लोकांची दाटी झाली. राजा व दुसरे मोठ मोठे अधिकारी यांच्या बसण्या करीतां जागा निरनिराळ्या तयार केलेल्या होत्या. राजाचें सिंहासन मध्यें मांडिलें होतें. त्याच्या उजव्या व डाव्या हातास रांगेनें सरदार लोक बसले होते. त्यांच्या पाठी मागें जाहागिरदार, सभ्य लोक, सावकार लोक, यांच्या करीतां जागा तयार केलेल्या होत्या. संध्या काळच्या घटके दिवसास दरबार भरण्याचा ठराव होता, पण दोन प्रहर पासूनच आपणाला जागा चांगली मिळावी अशा इच्छेनें सर्व लोक जमूं लागले. दहा घटके दिवसास सरदार व अधिकारी लोक व त्यांच्या मागून राजा याप्रमाणें सर्व मंडळी सभेंत येऊन दाखल झाली. नंतर अपराध्यांस अनुकूळ किंवा प्रतिकूळ अर्ज किंवा फिर्यादी झाल्या आहेत काय? असें राजानें कारभाऱ्यांस विचारिलें. तेव्हां फौजदारा विरुद्ध मात्र कांहीं फिर्या

र्दी झालेल्या होत्या; त्या मद्दुतेक पैगां खाल्याबद्दल व अन्न घेतल्याबद्दल होत्या. ते सर्व कागद कारभाऱ्यानें राजापुढें ठेविले. राजानें सर्व वाचून पाहिल्यानंतर अपराधी लोकांस पुढें आणण्याग शिपायांस आज्ञा केली व अपराधी लोकांनीं जीं कांहीं घोर कृत्यें केलीं आहेत; त्यांबद्दल सर्व सभासदांस समजूत द्यावी, असें सुमंतरावास सांगितलें. अपराधी लोकांस पिंजऱ्यांत आणून उभें केल्यावर सुमंतराव उठून उभा राहिला; व सभेस उद्देशून ह्मणाला, "मित्रांनों, सह्यां कैदेंत असलेल्या लोकांकडून जे अपराध घडले आहेत; ते सर्वांस कळवावे, अशी मला महाराजांची आज्ञा झाली आहे. त्याप्रमाणें महाराजांची ही सेवा करण्यास मी उभा राहिलों आहें. मी जें आतां संभाषण करणार तिकडे सर्वांचें लक्ष असावें. परलोकीं ईश्वर जें आपणास शासन करणार, त्याला फार अवधी आहे; अथवा तें होणार आहे किंवा नाहीं, याचा संशय दिसल्यामुळें दुष्टलोक घोर कर्मांस प्रवृत्त होतात; परंतु बहुधा असें घडतें कां त्यांस त्या कृतकर्मांबद्दल ह्या मृत्यूलोकांत लौकर शासन भोगावें लागतें. असा प्रकार बहुधा दृष्टीस पडत असून लोक घोर पापें करण्यास चुकत नाहींत हा मोठाच चमत्कार आहे! असो आतां मी या अपराध्यांबद्दल संक्षिप्त हकिगत सांगण्यास आरंभ करितों. —

"हे महाराजांचे सावत्र बंधू जयपाळ. यांचें महाराजांनीं उत्तम रीतीनें पालन पोषण केलें असून व त्यांस अर्धें राज्य देण्याचा त्यांचा हेतू असून महाराजांवर ह्या कृतघ्नानें शस्त्र उचललें. नानासाहेबास महाराजांनीं मोठ्या हुद्याची जागा देऊन त्याचें कल्याण केलें, त्याचे उपकार त्यानें ही महाराजांवर शस्त्र धरूनच फेडले. हल्लींच्या बंडांत थोडें चुकलें, नाहीं तर महाराजांचा घात होण्याचा प्रसंग आला होता. परस्त्रियांचा अभिलाष मनांत धरून कृष्णरायानें आजपर्यंत अनेक घोर कर्में केलीं आहेत असें मी ऐकिलें आहे. निरपराधी तीन मनुष्यांस—स्वामीच्या आज्ञेवरून कां होईना पण —यानें जिवंत पुरून टाकण्याचा यत्न केला. ह्याचें काळीज केवळ दगडाचें आहे, असें ह्मणण्यास चिंता नाहीं. हा शहर फौजदार. यानें आजपर्यंत जीं जीं दुष्ट कृत्यें केलीं आहेत. तीं सांगून सरणार

नाहींत. यावर कित्येदां ह्याच्याचे कागद पत्र नुकतेच मी महाराजांपुढें पाहिले. विनाकारण खोटा अपराध शाबीद करून मणिदत्त शेठ याजकडून यानें एकलाख रुपये घेतले; व त्या कुटुंबास विनाकारण तुरुंगांत ठेवून त्यांचे यानें मनस्वी हाल हाल केले. गरीब बिचारा सोमाजी त्याजकडून ह्यास कांहीं मिळण्याजोगें नव्हतें, तरी देखील त्याचीयास दया आली नाहीं. याशिवाय शेंकडों लोकांचे ह्या दुष्टानें आजपर्यंत हाल हाल उडविले आहेत. यास दरमहा सरकारांतून कमी मिळत होता असें नाहीं. तरी द्रव्य प्राप्त्यर्थ याणें मनस्वी घोर कर्मे केलीं. त्या दिवशीं याच्या घराची जप्ती झाली, तेव्हां सहा लाख रुपये याच्या घरांत ऐवज सांपडला. एवढा पैसा मिळविण्यास यानें किती लोकांचा बरें धुव्वा उडविला असेल! हे आमचे बंधू हेमचंद्र, ह्यांनीं मारेकरी पाठवून माझा घातकरण्याची मसलत योजिली होती, आणि ती शेवटासही गेली असती. पण परमेश्वराच्या आणि ( वीर बाहूकडे बोटकरून ) यांच्या कृपेनें त्या संकटांतुन मी मुक्त झालों. आणि मणिदत्त बाबा व महाराज यांच्या कृपेनें हे चांगले दिवस आज मी पहात आहे. " आतां मी ह्या आनंद स्वामीची हकिगत शेवटीं सर्वांस कळविते.

यानें साधूचें सोंग आणून आजपर्यंत किती लोकांस ठकविलें असेल याचा नेम नाहीं. ज्या हिंमतरावाकडून लाखों रुपये ह्यास फायदा झाला होता, त्यास जिवंत पुरून टाकण्याची विद्या कृष्णरायाला ह्यानेंच सांगितली. ह्याप्रमाणेंच ह्यानें आजपर्यंत दुसरी पुष्कळ घोर कृत्यें केलीं असावींत असें दिसतें. ह्याच्या सारखा क्रूर कर्मा ह्या मंडळींत दुसरा कोणी नाहीं, असेंह्मटलें तरी चालेल.

ह्या लोकांचे अपराध ऐकून सर्वांस फार वाईट वाटलें. मनुष्य जन्मास येऊन यांनीं फार नीच कृत्यें केलीं; अशी सर्वांची खात्री झाली. नंतर तुमचें ह्यावर कांहीं सांगणें आहे कीं काय, असें अपराध्यांस राजानें विचारिलें. तेव्हां त्यापैकीं कोणाकडून कांहीं एक उत्तर आलें नाहीं. सर्व माना खालीं घालून राहिले. मग राजानें प्रत्येकास शिक्षा दिली ती पे

णें प्रमाणें.—

आनंद स्वामी व शहर फौजदार ह्यांच्या सर्वांगास काडे गुंडाळून आणि वर तेल ओतून ह्यांस जिवंत जाळून टाकावें. जयपाल यानें जरी मोठा अन्याय केला आहे, तरी तो गादीचा वारस असल्यामुळें त्यास फक्त जन्मभर नजर कैदेंत ठेवावें. नाना साहेब, कृष्णराय, व हेमचंद्र ह्या तिघांस फांशीवर चढवावें. याप्रमाणें राजाज्ञा होतांच सर्व सभेनें अपराधानुरूप योग्य शिक्षा मिळाल्या, ह्मणून माना डोलविल्या. पण सुमंतराव जरा चलबिचल झाला. त्याकडे पाहून पुन्हां राजा ह्मणाला, " कां सुमंतराव, ह्या शिक्षेंत कांहीं फेरफार करावा असें तुह्मांस वाटतें काय? वाटत असल्यास बिनफिकीर बोला. ,, याप्रमाणें राजाची परवानगी मिळतांच सुमंतराव ह्मणाला, " राजाधिराज, स्वामी, फौजदार व कृष्णराय ह्यांस ज्या शिक्षा झाल्या, त्या योग्य आहेत. पण नानासाहेब, जयपाळ व हेमचंद्र यांस ज्या शिक्षा मिळाल्या त्या भारी आहेत. हें ऐकतांच मणिपाल ह्मणाला,

मणि०— तर काय ह्मणतां? ह्यांस जन्मभर नजर कैदेंत ठेवावें, एवढी शिक्षा पुरे आहे?

सुमं०— पुरे सरकार. आणि माझी ह्यावरही आणखी एक विनंती आहे.

मणि०— कोणती ती ऐकूं दे?

सुमं०— आमचे बंधू हेमचंद्र यांस महाराजांनीं कृपाळु होऊन रत्नपुरास पाठवून द्यावें. त्यांनीं एवढा उद्योग करून जें राज्यपद मिळविलें आहे. तें सुखानें भोगावें; अशी माझी ईच्छा आहे.

मणि०— तुह्मी ह्मणतां तर त्याप्रमाणें मी हेमचंद्राची मुक्तता करितों, पण ही गोष्ट अगदीं कायद्यास विरुद्ध आहे.

सुमं०— जयपाळ व नानासाहेब ह्यांच्या चिथवण्यावरून त्याच्या हातून प्रस्तूतचा अपराध घडला आहे.

मणि०— कां होईना? तरी पण तो अपराधच आहे. आणि त्या गादीचे तुह्मी वारस आहां.

घती आज्ञा व्हावी ह्मणजे झालें.

राजा०— हे मणिदत्तशेट तुमच्या परिचयांतील आहेतच. यांच्या मनांतून आपली एकुलती एक मुलगा तुमच्या सूर्यकांतास द्यावी असें आहे. मग यावर तुमचें काय ह्मणणें आहे?

वीर०— महाराजांस जो विचार पसंत पडला तो आमच्या हिताचा नसेल, असें कसें होईल? आह्मांबद्दल सर्व गोष्टींची काळजी महाराजांस आहेच. तेव्हां ही गोष्ट मी आनंदानें कबूल करितों.

राजा०— तर मग फाल्गुन शुद्ध पंचमीच्या दिवशीं सुमंतरावाच्या लग्नाचा निश्चय ठरलेला आहे. तेव्हां त्याच मुहूर्तावर आपणही तयारी करा, ह्मणजे झालें.

वीर०— हीं दोन्ही कार्यें आमच्याच घरचीं आहेत. सुमंतरावाच्या लग्नाचा योग लौकरच यावा, असें माझ्या मनांत होतें. तसाच परमेश्वरानें घडून आणला ही एक महादानंदाची गोष्ट समजली पाहिजे.

राजा०— कां शेटजी, तुमचें काय ह्मणणें आहे याजवर?

मणि०— आतां आणखी ह्मणणें कसचें? तयारी करावयाची आणि दुसरें काय?

राजा०— बरें तर, ठरलेंच हें. आतां माझ्या मनांत असें आहे कीं, मणिदत्त शेटींनीं रत्नमालेला आमच्या इकडे पाठवावी. तिला आईबाप वगैरे कोणी नाहीं! त्याबद्दल तिला ह्या प्रसंगीं वाईट वाटूं नये; ह्मणून तिचें कन्यादान आपण करावें, असें माझ्या मनांत आहे.

मणि०— महाराजांनीं चांगली योजना केली ही. हा आह्मां सर्वांवर अनुग्रहच आहे.

याप्रमाणें ठराव होऊन वीरबाहू व मणिदत्तशेट आपआपल्या घरीं निघून गेले. तिघांनींही घरांतील सर्व मंडळीस सर्व बेत कळविला. तेव्हां त्यांस फार आनंद झाला. राजवाड्यांत आणि वीरबाहू व मणिदत्तशेट यांच्या घरीं मंडपाचे कारखानें सुरू झाले. गांवोगांवीं सर्व सरदार, मानकरी, संस्थानी, व्यापारी, संभावित, सभ्य, स्नेही संबंधी वगैरे लोकां

...वन...

...ल मंटप तयार
...तील लोकांनीं सर्व र
स्ते सुशोभित केलेले होते आणि राजवाड्यांत व मोठमोठ्या रस्त्यावरून रो
षनाई सुरु केली होती. त्यामुळें ते दिवस दिपवाळीच्या दिवसाप्रमाणें लो
... आनंदकारक दिसूं लागले. राजानें हत्ती, कोतवालघोडे घोडेस्वार, पा
...ट, वाजंत्री, वगैरे पाठवून मणिदत्ताच्या घराहून रत्नमालेस राजवाड्यांत
...णविलें. नंतर उष्टी हळद होऊन मोठ्या थाटानें श्रीमंत पूजन झालें. सर्व
... आपआपले उद्योग एका बाजूस ठेवून अथवा कमी करून मौजपाहण्यां
...तून गेले होते- लग्नाच्या दिवशीं जिकडे तिकडे गर्दी दिसूं लागली. पुढें
...ठ्या समारंभानें एकाच मुहूर्तावर मणिदत्ताच्या घरीं व राजवाड्यांत ऐकदम
दोन्हीं लग्नें लागलीं. त्यावेळीं गांवा बाहेर तोफांची सरबत्ती झाली. ह्याप्रमाणें
तो दिवस मोठ्या.च आनंदांत गेला. पुढें पंधरा दिवस पर्यंत लग्न सोहाळ्याचें
काम चालू होतें. दरदिवशीं ब्राह्मण भोजनें, मोठमोठ्या लोकांस मेज
वान्या, आणि साधारणलोकांसही जेवणें चाललीं होतीं. सर्व लोकांच्या
मनोरंजनाकरितां सकाळच्यावेळीं गवयांचीं गाणीं व हत्तीच्या टकरा, सं
ध्याकाळच्यावेळीं कलावंतिणीचे नाच आणि पहिलवानांच्या कुस्त्या...